गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक १ लें.

# धाकट्या सूनबाई.



"Go little Book, the world is before thee,
Stand for the truth though all the world deride,
Firm as rock though all the world ignore thee,
As thou art true what need'st thou ask beside."

श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र.

यांनीं लिहिलें.

[ चतुर्थावृत्ति. ]



मुंबई,

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

१९१२.

## प्रकाशकांचे दोन शब्द.

या पुस्तकाची तिसरी आवृत्ति संपून आज ही चवथी आवृत्ति प्रसिद्ध करण्याचा सुयोग येत आहे, याबद्दल प्रकाशकांस समाधान वाटतें. ह्या आवृत्तिसहि महाराष्ट्र वाचकवर्गाकडून योग्य आश्रय आणि उत्तेजन मिळेल अशी आशा बाळगितों.

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीचें ऑफिस, गिरगांव–मुंबई.

**काशीनाथ रघुनाथ मित्र,**
म. ग्रं. प्र. मं. व्यवस्थापक.

# धाकट्या सूनबाई.

## प्रकरण पहिलें.

### पवनेच्या घाटावर.

वैशाखाचे दिवस. अकरांचा समय झाला आहे, ऊन एकसारखें रखरखतें आहे, घराबाहेर पाऊल काढण्यास कोणाचें मन घेत नाहीं, रस्त्यांत चिटपांखरूंहि आढळत नाहीं, रानामध्यें गुरेंवांसरें हळूहळू मोठमोठ्या झाडांच्या सावलींचा आश्रय करूं लागलीं आहेत, मोठ्या पहाटेस बाहेर पडलेला पक्षिगण या वेळीं भक्ष्यशोधार्थ हिंडण्याचे परिश्रम न करतां तरुवरांच्या सुशीतल घन पल्लवांमध्यें लपत आहे, आसपासचे सकल विशाल वृक्ष हा वेळपावेतों कोकिलादि पक्षिगणांच्या सुमधुर कलरवानें गजबजून गेले होते, तेहि सांप्रत निःशब्द झाले आहेत, जिकडेतिकडे शांततादेवीचें साम्राज्य पसरलें आहे.

गांवाच्या बाह्यप्रदेशीं जरी याप्रमाणें सुशांत दिसत आहे, तरीहि पवनानदीवर या वेळीं मारे एकसारखी गडबड उडाली आहे. या ठिकाणीं गांवांतील वृद्ध, प्रौढ, तरुण स्त्रिया आणि बालिका यांची एकच गर्दी झाली आहे. कोणी स्नान करीत आहेत, कोणी धुणीं धूत आहेत, कोणी धुतलेलीं वस्त्रें वाळवीत आहेत, कोणी भांडीं घांशीत आहेत, कोणी कांहीं करताहेत, कोणी कांहीं करताहेत, अशी मारे धांदल उडाली आहे. इतक्या बायका एकत्र मिळाल्यावर शांततेचें नांवतरी कशाला पाहिजे! दोघी बायकांची भेट झाली आणि त्या अगदीं स्तब्ध बसल्या, असें कधींतरी घडलें आहे?

पवनेच्या घाटावर या वेळीं एका महत्त्वाच्या विषयाची चर्चा चालली होती. सगुणाबाईकडून विषयास सुरुवात झाली. त्या ह्मणतात "नाहीं ग बाई. असा डौल त्रिभुवनांत कुठं कुठं पाहिला नाहीं! शहरांतली, लिहावाचायला शिकलेली, ह्मणूनच काहो गोप्काबाई, इला एवढा डौल?"

हातांतील भांडीं लक्करलक्कर पाण्यांत बुचकळून गोपिकाबाई ह्मणाल्या "नाहींतर दुसरं काय! पण मी ह्मणतें, जळला मेला तो एवढा डौल कशाच्या

जोरावर? नवऱ्याला कांहीं रोजगार असता, अंगावर दोन दागिने असते तर मेलं असो कांहींतरी! पण इच्यातर अंगावर गुंजभरहि सोनं नाहीं. सकाळ गेली–दुपार कशी जाते याची भ्रांत, मग एवढा मेला डौल तो कशाला!"

"ठीक बोललां गोप्काकाकू" यमुनाबाईंनीं अनुमोदन दिलें. "त्या दिवशीं कनई, पार्वतीचीं दोन्हीं मुलं भुकेनं अगदीं व्याकुळ होऊन रस्त्यांत रडत उभीं होतीं. मीं त्यांनां घरीं नेऊन कांहीं खायला दिलं. पण हें कांहीं बाई तिला सहन झालं नाहीं. माझ्यावर तिनं हव्वंतसं तोंड सोडलं, नि पोरांला मारझोड करीत घरीं घेऊन गेली. त्या दिवसापासून मींतर बाई तिचं नांवच सोडून दिलं आहे—"

इतक्यांत नान्याची आई धूत असलेलें लुगडें तसेंच हातांत लोंबत ठेवून ह्मणाली "कायग बाई, लिहावाचायला येतं ह्मणूनच का या पोरींनां एवढा तोरा? मलाहि बाई मोठी भीति वाटूं लागली आहे—आमच्या नान्याची बायकोहि लिहावाचायला शिकलेली आहे—"

गालांतल्या गालांत हंसत, हळूच डोळे मिचकावीत यमुनाबाई ह्मणतात, "मावशी, तुह्मांला नकोहो त्याची भीति! तुमच्या द्वारकीला नुस्तं कुठं 'ट फ' करतां येत असेल नसेल, त्याच्या पलीकडे नाहीं कांहीं!"

यावर यशोदाबाई ह्मणाल्या "बायकांनीं लिहावाचायला शिकणं चांगलं, वाईट तर नाहींच नाहीं! लांब कशाला, या पार्वतीचीच जाऊ–राधाबाईची धाकटी सून लक्षुमी पहाना! गेल्या मार्गेसरांत ती सासऱ्याच्या वर्षश्राद्धाला आली होती. सगळ्यांशीं कशी हंसूनखेळून असे. पोरगी कितीतरी मर्यादशील ह्मणून सांगूं? थोरामोठ्याची लेक, पण बिचारीला गर्व कसा तो ठाऊकहि नाहीं—"

"अस्सं अस्सं?" गंगूनें मध्येंच खोंचून प्रश्न केला. "पण का हो काकू, लक्षुमी आतां सासरीं कां बरं येत नाहीं?"

नान्याची आई आपला उद्योग बंद ठेवून पुनः ह्मणाली "येईल कशाला? घरीं खायाला काय आहे? मोठा दीरतर आज दोनतीन वर्सं घरीं बसला आहे, रोजगार ना धंदा. यजमानतर बोलूनचालून चंगीफंगी! बिचाऱ्याला कवडी मिळविण्याचीहि अक्कल नाहीं. आणखी—ती हकीगत तुह्मीं नाहीं का ऐकिली–(इकडेतिकडे पाहून हळूच) लक्षुमी कनई, श्राद्धाच्या वेळीं आली होती, त्या वेळीं तिचे सगळे दागिने यांनीं गहाण कीहो टाकिले! ह्मणूनचतर तिचा बाप आतां तिला सासरीं धाडीत नाहीं—"

# पवनेच्या घाटावर.

यशोदाबाई ह्मणाल्या "लक्ष्मीचा नवरा चंगीफंगी असूंद्या, परंतु मोठा परोपकारी माणूस बाई! दिवस असो रात्र असो. कुणालाहि अडल्या वेळीं विनोबाला हांकदिखील मारावी लागत नाहीं. असा दयाळू पुरुष आपणतर बाई कुठं पाहिला नाहीं!"

याप्रमाणें ही चर्चा अगदीं ऐन रंगांत आली आहे. इतक्यांत 'ठं ठं ठं' असा भांड्यांचा शब्द करित पार्वतीबाईच्या सासू राधाबाई हळूहळू घाटावर येऊन पोहोंचल्या. तत्क्षणीं परस्परांच्या नेत्रसंकेतानें सर्व मंडळींत तार पोहोंचली! सर्वजणी एकदम चूप झाल्या. कोणी पूर्ववत् मोठ्या जोरानें भांडीं घासूं लागल्या, कोंणी तोंडानें 'शूः शूः' असा शब्द करित लुगड्यांला घाव घालूं लागल्या, कोणी घाटावरील गणपतीला प्रदक्षिणा घालण्यांत गर्क झाल्या, अशा ज्या त्या आपापल्या उद्योगांत निमग्न होऊन गेल्या. नंतर कोणाच्या तोंडून एक शब्दहि निघाला नाहीं. राधाबाईची ती गंभीर आणि विरक्त मुद्रा पहातांच कसलें काय नि कसलें काय जी ती गुपचूप काम आटोपून आपापल्या घरचा रस्ता सुधारूं लागली. नान्याची आई खेरीजकरून हळूहळू सर्वजणी निघून गेल्या.

थोड्या वेळानें राधाबाईची स्वतांशींच बडबड सुरू झाली "हंः, कांडीचीतरी अक्कल! बेशरम कुठली! उद्यां समजेल मी मेल्यावर मागं काय दशा होईल ती! नि माझं हो मेलं असं कसं फुटकं कपाळ! देवालासुद्धां माझी अजून करुणा येत नाहीं नि तो मला घेऊनहि जात नाहीं. हा एवढा माथ्यावर दिवस आला तरी अजून आंघोळहि नाहीं! मीच मेली निलाजरी ह्मणून तर हीं रात्रीचीं भांडीं घेऊन आल्यें—"

नान्याची आई गणपतीला प्रदक्षिणा घालित होती, ती लगबगीनें खालीं उतरून धुतलेलीं लुगडीं खांद्यावर टाकून ह्मणाली "राधाकाकू, एवढं हें नाकापेक्षां जड मोतीं तुमच्या या दयाळु स्वभावामुळंच ना झालं? ह्मणूनच मी ह्मणत असतें बरं, कीं या पोरींनां मुळांपासूनच चांगल्या धाकांत ठेविल्या पाहिजेत."

राधाबाई करुणस्वरानें ह्मणाल्या "उमाबाई, तुह्मी कांहीं मला परक्या नाहींत, ह्मणूनच मी तुह्मांला मोकळ्या मनानं सांगतें बरं—" असें ह्मणून त्यांनीं नान्याच्या आईचा हात धरला व त्या दोघी घाटाच्या एका पायरीवर जाऊन बसल्या. बराच वेळपावेतों राधाबाई उमाबाईला आपल्या थोरल्या सुनेच्या कागाळ्या सांगत होत्या. परंतु सगळ्या कांहीं त्यांच्यानें सांगवल्या नाहींत. बोलतांबोलतां एकदम त्यांचा गळा दाटून आला. डोळ्यांतून गंगायमुनांचे प्रवाह सुरू झाले.

नान्याची आई अनेक मिष्ट शब्दांनीं राधाबाईचें शांतवन करूं लागली. ती ह्मणाली "काकू, पार्वतीला कांहीं दिवस माहेरीं लावून द्याना परती! तुह्मांला आतांशा काळ नाहीं अनुकूळ, ह्मणून ह्मणतें. लक्ष्मीला आणा थोडे दिवस. पोरगी तर खरोखर लक्ष्मीच आहे!"

राधाबाई डोळे पुसून ह्मणाल्या "तिला इकडे आणून काय बाई करूं? तीतर पार्वतीपेक्षांहि जास्त लिहावाचायाला शिकलेली, तेव्हां जरा धास्तीच वाटते. आमच्या विनूलातर तुह्मी ओळखतांच! पोराचं संसाराकडे मुळीं लक्षच नाहीं. सदा लोकांच्या कामाला वाहिलेला! आज कोण ह्मणे त्या येसंभटजींच्या भावजयीच्या—मामाच्या-पुतण्याचा-मेव्हणा वारला, चालला त्याचं मढं उचलायला. त्या हरभट जोशांची काकू पंढरीच्या यात्रेला निघाली, हा चालला तिला पोंचवायला! कुणी मसणं दुखण्यानं मरत पडलं आहे, हा चालला रात्रीच्या रात्रीं त्याच्या उशाशीं जागत बसायला! असा बेढंगी कारटा त्रिभुवनांत आढळायचा नाहीं! जीव त्रासला बाई याच्या या अशा ढंगांनीं—"

"सुनेला घरीं आणा, ह्मणजे आपापच मुलाचं लक्ष्य संसाराकडे लागेल—" नान्याची आई हंसतहंसत ह्मणाली.

नंतर असेंच आणखी कांहीं बोलणें होऊन नान्याची आई निघून गेली. भांडीं घांसून झाल्यावर राधाबाईहि घरीं परतल्या. साऱ्या रस्त्यांत त्यांच्या मनांत हीच गोष्ट एकसारखी घोळत होती.

---

## प्रकरण दुसरें.

### थोरल्या सूनबाई.

सदूभाऊंचें घर एकमजली, पक्क्या विटांचें होतें खरें, परंतु सांप्रत बहुतेक स्थळीं त्याची अगदीं मोडतोड होऊन गेलेली दिसत आहे. पुढील दरवाजाला लागूनच एक दिवाणखाना आहे, परंतु सांप्रत येथें बसण्याउठण्याची मुळींच सोय नाहीं. उंदीर, घुशी वगैरे मंडळी दिवसारात्रीं निर्विघ्नपणें येथें विहार करित आहे! दिवाणखान्याच्या आंतल्या बाजूस देवखोली आहे. सांप्रत ही कीटकप्रभृति जीवकुलाची लीलाभूमि होऊन बसली असून केरकचऱ्याचेंतर येथें पूर्ण साम्राज्य माजलें आहे. पडकीं भिंताडें वट, अश्वत्थप्रभृति नानावृक्षांनीं व्यापून टाकिलीं आहेत. अंगणांततर कांहीं विचारूच नका! नाहीं ह्मणावयाला घराच्या

आंतल्या अंगांस काय त्या तीनचार लहानलहान खोल्या साधारण स्थितींत आहेत. एक स्वयंपाकाची व दुसऱ्या इतर. एकंदर घराची अवस्था अशी अति शोचनीय झालेली छपरावर धड कौलें नाहींत, भिंतीची जागजागीं पडापड झाली आहे, जिकडेतिकडे घाणचघाण व केरचकेर! घरामध्यें कोठेंहि पहा, मूर्तिमती दारिद्र्यदेवी विराजमान झाली आहे! राधाबाईनीं घरीं येतांच हातांतील भांडीं स्वयंपाकघरांत नेऊन ठेविलीं. अंगावरील ओलें वस्त्र सोडलें आणि "मुली, मुली, अग—मुली!" अशा त्या हांका मारूं लागल्या.

पार्वतीबाई आपल्या खोलीमध्यें एका हांतरीवर मोठमोठ्यानें घोरत पडल्या होत्या. अर्थात् सासूच्या ह्या हांका कांहीं त्यांनां ऐकूं आल्या नाहींत. राधाबाईला वाटलें, सून कांहीं घरांत नाहीं, कसल्यातरी कामकाजाकरितां शेजारींपाजारीं कोठें गेली असेल. परंतु लागलेंच त्यांच्या मनांत काय आलें कोण जाणे! खिडकीची फळी मोठ्या जोरानें उघडून त्यांनीं आंत पाहिलें, तों त्यांची सून खोलींत 'घुर्-र्र घुर्-र्र' करीत खुशाल घोरत पडली आहे.

राधाबाईला जन्मापासून बडबड्या रोगानें ग्रासलें होतें. बरें, आतां ज्याच्याशीं बाचाबाची झाली असेल त्याच्याचबरोबर क्षणभरानें हंसण्याखिदळण्यास प्रारंभ! बिचारीच्या मनांत किल्मिष ह्मणून कसें तें नसे. कामकाजाचा ह्मातारीला मुळींच कंटाळा नव्हता; उलट रात्रंदिवस मेहनत करण्यास ती हपापलेली. परंतु हातानें काम करतांकरतां कोणावरतरी मधूनमधून तोंड सोडल्याविना तिला काम करण्याला उत्साह ह्मणून वाटतच नसे. कोणी तडाख्यांत नाहींच सांपडलें, तर त्यांनीं आपल्या अदृष्टालाच दोष देत बसावें. अथवा गरीब बापड्या मुक्या मांजरांवांसरांवर तोंडसुख घ्यावें. एवंच, कोणानाकोणावरतरी राग काढल्याविना त्यांच्या जिवास चैनच पडत नसे. तरीहि थोरल्या सुनेच्यासमक्ष एक अवाक्षरहि उच्चारण्याची ह्मातारीची कधीं छाती होत नसे. कारण सूनबाई होत्याच तशा! तेव्हां आज सून निजलेली पाहिल्यावर असा अनायासें आलेला सुयोग त्या हातचा थोडाच जाऊं देतात!

"कायतरी अक्कल हो पण! खावं प्यावं नि खुशाल घोरत पडावं! माझ्या मेलं तोंडांत थेंबभर पाणीहि पडलं नाहीं, नि ही—मुलांचीं लग्नं करून सुना आणायच्या, त्या देव्हाऱ्यांत बसवून पूजा करायसाठींच नाहीं का? भिकारड्यांच्या पोरीनां—"

पुढचे शब्द तोंडांतल्या तोंडांतच राहिले. पार्वतीबाई मोठ्या फणकाऱ्यानें उठून खाड्दिशीं दरवाजा उघडून बाहेर पडलेल्या पहातांच राधाबाई एकदम

चपापल्या. इकडे सूनबाई एकेक डोळा एवढाएवढा करून गर्जना करूं लागल्या. "कोण, माझा बाप भिकारडा ? नि इथं काय उजेड पडला आहे पहाना ! इथं तर दाराशीं हत्ती झुलताहेत !"

सून काय बोलली हें सगळें कांहीं म्हातारीला बरोबरसें समजलें नाहीं. "दाराशीं हत्ती झुलताहेत" हे शब्द मात्र तिच्या काळजाला झोंबून गेले. राधाबाईच्या डोळ्यांत घळकन् पाणी आलें. बराच वेळपावेतों त्या रडत होत्या. परंतु सूनबाईनां कांहीं सासूचें हें रडणें आवडलें नाहीं. हो, बरोबरच आहे, मुलांबाळांचें घर आणि भर मध्यान्हींचा समय. अशा वेळीं थेरडीचें 'हां हूं' त्यांनां कसें बरें सहन व्हावें ! त्या मान मोडून व तोंड वांकडेंतिकडें करून म्हणाल्या "ऐकलं का ! तुम्ही असं वेळीं अवेळीं रडत जाऊं नका. या घरांत पडल्यापासून एकहि दिवस मेला सुखाचा कसा तो पाहिला नाहीं ! घरीं येऊंद्या, त्याचा कायतो पक्का बंदोबस्त केल्याविना मी या घरांत पाणी पिणार नाहीं—"

" करून करून तें काय करणार बाई तूं ? मला घरांतून घालवून देणार होय ? कर बाई तसं. तूंहि सुखी हो, नि मीहि सुटेन एकदाची तुझ्या त्रासांतून ! तुझा हा दिमाख माझ्यानं कांहीं आतां सहन करवत नाहीं—" म्हातारी अधिकच रडूं लागली.

पार्वतीबाई अति संतप्त होऊन म्हणाल्या " अहाहा ! थेरडीच्या गोष्टीतरी ऐका ! मी असं कधीं बोललें तरी ? "

'सुनेच्या या भाषणानें राधाबाई पराकाष्ठेच्या चिडल्या. त्यांचे ओंठ थरथरूं लागले, उभयतां हातवारे करूं लागल्या, माना वांकड्या तिकड्या मोडूं लागल्या, वेडेवांकडे सूर काढून एकमेकीनां टोंचून बोलूं लागल्या—असा घोर संग्राम माजला. घरांत असें भयंकर रणकंदन माजलें आहे, इतक्यांत बाहेरून सदू-भाऊंची स्वारी अंगणांत येऊन ठेपली. घरांतील ही प्रचंड खडाजंगी दुरूनच त्यांच्या कानीं पडतांच त्यांचा जीवच उडून गेला. बिचाऱ्यांचा पुढें पायच उचलेना. परंतु आपण आंत न गेल्यास हा अग्नि विझणार नाहीं, उलटा, अधिकच प्रदीप्त होईल, असा विचार करून भीत मनानें त्यांनीं हळूहळू अंतर्गृहांत प्रवेश केला. मुलाला पहातांच राधाबाईनीं रडतरडत त्याला सुनेच्या सगळ्या कागाळ्या सांगण्यांत सुरवात केली. पार्वतीबाईनींहि बरेंच तिखटमीठ लावून नवऱ्यापाशीं सासूचें गुणवर्णन केलें. तें ऐकतांच म्हातारी थक्क होऊन गेली. बिचारे सदूभाऊ

मोठ्या संकटांत पडले. एक बाजूस प्रत्यक्ष आई, दुसऱ्या बाजूस मूर्तिमंत कजाग पत्नी! कांहीं वेळपावेतों ते एकाद्या पाषाणाच्या मूर्तीप्रमाणें स्तब्ध राहिले. त्यांच्या तोंडांतून शब्दच निघेना. नंतर त्यांनीं बायकोची बरीच निर्भत्सना केली. त्याबरोबर पार्वतीबाई मोठमोठ्यानें रुदन करूं लागल्या. रडतरडतच त्यांनीं आपल्या निजलेल्या दोन्ही मुलांनां जागें केलें व त्यांनां बरोबर घेऊन रागानें जळफळत त्या घराबाहेर पडल्या. जाते वेळीं यजमानांची षोडशोपचारें यथेच्छ पूजा करण्याची त्यांनीं बाकी ठेविली नाहीं. घरांतून बाहेर न जाण्याबद्दल त्यांची कोणींहि समजूत केली नाहीं सदूभाऊंनींतर त्यांची स्वतांच निर्भत्सना केली होती, यामुळें त्यांच्याकडून त्यांचें शांतवन होण्याची तर गोष्टच काढायाला नको. राधाबाईचा रागहि अजून शांत झाला नव्हता, यामुळें त्याहि सुनेची समजूत करूं शकल्या नाहीं. शिवाय ही ह्मणजे खरोखरच माहेरीं निघून जाईल, अशी त्या मायलेंकांपैकीं एकानेंहि कल्पना केली नव्हती. सूनबाईनां मात्र वाटत होतें, कीं, आपण माहेरीं निघून जातें असा धाक दाखवून घराबाहेर पडतांच यजमान आणि सासूबाई उभयतांहि आपली मनधरणी करावयास येतील व आपल्यास थांबवितील. परंतु बराच वेळ झाला, तरी कोणीहि त्यांनां परतविण्यास आलें नाहीं, तेव्हांतर त्यांचा क्रोधानल द्विगुणित झाला आणि त्या क्रोधावेशांतच मागलापुढला काहींएक विचार न करितां, त्या जळफळत तडफडत सखू मोलकरणीच्या घरीं गेल्या व तिला बरोबर घेऊन खरोखरच माहेरीं चालत्या झाल्या.

इकडे सदूभाऊ मृदु शब्दांनीं आईला दोन समजुतीच्या गोष्टी सांगूं लागले. "आई, तूंच पहा, आपलीतर अवस्था ही अशी! आजचा दिवस गेला, उद्यांचा दिवस कसा जातो, या चिंतेनें माझें मन नेहमीं अस्वस्थ असतें; आणि त्यांत तुमचीं हीं रात्रंदिवस भांडणें नि रडारडी कशा बरें सहन कराव्या? अशानें घरांत लक्ष्मी कशी बरें नांदेल?"

मुलाचें हें किंचित् रागाचें भाषण ऐकतांचतर राधाबाई ओक्साबोक्सीं रडूं लागल्या. परंतु संतापातिशयानें सदूभाऊंचें अंतःकरण अति क्षुब्ध झालें असल्याकारणानें ते आईचें यत्किंचित्हि शांतवन करण्याचे भानगडींत पडले नाहींत. आणि ही गोष्टतर त्या मानी राधाबाईच्या जिवाला फारच लागली. मागल्या साऱ्या गोष्टी आठवून हेल काढून त्या जास्तच रडूं लागल्या. परंतु त्यांच्या रडण्यांचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. सदूभाऊ संतापानें जें तेथून उठून गेले ते कांहीं आईचा राग शांत करण्यासाठीं पुनः आंत आले नाहींत.

राधाबाईचें रोदन प्रथम सप्तमांत चाललें होतें. क्रमाक्रमानें तें पंचमांत उतरलें. परंतु पंचमांततरी किती वेळ राहील ? आस्तेआस्ते तें खालीं खालीं उतरत चाललें. सरतेशेवटींतर अगदींच बंद झालें.

---

## प्रकरण तिसरें.

### विनोबा.

एकाच्या सुमारास आस्तेआस्ते विनोबांची स्वारी घराकडे वळली. अंगणांतूनच मोठमोठ्यानें ते हांका मारूं लागले "आई, आई–ए आई–अ!"

राधाबाईचें रुदन या वेळीं अगदीं बंद झालें होतें. त्या तोंडावरून लुगड्याची चौघडी गुरफटून घेऊन माजघरांत एका बाजूस निजल्या होत्या. सदूभाऊहि खिन्न मनानें आपल्या खोलींत स्तब्ध बसले होते. अर्थात् विनोबांला कोणाकडूनहि ओ मिळाला नाहीं. पुनः स्वारी हांका मारूं लागली "वहिनी, अहो वहिनी! अरेच्या ! कुणी घरांत आहे कीं नाहीं ?"

विनोबांची ही गडबड ऐकतांच सदूभाऊ मंदमंद पावलें टाकीत खोलीच्या बाहेर येऊन ह्मणाले "कोण—विनू ? इकडे ये."

सदूभाऊंचा उतरलेला चेहरा पहातांच विनोबा लगबगीनें धावतच गेले आणि कावरेबावरे होऊन आग्रहानें विचारूं लागले "दादा, घरांत कुणीच दिसत नाहींत, हे काय ! आई नि वैनी गेल्यातरी कुठें ?"

" आई आहे आंतल्या खोलींत निजलेली, आणि ती शिंची गेली आहे कुठें जगूला नि दामूला बरोबर घेऊन रागानें."

" अं: ! कांहीं भांडणबिंडण झालें वाटतें ?"

"मोठें जंगी."

"बरें, वहिनी गेलीतरी कुठें ?"

"जाईनाका शिंची मरणांत !"

विनोबा यावर कांहींएक बोलले नाहींत. त्यांनीं हळूहळू घराबाहेर पडण्यास सुरुवात केली. ते बाहेर जात आहेत असें पाहून सदुभाऊ ह्मणतात "विनू, कुठें जातोस ?"

"एकवार ह्मटलें वहिनी कुठें गेली आहे त्याचा तपास करून यावें—"

"मरूं दे शिंचीला ! उशीर फार झाला आहे, तूं जेवून घे कसा अगोदर. आई पण जेवली नाहीं अजून. जेवणखाण आटोपल्यावर सावकाशपणें मग जा."

"पण जगू नि दामूहि बरोबर आहेतना ?"

"म्हणूनच म्हणतों जाऊनजाऊन जाणार आहे कुठें ? फारफार तर त्या रामभटजींच्या घरीं."

झालें. विनोबांचा बेत फिरला. पुनः ते घरांत शिरले व ज्या ठिकाणीं आई निजली होती तेथें गेले. तेथें जातांच स्वारीला कळून आलें कीं, आजचें प्रकरण कांहीं निराळेंच आहे! हूं चूं न करितां विनोबा गुपचूप आईच्या पायांपाशीं जाऊन बसले व स्वारीनें हळूहळू तिचे पाय दाबण्यास सुरुवात केली. राधाबाई या वेळीं रागाच्या आवेशांत होत्या. अर्थात् विनोबांची ही पादसेवा त्यांनां रुचते थोडीच! त्या त्यांच्यावर पाय झाडूं लागल्या. इकडे विनोबांनींतर आईचा राग शांत करण्याची भीष्मप्रतिज्ञा केली होती. ते कांहींकेल्या आपली कामगिरी बंद करीनात हें पाहून म्हातारी अधिकच संतापली. "चल निघ इथून मेल्या! तोंड दाखवूं नको. तुझ्या त्या जळल्या गुणांनींतर मेल्या रात्रंदिवस माझं हाडमास जळून जात आहे. आग लागो या संसाराला! देव मला एकदाचं मरण देतां म्हणजे सुटलें असतें तरी एकदाची या जाचांतून—"

विनोबाच ते! त्यांनां आईनें षोडशोपचारें केलेल्या या पूजेचें कांहींएक वाईट वाटलें नाहीं. उलट स्वारी हंसतहंसत म्हणाली "आई! एक वाजला. आपल्यातर बुवा पोटांत कावळे ओरडताहेत. अगोदर जेवायलातर वाढ, मग तुला काय हवें तें बोलून घे—"

राधाबाई अधिकच चिडल्या. "मेल्या तुला जेवायाला लाज वाटत नाहीं? निर्लज्ज मेला! रोज उठून जेवायला मिळणार कुठून? मेल्याला एक कवडीदिखील मिळविण्यासारखी अक्कल नाहीं, राक्षसासारखं खाईल मात्र! म्हणे एक वाजला! एवढा वेळ कुठं तोंड काळं केलं होतंस! एवढा कसल्या कामांत गुंतला होतास? मी मेली अशी पातकी कीं एकाहि पोराला अक्कल म्हणून कसली ती नाहीं—"

इत्यादि व याहि पलीकडची निर्भर्त्सना चालली होती; परंतु विनोबांला त्याचा कांहींच विधिनिषेध वाटला नाहीं. त्यांच्या तें अगदीं अंगवळणींच पडून गेलें होतें. आईकडून दररोज अशी संभावना झाल्याशिवाय पोटांत कधीं अन्न गेल्याची बिचाऱ्यांनां आठवणहि नव्हती! नेहमींची अशी वहिवाटच असल्यामुळें हें सगळें सहन करून विनोबा आनंदी मुद्रेनें म्हणाले "आई, आम्ही आपले नंदीबैल आहों

पण पहिल्यानें नंदीबैलाला खायाला घालशील कीं नाहीं ? नंतर तुला लागेल तेवढें बोलून घे. हं हं—आपल्यालातर अतिशय भूक लागली आहे. हें पोटतरी बघ कसें बसलें आहे तें !"

वेडा खुळा, मूर्ख अज्ञान, कसाहि मुलगा असो, किती झालें तरी आईच ती—कुठवर स्वस्थ बसेल ! तोंडानें वरीलप्रमाणें बडबड चालली असतांच राधाबाई सोंवळें नेसून स्वयंपाकघरांत गेल्या व पान वाढून ह्मणाल्या "बैस मेल्या, भर हे पिंड पोटांत !"

"अगोदर तुला देईन वरें पिंड, नंतर मग मी खाईन. आई, तूंहि बैस जेवायला. आज किनई आपण बरोबरच जेऊं." विनोबा हंसतहंसत ह्मणाले.

राधाबाईला पुनः हुंदका आला. त्या रडतरडत ह्मणाल्या "मेल्यांनों! तुमच्या घरीं मी आतां कध्धीं अन्न घेणार नाहीं. भिक्षा मागणं बरं, पण तुमच्या घरचीं पक्वान्नंहि नकोत. हे टोमणेहि नकोत, नि मेलं तें जेवणहि नको! पोराची वटकूर नि मला तोंडास येईल तें ह्मणते ! मी इतकी भिऊन वागतें, तरी तिचे ते टोमणे आणि काळजास झोंबणारे शब्द सहन करतांकरतां प्राण गेला ! पूर्वजन्मीं मीं असं कोणतं पाप केलं होतं—" राधाबाईनां अनावरच हुंदका आला.

विनोबा ह्मणाले "नुकतीच ह्मणालीसना कीं 'एकाहि पोराला कवडी कमाविण्याची अक्कल नाहीं ह्मणून ?' मग आह्मी कांहीं तुला खायला घालीत नाहीं. तूंच आह्मांला घालतेस. वहिनीसंबंधीं ह्मणतेस, पण त्याला काय करावें ? संसारांत पडलें ह्मणजे हजारांचें सोसून घ्यावें लागतें. वहिनी तुला टाकून बोलते, तें तिचें करणें अगदींच गैर आहे. गांवांतले सगळे लोक याबद्दल तिची नेहमीं निंदाच करितात."

मुलाच्या या मिष्ट भाषणानें म्हातारीचा क्रोधावेश हळूहळू कमी होत चालला. शिवाय विनोबांवर त्यांचें प्रेमहि थोडेंसें जास्त होतें. मुलाच्या आग्रहावरून त्यांनीं आपलेंहि पान वाढून घेतलें व नंतर उभयतां जेवावयास बसलीं. म्हातारीच्य रागामध्यें—ज्या वेळीं ती अति क्षुब्ध होत असे त्या वेळीं–कोणावर ना कोणाव तरी तोंड सोडल्याशिवाय तिचा राग शांतच होत नसे. अशा वेळीं आमन विनोबा ह्मणजे या रोगाचें एक रामबाण औषधच होते !

लवकरलवकर जेवण उरकून राधाबाई मुलास ह्मणाल्या "विनू, माझे ज नि दामू कुठं गेले, त्यांनां एकवार पहा रे बाबा !"

आईच्या आज्ञेप्रमाणें मुलांच्या शोधास जाण्याला विनोबांला थोडासा अवकाश लागला. कारण जेवल्यावरोबर गांजाचा एक दम व तंबाखूच्या चिलमीचे चारदोन झुरके मारल्याविना त्यांच्यानें घराबाहेर पाऊलच टाकवत नसे !

---

## प्रकरण चवथें.

### सदूभाऊंचें श्वशुरालयीं प्रयाण.

संध्याकाळीं सदूभाऊंच्या घरीं मोठी गडबड उडाली होती. विनोबांनीं सगळा गांव धुंडाळला, परंतु त्यांनां वहिनींचा व पुतण्यांच्या यत्किंचित्‌हि पत्ता लागला नाहीं. सदूभाऊ मोठ्या विवंचनेंत पडले. राधाबाईहि घाबरून गेल्या. इतक्यांत शेजारच्या गणूच्या आईनें बातमी आणिली, कीं, " पार्वतीबाई त्या पलीकडच्या वाडींतील सखू मोलकरणीला बरोबर घेऊन दोन्ही मुलांसह भर दोन प्रहरींच तडक माहेरीं निघून गेल्या. "

ही गोष्ट सगळ्यांपेक्षां म्हातारीच्या जिवालातर फारच लागली. सदूभाऊंच्या घरीं येण्यापूर्वींच गणूच्या आईनें ही गोष्ट वाटेंत कितीजणांनांतरी सांगितली होती. अर्थात् गांवांतील रिकामटेंकड्या व दुसऱ्यांचें उणें पहाण्याविषयीं नेहमीं टपून बसलेल्या क्षुद्रस्वभावी स्त्रियांचें बरेंच मोठें लटांवरच्या लटांबर आस्तेआस्ते सदूभाऊंच्या घरीं जमूं लागलें. कित्येकजणींनीं विचाऱ्या दुःखी राधाबाईबरोबर मोठ्या कष्टानें आपल्याहि डोळ्यांत अश्रु आणिले; कित्येकजणींनीं गंभीर मुद्रा करून निश्वास टाकिले; कोणी पार्वतीबाईची निंदा करूं लागल्या; कोणी आतां पुनरपि तिचें नांवच काढूं नका, असा राधाबाईनां उपदेश करूं लागल्या, कोणी सदूभाऊंलाच दोष देऊं लागल्या व कोणीकोणीतर पार्वतीबाईच्या माहेरच्या बावन्न कुळींचा उद्धार करूं लागल्या ! हजारजणींचीं हजार तोंडें, जिच्या जें तोंडास येईल ती तें बडबडूं लागली व नंतर हळुहळू सर्वजणींनीं आपापल्या घरचा रस्ता सुधारला. एकीच्यानेंहि राधाबाईच्या उद्विग्न मनाचें शांतवन करवलें नाहीं. सुनेच्या प्रखर स्वभावामुळें त्या अगोदरच संसारास त्रासल्या होत्या आणि त्यांत दोन्ही नातवांसह ती निघून गेल्यामुळेंतर म्हातारी आज अगदीं अधीर झाली होती. ती तोंडानें हवें तें बडबडो, परंतु बिचारीच्या मनांत कोणाविषयींहि कुभाव म्हणून मुळींच नसे.

# धाकट्या सूनबाई.

दिवे लागल्यावर डुलक्या खातखात विनोबा सदूभाऊंला विचारूं लागले "दादा, पुढें काय विचार ?"

सदूभाऊ विरक्तमुद्रेनें ह्मणतात "विचार कसचा ? जाईना शिंची ! गेली तेंच बरें झालें. असल्या दुष्ट अवदसेचें आपण तर आतां कधीं तोंडदेखील प्हाणार नाहीं !"

"तें असूं द्या, परंतु आईची समजूत कशी करावी ?"

"रात्रंदिवस भांडणच करायचें असेल तर शेजारीपाजारी कांहीं थोडी मंडळी नाहीं ?"

विनोबा नुकतेच आले होते गांजाचा एक दम मारून ! सदूभाऊ काय बोलले हें कांहीं बरोबरसें त्यांनां समजलें नाहीं. शेवटचे दोनचार शब्द मात्र त्यांनीं नीट ऐकिले व तेवढेच घेऊन ह्मणाले "शेजारींपाजारीं पुष्कळ मंडळी आहे खरी, परंतु त्यानें आईचें समाधान थोडेंच होणार आहे !"

बिचारे सदूभाऊ मोठ्या विवंचनेंत पडले. बराच वेळपावेतों चिंतेमध्यें स्तब्ध राहून गंभीर स्वरानें ते ह्मणतात "ऐकलें विनू ! सध्याच्या स्थितींत झालें तेंच ठीक झालें, असें मलातर वाटतें !"

याच वेळीं राधाबाई रडतरडत घरांतून बाहेर येऊन सदूभाऊंस ह्मणाल्या "काय रे बाबा चांगलं झालं ? माझ्या मात्र तोंडाला काळोखी आली ! कुटुंबवत्सल लोक माझ्या नांवानं आतां खापर फोडतील. आपण अगदीं गरीब झालों ह्मणून आपल्याला मानापमानाची चाड नाहीं काय रे बाबा ? मला मेलीला त्या वेळीं काय दुर्बुद्धि—"

ह्मातारीचे उभय नेत्र पुनः भरून आले. आईची ती व्याकुल मुद्रा पहातांच दोघांहि मुलांनां फार दुःख झालें. विनोबा थोडा वेळ खिन्नमुद्रेनें बसून नंतर लवकरच डुलक्या खाऊं लागले. सदूभाऊ मनांतल्या मनांत विचार करीत बसले. बराच वेळ गेल्यावर सदूभाऊ ह्मणाले "आई आपल्यावरचा हा दोष नाहींसा होण्यासाठीं आतां पुढें काय केलें पाहिजेसें तुला वाटतें ? सांग ?"

डोळ्यांतील आसवें पदरानें पुशीतपुशीत ह्मातारी खिन्नस्वरानें ह्मणाली "बाबा, उजाडतांच सुनेला आणि माझ्या बाळांना घेऊन या रे ! माझे बाळ गेल्यानं मला सगळीकडे अंधार भासत आहे. नाहीं रे बाबा, सुनेबरोबर मी आतां कध्धींहि भांडणार नाहीं—देवाची शपथ तिला एक शब्दहि बोलणार नाहीं. तिनं मला मारलं तरीदिखील मी हूं कीं चूं करायची नाहीं. माझी गुणांची सून.

जा बाबा, उद्यांच तिकडे जा व कसंहि करून तिची समजूत घालून तिला इकडे घेऊन या—"

सासरीं जाण्यास सदूभाऊ पहिल्यानें कांहीं केल्या कबूल होईनात. हें पाहून विनोबा ह्मणतात "दादा! आई ज्या पक्षीं इतकी काकुळतीस येत आहे, त्या पक्षीं तूं तिकडे जावें हेंच योग्य, असें मला वाटतें."

" मग तूंच जाईनास !"

"अं-हं! मला क्षमा कर त्याबद्दल. तें काम आपल्याच्यानें मुळींच होणार नाहीं बुवा! तूं तिकडे जात असशील तर इकडची सगळी व्यवस्था मजकडे लागली. तूं परत येई तोंपर्यंत मी घर सोडून कुठेंहि जाणार नाहीं. संसाराचें सगळें काम पाहीन. पण कुणीं मान जरी कापिली तरी तुझ्या सासुरवाडीला ह्मणून जायचा नाहीं. आपल्याला बुवा भय वाटतें."

आमचे विनोबा ह्मणजे आमरण परक्याच्या कार्याला वाहिलेले! एक दिवस-सुद्धां घरचें काम केल्याबद्दल बिचाऱ्यांला आठवत नव्हतें. तेव्हां त्यांच्या मुखांतून आज अशा प्रकारच्या गोष्टी ऐकतांच सदूभाऊ चकित झाले. मनांतल्या मनांत कांहीं पुटपूटून ते गालांतल्यागालांत हंसतहंसत ह्मणाले "विनू! तूं जर घरची व्यवस्था पहाशील, तर मी सासुरवाडीलाच काय, पण कुठें सांगशील तिकडे जायला एका पायावर तयार आहें!"

दुसऱ्याच दिवशीं मोठ्या पहांटेस सदूभाऊंनीं सासऱ्याच्या गांवाला प्रयाण केलें. राधाबाईंनीं सजल नयनांनीं प्रेमपुरःसर सुनेला कितीतरी आर्जवाचे निरोप सांगून पाठविले.

---

## प्रकरण पांचवें.

### गोष्ट गांवभर पसरली.

सदूभाऊ घरांतून बाहेर पडले नाहींत तोंच सखू मोलकरीण अंगणांत येऊन हांका मारूं लागली "बाय, अव बाय! अजून उटल्याशी न्है?"

राधाबाई आंतून फणकाऱ्यानें एकदम बाहेर येऊन ह्मणाल्या "चहाटळ कुटली! तुला ग एवढी उठाठेव कुणीं सांगितली होती? माझ्या सुनेला घेऊन जाण्याची तुला काय जरूर? आजपर्यंत मी तुला भली बायको समजत होतें, पण सटवे! तूंतर आंतल्या गांठीची आहेस!"

# धाकट्या सूनबाई.

सखू भीतभीत बोलली "देवाच्यान् वैनीबाय झायरा रागाउनशेनी ग्येली त्ये मन्नी न्हाय व बाय झाईत. मन्नी झंगाली 'बाबा लय बेजार हैती झूनशेनी उब्याउब्या जाऊन येनार, तवा चल माज्यासंग.' कायव बाय तुमान्नी सांगूं, भाकरसुदां खाल्ली न्होती. तशीच गेलय. वैनीबाय असा ढवांग करतीलस मन्नी न्हाय व वाटल—"

राधाबाई अधिकच चवताळून ह्मणाल्या "अहाहा! काय बोलते पण? अग, तुझीं आतां नदीवर लांकडं पोंचण्याची वेळ आली, तरी तुला इतकं कसं समजलं नाहीं, कीं, तिचा बाप जर खरोखरच आजारी असता तर ती दोन्ही लेंकरांनां घेऊन एकटीच पायीं कशी जाती? थेरडे! तूं मला आपली भोळी समजून माझी थट्टा करायला आलीस होय?"

बिचाऱ्या सखूचे डोळे पाण्यानें भरून आले. ती रडत रडत ह्मणाली "न्हाय व बाय, तुमच्या पायाच्यान् (अधिकच रडून) माज्या भिवाच्या रक्ताच्यान् मन्नी हेतला कायपून झाईत न्है. तुमच्या घरची प्येज पाजून प्वाराला न्हानाचा मोटा केला, आन् काय तुमाशीच दुस्मानगिरी करीन ह्मन्ताव? पिरथुमींत धरम न्हायलाच न्है? न्हाय न्हाय व बाय, माज्यापून अस कंदी—"

सखू अधिकच रडूं लागली. आतां मात्र राधाबाईला तिची काकळूत आली. शांत स्वरानें त्या ह्मणाल्या "सखू, तुला थोडीशी अक्कल असती, तर तूं मला विचारूनतरी गेली असतीस. आमचं घर कांहीं दहावीस कोसांवर नव्हतं!"

सखूनें डोळे पुसले व मान हालवून ह्मटलें "व्हय व्हय. तवा न्हाय व मन्नी ही बूद जाली. आजपून मी असी कंदी फसनार न्हाय. आतां माज्या ध्येनांत आलं."

राधाबाई ह्मणाल्या "बरं, काय ग सखू! तुला पाहिल्याबरोबर तिथलीं माणसं काय बोललीं?"

सखू ह्मणाली "काय सांगूं बाय! समदी मानस गोदळूनशेनी ग्येली. कुनाला कायबी उमगना! वैनीबाय काय झंगाली ऐकल्याशी 'आमी आतां कंदीबी सासऱ्या जावाची न्हाय. झातारी खायासबी देत न्हाय आन् रातदीस तरास देऊनशेनी, ब्येजार करते!' आन् बाय दुसरांबी काय काय बोलत व्होती. मन्नी सांगायापून सरम वाटंती—"

सखूनें सांगितलेली ही हकीगत ऐकतांच राधाबाईच्या अंगाचा तिळपापड झाला. त्या रागानें कांपतकांपत ह्मणाल्या "ब-रं, ब-रं, आतां कधीं इकडे येणारच नाहीं वाटतं? बरं आहे, समजेल मग सारं!"

## गोष्ट गांवभर पसरली.

सखू पुढें ह्मणाली "बाय ह्मोरच त आयका. वैनीबायचा भाऊस ह्मंगाला 'न्हाय न्हाय, आतां आमी कंदीबी तायला सासऱ्या धाडनार न्हाय' आन् लक्सीमीला तिचा बापुस धाडित न्है त्येंपुन वैनीबायन् समद्या लोकांस सांगल! बाय, तवा की नाय, समद् लोक हसाया की व्हो लागल!"

हें ऐकतांचतर राधाबाईचा क्रोधानल अधिकच भडकला. त्या रागानें डोळे गरगर फिरवूं लागल्या. बराच वेळपावेतों स्वतांशींच जळफळून शेवटीं ह्मणाल्या, "मला जर हें अगोदरच कळतें, तर मीं सदूला आज तिकडे पाठविलाच नसता. बरं सखू, इकडे पहा! ही गोष्ट गांवांत अगदीं कुण्णाला सांगूं नकोस बरं. नाहींतर आपली भकत जाशील ज्याच्यात्याच्याजवळ!"

सखू जरासा गंभीरतेचा आविर्भाव आणून ह्मणाली "अस व्हो काय बोलत्याशी तुमी! ह्यं काय कुनाला सांगायासारं हाय?"

आणखी एकदोन सांत्वनाचे शब्द बोलून सखू तेथून निघाली. घराच्या बाहेर आली मात्र, कांहीं केल्या तिच्या पोटांत ही गोष्ट राहीना! सखूला राधाबाईंनीं ही गोष्ट कोणापाशीं बिलकूल बोलूं नको असें निक्षून सांगितलें होतें, तरीसुद्धां ती गोष्ट कोणालातरी कळवीपर्यंत तिच्या अंतःकरणाला चैनच पडेना. बाहेर जाऊन ही पुडी कोणापुढेंतरी कधीं एकदा सोडीन, असें तिला झालें होतें. परंतु बिचारीचें खडतर दुर्दैव कीं, साऱ्या रस्त्यामध्यें तिला कोणी चिटपांखरूंहि आढळेना! आतां मात्र सखूच्यानें धीर धरवेना. रस्त्याला लागूनच एक सुताराचें घर होतें त्यांत ती शिरली व मोठमोठ्यानें ह्मणते "काय करत्याशी व्हो सुतारीनबाय? तुमी आयकलाव काय?"

सुताराची स्त्री या वेळीं स्वयंपाकघर सारवीत होती. हातांतलें काम तसेंच अर्ध्यावरच सोडून ती घाईघाईनें बाहेर येऊन विचारूं लागली "काय काय व्हो ह्मनतांव सकूबाय?"

सखूनें इकडेतिकडे चोरासारखें बारीक नजरेनें पाहिलें आणि कोणी जवळपास नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर हळूहळू राधाबाईच्या सुनेची सगळी हकीगत आपल्या पदरचें बरेंचसें तिखटमीठ लावून तिला सांगितली; व शेवटीं ह्मणाली "बायन ह्यं कुनासबी सांगू नको ह्मनशेनी मन्नी सांगल है. तवा ह्यं सांगून मन्नीतरी काय मिलायच हाय? आपुन आपलीं गरीब मानस—तेंच्या अन्नापान्यावर वाढलों हाव, त्येंचा उनां उगडां करूं तर आमी नरकांत न्है पडणार? तुमान्नीं कस वाटत्ये?"

सुताराची स्त्री किंचित् हंसून ह्मणाली "तर ?"

याप्रमाणें रस्त्यामध्यें जें जें कोणी ह्मणून सखूला भेटलें त्यालात्याला ता असच सांगत गेली. साहजिक गांठ पडणाराची ही हकीगत झाली; परंतु तिची ज्या कोणांशीं यत्किंचित् ओळख होती, त्यांनांतर निजलेलें जागें करूनहि सखूनें ही हकीगत सांगितली. अर्थात् हांहां ह्मणतां ही गोष्ट गांवभर पसरली.

---

## प्रकरण सहावें.

### विनोबांची संसारदक्षता.

सकाळीं आठांच्या सुमारास विनोबांची स्वारी वेड्यावांकड्या तोंडानें 'ऊं-ऊं-अं-अं-ऊं-हूं—' करीत अंगाला आळेपिळे देत एकदांची आंथरुणावरून उठली. पुढें प्रातर्विधि उरकेपर्यंत नऊहि केव्हांच वाजून गेले. तदनंतर स्वारीच्या दिनक्रमास प्रारंभ झाला. पहिल्यानें चिलमीची तयारी केली. सगळ्या गोष्टी चुकतील, पण विनोबा घराबाहेर पडण्यापूर्वीं चिलमीचे चार दम मारण्यास चुकले, असें आजपर्यंततरी कधीं घडल्याचें ऐकिवांत नाहीं. असो. धुऊनचोळून साफ केलेल्या त्या अत्यंत प्रिय वस्तूचें—गांजाचें—चारसहा झुरक्यांत समग्र तत्व शोषण करून, मोठ्या ऐटीनें तोंडावाटे धुराचे लोटच्या लोट सोडीत खांबाशीं पाठ टेंकून विनोबा बसतात न बसतात इतक्यांत "विनू, अरे विनू! अरे दहा वाजायला आले अन् अजून तुझं आटपतच नाहीं ? यापुढं तूं बाजारांत जाणार केव्हां—सामानसुमान आणणार केव्हां—नि जेवायचं होणारतरी केव्हां ? काय बाई करावं या मुलाला ! घरांत तांदळाचा एक दाणा—"

"त्याला ग काय उशीर ? हा अस्सा परत आलोंच ह्मणून समज !" असें ह्मणून विनोबांनीं खांद्यावर उपरणें टाकिलें आणि डोक्याला टोपी चढविली. घरीं काय काय जिन्नस आणायाचे, तेंहि आईपासून विचारून घेतलें. आतां बाहेर पडणार, इतक्यांत स्वारीला स्मरण झालें, कीं बाजारांत जावयाचें कशाला ? जवळ पैसा असल्याशिवाय का बाजारांतील जिन्नस घरीं येते ? विनोबांजवळतर एक फुटकी कवडीहि नव्हती. आणि ती असेलतरी कोठून ! बिचाऱ्यांला कांहीं उद्योग नव्हता कीं धंदा नव्हता. त्याचप्रमाणें उद्योगधंदा करण्यास अवश्य लागणाऱ्या अकलेचें आणि त्यांचें फारा दिवसांपासून वैमनस्य ! त्यांतूनहि आठाकाळीं बारामाशीं दक्षिणेबिक्षणेची पावलीअधेली मिळालीच, तर ती स्वारीच्या जिवलग चिलमींत

केव्हांच जळून खाक व्हायची. त्या अधाशी चिलमीची क्षुधा ह्मणून कधींहि शांत होत नसे. जवळ पै, पैसा बिलकूल नसला ह्मणजे मग मात्र आमच्या विनोबांला चिलमीकरितां दुसऱ्यांची पायधरणी करावी लागे. आज कोठें स्वारीच्या ध्यानांत आलें, चिलमीची क्षुधा दुसऱ्याची पायधरणी करून भागण्यासारखी असते; परंतु शिंचें हें घरांत लागणारें सामानसुमान कांहीं लोकांच्या हातापायां पडून मिळण्याजोगें नाहीं. याला खिशांत पैसेच असले पाहिजेत! विनोबा अगदींच ओशाळले व जमिनीकडे तोंड करून वेड्यासारखे उभे राहिले.

मुलाची ही स्थिति राधाबाईच्या चटकन् ध्यानांत आली. काय करते बिचारी "मेल्याला अक्कल नाहीं–वसू माजला आहे मेला–खाईल मात्र साडेतीन खंडी—" वगैरे वगैरे बडबडत व चारदोन शिव्याहि हांसडीत स्वयंपाकघरांत जाऊन मोडक्या फडताळांतील मधल्या खणामध्यें जिऱ्याच्या बुडकुलींत, मोठ्या सायासांनीं सांठवून ठेवलेल्या सवाचौदा आण्यांपैकीं एक चवली काढून त्यांनीं विनोबांच्या स्वाधीन केली. चवली दृष्टीस पडतांच कोळशासारखें झालेलें विनोबांचें मुख एकदम प्रफुल्ल झालें. स्वारी ताबडतोब घराबाहेर पडून तडक बाजाराकडे चालती झाली.

विनोबा बाजारांत आले मात्र तोंच एका दुकानदारानें स्वारीला हांक मारली व तंबाकूची एक चिलीम पिऊन जाण्याविषयीं पराकाष्ठेचा आग्रह केला. विनोबांच्यानें दुकानदाराची भीड मोडवेना व चिलमीचाहि मोह तोडवेना. स्वारी बसली. चिलीम तयार होत होती, इकडच्या तिकडच्या गप्पाहि चालू होत्याच, हलुहलु दोन, तीन, चार–पांच–सहा–सात चिलमी झाल्या, तथापि गप्पा कांहीं पुऱ्या होईनात. विनोबाहि अगदीं तल्लीन होऊन गेले. आतां चांगला बारांचा अम्मल झाला होता.

वरील दुकानांत गोष्टी मारे ऐनरंगांत आल्या आहेत, इतक्यांत यज्ञेश्वरभट्ट दामले घाबऱ्याघुबऱ्या मुद्रेनें आले व विनोबांला तेथें बसलेले पाहून आश्चर्यानें ह्मणाले " वाः! कमाल केलीस गृहस्था? अरे सगळा गांव पालथा घातला, पण तुझा पत्ता? तूंतर इकडे चैनीनें गप्पा ऐकत बसला आहेस! ऊठ—ऊठ लवकर पळत जा कसा! ती हरभटाची काकू मृत्युपंथास लागली आहे— तिला साप चावला–स–स–साप. धाव लवकर ध–ध–म–म–मी त्या–त्या–लू मंत्र घालायाला घेऊन येतों—" असें ह्मणून यज्ञेश्वरभट्ट मोठ्या तांतडीनें

मांत्रिकाकडे धावतच निघून गेले. विनोबाहि ही हकीगत ऐकतांच एका क्षणाचाहि विलंब न करतां काकूच्या घरीं येऊन थडकले.

अरेरे! विनोबांनीं इतकी त्वरा केली, पण फुकट! त्या सर्वभक्षक निर्घृण काळाची त्वरा विनोबांच्याहिपेक्षां जास्त झाली. त्यानें केव्हांच म्हातारीचे प्राण हरण करून आपला रस्ता सुधारला होता. विनोबा येऊन पहातात तों काय जिकडे तिकडे सामसूम. मृत्यूचें साम्राज्य माजलें आहे. घरांत म्हातारीचें दुसरें कोणीहि नव्हतें. अर्थात् तिला पल्ल्याला पोहोंचविल्यावांचून विनोबांला सुटकाच नव्हती. इतक्यांत बाहेरून दामलेहि आले. विनोबांचें रडवें तोंड पहातांच त्यांनीं ताडलें, कीं, झालें, कारभार आटोपला. ते तसेच मागल्या पायीं परतले व शेजार पाजारची चारदोन मंडळी गोळा करून त्यांनीं लवकरच प्रेत स्मशानांत पोहोंचविलें. प्रेतक्रियेंतील अग्रेसरत्व आमच्या विनोबांनींच पत्करलें होतें; आणि दुसरें कोण पत्करणार? विनोबांला आपपर हा भावच नव्हता. बिचारा अगदीं साधा मनुष्य. आणि अनाथ, निराश्रित अशांचें काम करावयाला म्हणजे त्याला मोठी हौस वाटे. स्मशानांत सर्व मंडळी दूर झाडांच्या सावलींत बसून खुशाल पानतंबाखू झोडीत होती. परंतु आमचे भोळे विनोबा प्रखर उन्हांत एकसारखे दीड प्रहर चितेपाशीं राहून अग्नि प्रदीप्त करीत होते. म्हातारीचा दहनविधि उरकेपर्यंत चांगला संध्याकाळ झाला. नंतर नदीवर स्नानें वगैरे उरकून मंडळी घरीं परतली.

परत येतांना वाटेमध्यें आत्तां कोठें विनोबांला आठवण झाली, कीं 'आपण बाजारांत जिन्नस न्यायला आलों होतों व घरीं आई चुलीमध्यें विस्तव पेटवून बसली असेल.' स्वारीनें कनवटीला हात घातला, परंतु नदीवर स्नान करतांना कनवटीच्या पैशांनीं केव्हांच जलसमाधी घेतली होती, हें बिचाऱ्यांनां अजून कोठें कळलें होतें? आतां मात्र स्वारी जरा घाबरली. आम्हां आई कांहीं आपली बाकी ठेवणार नाहीं, खूपच शिव्या देईल, या भीतीनें भिऊन जाऊन आस्तेआस्ते विनोबा अंगणांत येऊन ठेपले. हळूच कानोसा घेतला, परंतु घरांत कोणाचीच चाहूल ऐकूं येईना. घटका दोन घटका रात्र होऊन गेली होती, तरीहि घरांत दिवासुद्धां लागला नव्हता. विनोबांनीं हळुहळू भीतिव्यंजक स्वरानें हांक मारण्यास सुरुवात केली "आई! आई! ए–आई–अ—"

तरीहि उत्तर नाहीं. तेव्हां विनोबांनीं पुनः एकदां मोठ्यानें "आई–ई–अ—" अशी हांक मारली. त्याबरोबर आकाशांत एकाएकीं जसा भयंकर गडगडाट

होतो त्याप्रमाणें राधाबाईंची गर्जना ऐकूं आली. " काळतोंड्या ! आत्तां घरीं परत येत आहेस ? एवढा वेळ तुझा बाजार होत होता ? मेल्या मरतास लवकर, म्हणजे सुटलें असतें तरी मी तुझ्या हातून एकदाची—"

आईची ही सादर संभावना ऐकतांच विनोबांच्या कोठें जिवांत जीव आला. त्यांना आईची खोड माहीतच होती. आपल्याला खूप शिव्या हांसडल्या आहेत तेव्हां आतां लवकरच आईचा क्रोधाग्नि शांत होणारच होणार, हें विनोबांनां पूर्ण माहीत असल्यामुळें त्यांनीं बोलण्याचें साहस केलें " आई ! ती बापडी हरभटाची काकू मरण पावली, तिच्या दहनाला गेलों होतों. बिचारी गरीब म्हणून कुणीहि येईना. अर्थात् मला तिकडे जावें लागलें. तूंच सांग आई अशा वेळीं चुकवाचुकव करणें देवाच्या घरीं मान्य होईल ?"

राधाबाई फारच खवळल्या. " जळलं तुझं लक्षण मेल्या ! मढीं जाळायलाच का तूं जन्मला आहेस ? तुझ्यावांचून दुसरं कुणीच का त्यांनां मिळत नाहीं ! नि लोकतरी मेले कसले दुष्ट पहा ! ह्या कामासाठीं मेले कसे माझ्या बाळाला धुंडाळ..त येतात ? दुसऱ्या कसल्या चांगल्या कामाच्या वेळीं मात्र मेल्यांनां याची आठवणसुद्धां होत नसते ! अन् तुझीतरी केवढी अक्कल ! बाजार करायला म्हणून तूं आपला घरांतून बाहेर पडलास, तो आपला कामधंदा सोडून परस्पर लोकांचीं मढीं जाळायलाच धावतोस ? तुला सरकारनें गांवांतला मुर्देफरास का नेमला त्याहे ? कुणी मेल्याची खबर लागली पुरे, चालला मेला निलाजरा धावत ! एवढा मोठा घोडा झालास, तरी अजून तुला संसाराचं अगत्य कुसं नाहीं ? तुला शहाणपण येणारतरी केव्हां ? मी मेली फुटक्या—"

म्हातारीचा राग समाप्त होण्याच्या सुमारास गंगायमुनांचें आगमन हें ठरकून व्हावयाचें ! त्याप्रमाणें ती कांहीं वेळपावेतों मनसोक्त रडली. डोळे आणि हृदय मोकळें झाल्यावर तिला मुलाची आठवण होऊन ती म्हणाली " विनू, बाबा तूं कांहीं खाल्लंबिल्लं आहेस तरी ? "

विनोबांनीं भीतभीतच उत्तर दिलें " छेः, हा वेळपावेतों घोंटभर पाणीसुद्धां कसलें तें प्यालों नाहीं ! "

हें ऐकतांच राधाबाईंचा क्रोधाग्नि पुनः प्रज्वलित झाला. त्यांचे ओंठ थरथरूं लागले व त्यांनीं लोकांनां शिव्यांची एकसारखी लाखोली वहाण्यास सुरुवात केली. "कायतरी मेल्यांची अक्कलपण ! माझं तान्हं बाळ भुकेनं तळमळलं, त्याची कुणा

एकालाहि मेल्याला आठवणतरी ? सत्तेनं बोलवायला मात्र येतात—मेले मांग कुठले—×—×—"

विनोबांनीं ताडलें, आपल्याला रोष दूर करण्याला हीच संधि छान आहे. ते मटकन् खालीं बसले व अगदीं केंविलवाणी मुद्रा करून बोलले " आई–ग ! आपल्याला बुवा फारच भूक लागली आहे. कांहींतरी खायला दे–हं–हं–"

आतांतर राधाबाईच्या रागाचें पाणीपाणी झालें. आतां कुठें त्यांनां काकूच्या मृत्यूबद्दल किंचित् दुःख वाटूं लागलें. त्यांच्या डोळ्यांतून एकदोन अश्रुबिंदुहि गळाले. तदनंतर मुलगा सारा दिवस उपाशी आहे ही गोष्ट म्हातारीच्या लक्ष्यांत आली. तिनें झटकन् दिवा लाविला व म्हणाली " ते पैसेतरी आण पाहूं इकडे."

विनोबा अगदीं चूप ! काय बोलावें हेंच त्यांनां सुचेना. शेवटीं मोठ्या प्रयासानें त्यांनीं भीतभीत उत्तर दिलें "स्नानाच्या गडबडींत कनवटीचे पैसे नदीमध्यें कुठें पडले त्याचें मला स्मरण नाहीं—"

" बेस केलंस बाबा. असंच करावं बरं !"

म्हातारीच्या रडण्यास पुनः सुरुवात झाली. थोडासा वेळ गेल्यावर तिचें रडणें बंद झालें. नंतर ती म्हणाली "तुझ्यासाठीं तर पोरा, रात्रंदिवस माझं हाडनूमास जळत आहे ? असाच कारे तूं संसार करणार ?"

विनोबांला आईच्या या भाषणाचें कांहींएक वाटलें नाहीं. ते पुनः करुणस्वरानें म्हणाले "आई, देना मला अगोदर कांहींतरी खायला ? मग तुला काय लागेल तें बोल. "

कितीहि झालें तरी आईचेंच अंतःकरण तें ! उठली तत्क्षणीं व घरांतून दोन मुठी पोहे आणून मुलाच्या पुढ्यांत तसेच कोरडे ठेवून म्हणाली "हे खा बाबा ! याशिवाय या वेळीं दुसरं कांहींएक नाहीं."

हें बोलतांना राधाबाईचे उभय नेत्र पुनः भरून आले.

पोहे दृष्टीच पडतांच विनोबांचा आनंद काय पुसावा ! त्यांचा यथेच्छ समाचार घेण्यांत स्वारी चूर झाली. राधाबाई जवळच पाय लांब करून बसल्या होत्या. त्यांनीं पुनः गंगायमुनांस पाचारण करून सुरुवात केली " अरेरे ! माझा बाळ सगळा दिवस उपाशीं राहिला, घांसभरदिखील अन्न बाळाच्या तोंडांत गेलं नाहीं. आग लागो त्या माझ्या जळल्या जिभेला. आई कुळस्वामिणी, माझ्या बाळाचं कल्याण कर. अंबाबाई ! माझ्या रक्ताचा तुला अभिषेक करीन.

माझ्या तोंडच्या शिव्या, माझ्या बाळांनां आशीर्वाद होऊं दे. माझं आयुष्य माझ्या दोन्ही मुलांनां, सुनांनां व माझ्या नातवांनां देऊन त्यांनां चिरंजीव कर. आई भवानी! मी तुझ्यापुढं पदर पसरतें, जळली मेली ती माझी जीभ— माझ्या बाळाला मीं उगीच—"

म्हातारीचें अंतःकरण अधिकच भरून येऊं लागलें. इकडे विनोबा पोहे यथास्थित रगडून वरती अर्धा तांब्या पाणी झोंकून ढेंकर देतदेत म्हणतात "आई, तूं रडतेस कां? शिव्या! ह्यः ह्यः ह्यः! अग त्या शिव्या नव्हत, ते आम्हांला आशीर्वादच आहेत, समजलीस? त्याचं ग एवढं काय घेऊन बसली आहे?"

"नाहीं बाबा, आजपासून मी तुम्हांला बिलकूल रागं भरणार नाहीं. माझीं गरीब—"

राधाबाई पुनः आंत गेल्या व आणखी मूठभर पोहे आणून त्यांनीं विनोबांच्या पुढें ठेविले. आतांतर विनोबांच्या आनंदास सीमाच राहिली नाहीं! पोह्यांवर आडवातिडवा हात मारून व वर पाणीहि यथेच्छ झोंकून स्वारी शांत झाली. तदनंतर नित्यक्रमाप्रमाणें चिलमीची एकवार प्रार्थना करून प्रफुल्ल मनानें विनोबा निजावयाला गेले. साऱ्या रात्रींत या कुशीवरून त्या कुशीवरसुद्धां झाले नाहींत. परंतु बिचाऱ्या म्हातारीला मात्र त्या रात्रीं झोंप कशी ती मुळींच आली नाहीं. तिचा विनू आज सगळा दिवस अन्नपाण्यावांचून राहिला, ही गोष्ट तिच्या मनांत घोळत असल्यामुळें बिचारी सारी रात्र बिच्छान्यावर तळमळत होती.

---

## प्रकरण सातवें.

### छिद्रान्वेषण.

दुसऱ्या दिवशीं बारा एक वाजण्याच्या सुमारास राधाबाईंचा स्वयंपाक तयार झाला. त्यांनीं विनोबांला जेवावयाला उठण्याला हांक मारिली. विनोबांची स्वारी हंसतहंसत येऊन पाटावर विराजमान झाली. भोजन उरकून हातावर पाणी पडतांच विनोबांनीं घरांतून पाय काढिला. मुलाचें जेवण उरकतांच म्हातारी जेवायला बसली. एकदोन घांस पोटांत गेले असतील नसतील, इतक्यांत शेजारच्या नान्याची आई तेथें हलुहलू येऊन दाखल झाली. येतांक्षणींच तिनें राधाबाईंनां प्रश्न केला "काकू! खरी का हो गोष्ट ही?"

राधाबाईंचें तोंड खर्कन् उतरलें. त्या बावरल्यासारख्या होऊन म्हणाल्या "कुणाची गोष्ट उमाबाई?"

# धाकट्या सूनबाई.

"पार्वतीनं ह्मणे इकडली एकूणएक हकीगत माहेरीं सांगितली! कायबाई त"

ह्मातारी अतिशयित संतापली. "सांगितली तर सांगितली. तिचा बाप मोठा माणूस असला ह्मणून तो कांहीं आमचं डोचकंतर नाहींना उडवायचा!"

उमाबाई ह्मणाल्या "त्यांची हो काय मगदूर लागली आहे? किती झालं तरी तुह्मी वरमाई आहां. त्यांनां तुमचीच मनधरणी करावी लागेल. पण काय हो, मी कुणाकडूनसं ऐकलं—खरं खोटं हरी जाणे–कीं, पार्वतीला आतां इकडे पाठविण्याला ह्मणे तिचा बाप कांहीं खुशी नाहीं अन् लक्ष्मीचा बापहि आपल्या मुलीला पाठविणार नाहीं! खरंच का हो हें राधाकाकू?"

राधाबाई रागानें थरथर कांपतकांपत ह्मणाल्या "नाहीं का मेले पाठविनात! माझ्या सदूचं मी पुनः लगीन करीन. तेराशें सत्त्याण्णव पोरी आतां माझ्या मुलाच्या पायांवर येऊन पडतील—"

नान्याची आई ज्या उद्देशानें आली होती, तो तिचा उद्देश सिद्धीस जाण्याचें यत्किंचितहि लक्षण न दिल्यामुळें ती बिचारी अगदींच हिरमुसली झाली. अरेरे! एवढी मोठी महत्वाची गोष्ट, आणि साऱ्या गांवभर डंका गाजल्याविना गुपचूपपणें पसार व्हावी, हें चांगलेंतरी दिसतें? मग हो बायकांच्या जन्मास आल्याचें काय सार्थक! पुनः एकवार प्रयत्न करून पहावा असा पोक्त विचार करून नान्याची आई ह्मणते "काय हो राधाकाकू, तुमच्या सुनेची ही अक्कल तरी—"

"माझ्या सुनेची अक्कल किती आहे हें मला पुष्कळ दिवसांपासून माहित आहे, तें आतां नव्यांनं समजून घ्यायला नको कांहीं!"

हर हर! या उत्तरानेंतर बिचाऱ्या उमाबाई अगदींच निराश होऊन गेल्या. तोंड खारट करून त्यांनीं तेथून आस्तेआस्ते प्रस्थान केलें. उमाबाई निघून जातात न जातात तोंच त्या स्थळीं यमुनाबाईचें शुभागमन झालें अर्थात् बिचाऱ्या ह्मातारीच्या भोजनांत हें एक दुसरेंच विघ्न येऊन पडलें! यमुनाबाई किंचित् कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें विचारूं लागल्या "काय हो काकू, तुह्मीं ह्मणे पार्वतीला घरांतून हांकलून दिलीत?"

"कुणीं अवदसेनं ग तुला हें सांगितलं?"

यमुनाबाई आणखीहि चीड येण्याजोग्या शब्दांनीं ह्मणाल्या "सगळ्या गांवभर जी गोष्ट झाली, ती आतां छपून कां राह्यची आहे काकू?"

# छिद्रान्वेषण.

राधाबाई किंचित् थंड आवाजानें ह्मणाल्या "माझ्या सुनेला मी मारीन, घालवून देईन, कीं काय हवें तें करीन, त्याबद्दल गांवांतल्या लोकांच्या पोटांत कां चावतं? दुसऱ्यांच्या पंचाइती करायला यांनां मेल्यांनां सांगितलं आहे कुणीं?"

अरेरे, हें कांय झालें! बिचाऱ्या यमुनाबाईंची सर्व आशा फिसकटून गेली. बाईसाहेबांचा आवाज अगदींच नरम पडला. तो गरम करण्याला त्यांनां कोणतीच युक्ति सुचेनाशी झाल्यामुळें "मीतरी तेंच ह्मणतें—"असें कांहींतरी बडबडत-बडबडत यमुनाबाईंनींहि मागल्या पायांनींच आपल्या घरचा रस्ता सुधारला.

राधाबाईंनीं पुढ्यांतील त्या थंडगार झालेल्या अन्नाकडे पुनः लक्ष्य लाविलें. परंतु खडतर त्यांचें दुर्दैव,कीं, त्यांच्या नशिबांत आज जेवण लिहिलेंच नव्हतेंसें दिसतें. यमुनाबाईंनां गेल्याला चारदोन पळें झालीं असतील नसतील, तोंच शेजारच्या वाडींतील झाळसाबाई मोठ्या घाईघाईनें राधाबाईंच्या घरीं येऊन थडकल्या. झाळसाबाई ह्मणजे कांहीं अशातशांतलें प्रकरण नव्हतें! गांवांतील सर्व लोक त्यांनां व विशेषतः त्यांच्या त्या शिवऱ्या तोंडाला फारच भीत असत. दारांत पाऊल ठेवतात न ठेवतात तोंच त्यांनीं एकदम सुरवात केली "आग लागो ग तुझ्या त्या वयाला! एवढी थेरडी झालीस नि सुनेला व पोराला मारून हांकलून लावतांना तुला कांहींच कशी शरम नाहीं वाटली! थू तुझ्या अकलेवर—"

रावाबाईंचा राग आतां मात्र अगदींच अनावर झाला. त्या अति संतप्त होऊन ह्मणाल्या "कोण ग अवदसा असं ह्मणते ती? रांडा—"

झालें. धुतल्या पायींच झाळसाबाईंचा मनोरथ सिद्धीस गेला. यापेक्षां त्यांनां दुसरें काय हवें होतें? त्यांनीं एकदम आपला स्वर सप्तमांत चढविला. "रांडे! कुणाला ग अवदसा ह्मणतेस तूं? कोण मी अवदसा? अग थेरडे! तुला ह्मातार-चळ लागला वाटतं! तूं × ×—तुझी × ×—× ×—"

राधाबाई त्वेषानें थरथर कांपूं लागल्या. पुढ्यांतलें पान भरदिशीं लोटून त्या तशाच उठल्या आणि मग त्या दोघींमध्यें एक अपूर्व शब्दांचें, अपूर्व वाक्य-सरणींचें व अपूर्व हातवाऱ्यांचें तुमुल रणकंदन सुरू झालें.

अहो वाग्युद्धामध्यें सदा विजयी होणाऱ्या—क्षणार्धांत पृथ्वीलाहि रसातळास पोहोंचविणाऱ्या वीर स्त्रियांनों! आपलें तें अपूर्व वाक्चातुर्य, तें अप्रतिम युद्धकौशल्य आणि ते लोकोत्तर हावभाव, यांचें यथार्थ वर्णन करण्याचें सामर्थ्य आमच्या अशक्त लेखणीच्या अंगीं मुळींच नाहीं. यास्तव त्या नादाला न लागतां आह्मी आपल्याला दुरूनच साष्टांग नमस्कार करितों!

# धाकट्या सूनबाई.

शेवटीं संग्रामाचा शेवट झाला. बिचाऱ्या राधाबाई पूर्णपणें पराभूत झाल्या. त्या कजाग म्हाळसाबाईपुढें बापड्या त्या साध्याभोळ्या म्हातारीचा काय टिकाव लागणार? म्हाळसाबाई रणांगणांत विजयी होऊन आपल्या चीत्कारानें दिग्दिगंतर कंपायमान करीतकरीत निघून गेल्या.

---

## प्रकरण आठवें.

### पार्वतीबाईचें माहेरघर.

सदोबांच्या सासरचें गांव कांहीं अगदींच खेडेगांव नव्हतें. म्युनिसिपालिटी, पोलिसस्टेशन, धर्मार्थ दवाखाना, इंग्रजी मराठी शाळा, लायब्ररी वगैरे सर्व कांहीं येथें आहे. ब्राह्मण, प्रभु, सोनार, कासार, माळी, कुणबी, न्हावी, धोबी वगैरे सर्व जातींचे लोकांची या गांवीं वस्ती आहे. त्यांतहि ब्राह्मणमंडळीचें वर्चस्व जास्त आहे. मुसलमानांचींहि थोडींबहुत घरें येथें आहेत; परंतु तीं गांवाच्या बाहेर अगदीं एका टोंकाला. बाजारपेठेवरून एक फेरी मारून आल्यास हा गांव बराच समृद्ध असावा असें पाहणाराला वाटेल. त्याचप्रमाणें येथील लोकांचे आचार-विचार बारकाईनें पाहिल्यास या गांवाला खेडेगांव असें कोणीहि म्हणणार नाहीं. जर कोणाला याबद्दल कांहीं शंकाच असेल, तर हीं पहा येथें मगजशांतीचें रक्तवर्ण विलायती औषध विकण्याचीं दोनतीन भपकेदार दुकानें प्रसिद्ध प्रसिद्ध जागीं दिसत आहेत. गांवठी दारूचेहि कित्येक पिठे मधूनमधून झळकत आहे-तच! त्याचप्रमाणें रात्रीच्या वेळीं विश्वयोषितांच्या मंजुल कंठरवास मधूनमधून उत्तेजन देत असलेला, सारंगी, सतार, बीन इत्यादि मनोहर वाद्यांचा सुमधुर ध्वनि, रस्त्यांतून जाणाऱ्यायेणाऱ्या शौकी मंडळीच्या कर्णरंध्रांत प्रवेश करून त्यांस तल्लीन करीत आहे. अशा गांवाला का आपण खेडेगांव म्हणाल?

रामचंद्रपंत सहस्रबुद्धे हे येथील एक सुप्रसिद्ध सावकार आहेत. पूर्वी हे मुंबईत रेल्वेचे एक बडे कांट्र्याक्टर होते. त्या कांट्र्याक्टामध्यें यांनीं विपुल पैसा कमावून नंतर तो धंदा सोडून दिला. आतांतर हे सर्वसंगपरित्याग करून ईश-चिंतनांत मग्न होऊन राहिले आहेत!

यांच्या वडील कन्येचें नांव गंगाबाई. बिचारी बालविधवा असल्यामुळें बापाच्या घरची एकंदर व्यवस्था हल्लीं हीच पहाते. या मुलीमागून रामचंद्रपंतांनां नारायण-राव आणि माधवराव असे दोन पुत्र झाले होते. पैकीं थोरला स्वर्गवासी झाल्याला

आज अडीच वर्षें झालीं. त्याची विधवा स्त्री हतभागिनी लक्ष्मीबाई, आपल्या अज्ञान बालकासहित आपल्या माहेरींच रहात आहे.दुसरे चिरंजीव माधवराव.यांचें पहिलें कुटुंब निवर्तल्यामुळें त्यांनीं नुकताच दोन वर्षांपूर्वी द्वितीयसंबंध केला आहे. त्यांच्या पत्नीचें नांव मनोरमा.रामचंद्रपंतांचें शेवटचें अपत्य गोदूताई.हीच आमच्या सदूभाऊंची गृहिणी. आमच्या राधाबाईच्या थोरल्या सूनबाई पार्वतीबाई–त्या ह्याच! गोदूताईच्या मागून रामचंद्रपंतांनां कांहींएक संतति झाली नाहीं. त्यांची पत्नी इहलोकची यात्रा संपूर्ण करून त्यांनां विरहदुःखांत लोटून गेल्याला आज नाहीं ह्मटलें तरी चांगलीं आठदहा वर्षें होतील. वृद्ध रामचंद्रपंत पत्नी निवर्ततांच दुसरा विवाह करण्याच्या भरीस पडले नाहींत, हें आजकालच्या स्थितीच्या मानानें पाहिलें असतां एक आश्चर्य खरें. परंतु असो!

रामचंद्रपंतांचें वय हल्लीं जवळजवळ सत्तरांवर असतांहि त्यांच्या शरीराकडे पाहिलें असतां त्यांची उमर इतकी जास्त असेल, असें कोणालाहि वाटणार नाहीं. गांवांत यांचें वजन बरेंच असून मानमरातब व दराराहि मोठा आहे. कां नसेल ? कांचनाचा सारा महिमा ! तें ज्याच्यापाशीं आहे, तो कसाहि असो '—तोचि पंडित; कुलीन तो, तोचि गुणी, बहुश्रुत.—' मग रामचंद्रपंतांना गांवांतील सर्व लोक वचकतात, यांत नवल तें कसलें ?

हल्लींहल्लींतर ते या मायामय जगतांतील ऐहिक गोष्टींचा परित्याग करून केवळ परमहंस बनले आहेत. मंत्रतंत्र ह्यांचीहि त्यांनां पूर्ण माहिती आहे. अष्टांग योगसुद्धां ते करीत असतात! धंद्यानिमित्तानें हे एकदां उत्तर हिंदुस्थानांत गेले होते. तेथें यांची व एका अवलियाची गांठ पडली होती. त्याच्याचपाशीं यांनीं योगाभ्यासाची दीक्षा घेतली. गुरुमहाराजांवर यांची पराकाष्ठेची अचल भक्ति. गुरुकृपेनेंच आपलें सर्व कांहीं बरेंवाईट झालें आहे व होत .आहे, हा मनींचा दृढ विश्वास. अजूनहि कधींकधीं गुरुमहाराज यांनां दर्शनलाभानें कृतार्थ करीत असतात!

रामचंद्रपंतांनीं सर्वसंगपरित्याग करून ईशचिंतनांत आयुष्य घालविण्याचा जरी कृतसंकल्प केला आहे, तरीहि दिवाणी आणि फौजदारी मुकद्दमे वारंवार त्यांच्या योगसमाधींत विघ्न आणतातच. रामचंद्रपंतांचा ज्यांच्याशीं विशेष परिचय नाहीं, ते, त्यांच्या बाह्य आचरणावरून त्यांनां मोठे साधुपुरुष मानितात. परंतु त्यांच्याशीं कोणत्याहि कारणामुळें ज्यांचाज्यांचा ह्मणून थोडाबहुत संबंध घडला, ते लोक त्यांच्याविषयींच्या नानातऱ्हेच्या कंड्यांचा गुप्तपणें खल करीत

असतात. गांवांत अशीहि एक गप्प प्रसिद्ध आहे, कीं, गांवांबाहेरील चंडिका देवी यांनां प्रसन्न आहे व ती यांनां कधींकधीं घोर आणि अंधकारमय रात्रीमध्यें दर्शनहि देत असते !

रामचंद्रपंतांची बाह्य आकृति कोणाच्याहि मनांत त्यांच्याविषयीं भक्तिभाव उत्पन्न करण्याजोगी आहे. त्यांचा तो स्थूल उंच देह, तप्त कांचनासारखी उज्वल अंगकांति, गळ्यांतील त्या सुवर्णखचित रुद्राक्षमाळा, इत्यादि देखाव्यामुळें साहजिकच उत्पन्न होणाऱ्या भक्तींत आणखी विपुल संपत्तीची भर पडलेली. मग काय, मणिकांचनाचाच योग !

वडिलांचें हें धर्माचरण नारायणरावांनां मात्र मुळींच पसंत नव्हतें व याचमुळें पितापुत्रांत वारंवार कलह होतं. नारायणराव कांट्राक्टाचा धंदा करून त्यांत दोन पैसे कमावीत व याच कारणामुळें रामचंद्रपंत त्यांला किंचित् वचकून असत; परंतु बिचारे अकालीं मृत्युमुखीं पडून त्यांनीं आपल्या वडिलांचा मार्ग निष्कंटक केला. कर्तासवरता, हातातोंडाशीं आलेला तरुण मुलगा एकाएकीं मरण पावल्यामुळें सर्व गांव हळहळला. तथापि रामचंद्रपंतांस मात्र त्याबद्दल विशेष दुःख झाल्याचें त्यांच्या वर्तनावरून तरी दिसून आलें नाहीं. पंतांचें हें अमानुष—राक्षसी—वर्तन पाहून ज्यांनां ज्यांनां ह्मणून यांच्याविषयीं अंतस्थ प्रकार ठाऊक होता, त्यांनीं त्यांनीं मनामध्यें या मांगाला असंख्य शिव्या दिल्या; परंतु ज्यांनां आंतील खरा प्रकार माहित नव्हता, त्यांनीं यांनां 'मायामोहविवर्जित साधुपुरुष' असें समजून यांची फार प्रशंसा केली.

कनिष्ठ चिरंजीव माधवराव हे मुळापासूनच वडिलांचे अत्यंत आवडते होते. वडील बंधूच्या पश्चात् कांट्राक्टचा धंदा हेच चालवूं लागले. यांनीं मुंबई विश्वविद्यालयांतून बी. ए. ची पदवी संपादन केली होती. पुढें एल् एल्. बी. लाहि जाण्याचा त्यांचा विचार होता; परंतु दुर्दैवानें याच संधीस वडील बंधु नारायणराव निवर्तल्यामुळें वडिलांच्या सांगण्यावरून त्यांनीं वकिलीचा नाद सोडून दिला आणि हा कांट्राक्टचा अधिक फायदेशीर धंदा ते करूं लागले. नारायणरावांच्या मृत्यूनंतर रामचंद्रपंतांनीं महत्त्वाचीं दोन कामें केलीं. कंट्राक्टचा धंदा माधवरावांच्या नांवावर करून दिला आणि नारायणरावांच्या विधवा स्त्रीला—लक्ष्मीबाईला तिच्या बापाच्या घरीं घालवून दिलें. त्या दिवसापासून बिचाऱ्या वैधव्यपंकांत रुतलेल्या त्या दुर्दैवी स्नुषेचा किंवा तिच्या अनाथ अर्भकाचा कधीं फुकटचा समाचारसुद्धां त्या पाषाणहृदयी रामचंद्रपंतांनीं घेतला नाहीं !

## पार्वतीबाईचें माहेरघर.

माधवराव आंतून काय पाहिजे तें करोत, परंतु बाहेरून अगदीं वडिलांच्या मताप्रमाणें वागत असत. ते अर्धमुर्धे साहेबच बनले होते ह्मटलेंतरी चालेल. कोणत्याहि धर्मावर त्यांचा मुळींच विश्वास नव्हता; तरीसुद्धां स्वताला ते मोठे धार्मिक ह्मणवीत ! आपल्या लोकांचे कित्येक आचारविचार त्यांनां अगदीं नापसंत वाटत, तथापि वडिलांच्या समोर आपलें कोणतेंहि मत उघड न करितां ते नेहमीं त्यांच्याच मताला अनुमोदन देत आणि यामुळेंचतर ते वडिलांनां अगदीं प्रिय झाले होते.

या ठिकाणीं रामचंद्रपंतांची ज्येष्ठ कन्या गंगाबाई हिचा वाचकांनां थोडासा परिचय करून देणें इष्ट आहे. आह्मीं पूर्वीं सांगितलेंच आहे, कीं, ही बालविधवा होती आणि ह्मणूनच वडील तिला फार आदरानें वागवीत. परंतु याचा परिणाम असा कांहीं विलक्षण झाला होता, कीं, गंगाबाईच्या दर्पानें पृथ्वीसुद्धां कंपायमान होत होती ! तिच्या स्वभावांत एक विशेष गोष्ट ही असे, कीं, तिला कोणाचेंहि बरें ह्मणून डोळ्यांनीं पहावत नसे. ती स्वतः विधवा झाल्यापासून मनामध्यें रोज देवाची प्रार्थना करी कीं "देवा, जगांतील सर्व स्त्रियांनां मजप्रमाणेंच विधवा कर !" कोणा तरुण स्त्रीचा पति मृत झाल्याची दुःखद बातमी ऐकिली ह्मणजे तिला पराकाष्ठेचा आल्हाद होई. मत्सर, द्वेष, दर्प, अहंकार आणि अत्यंत अनुचित अभिमान, यांची जीवंत प्रतिमा जर कोणाला पहावयाची असेल तर त्यांनीं आमच्या या गंगाबाईचें एक वेळ दर्शन घेतल्यास त्याची मनकामना खरोखरच पूर्ण होईल !

रामचंद्रपंतांची कनिष्ठ कन्या गोदावरी, अर्थात् आमच्या सदूभाऊंची पत्नी पार्वतीबाई यांचा कांहीं आणखी नव्यानें परिचय करून देण्याची आवश्यकता नाहीं. त्यांच्यासंबंधीं इतकेंच सांगितलें असतां पुरे होईल, कीं; त्या गंगाबाईच्या कनिष्ठ भगिनी, अर्थात् रूपांत, गुणांत आणि इतर सर्व गोष्टींत त्या गंगाबाईपेक्षां कनिष्ठच होत्या.

---

## प्रकरण नववें.

### जामातांची श्वशुरगृहीं संभावना.

सदूभाऊ त्याच दिवशीं सायंकाळीं सासरीं येऊन पोहोंचले. श्वशुर ओटीवरच उभे होते; परंतु त्यांनीं जामातांचा विशेषसा आदरसत्कार केला नाहीं. सदूभाऊंनीं नमस्कार करतांच "खुशाल आहां ना?—" एवढेंच विचारून ते आपल्या

व्यवसायाला निघून गेले. सदूभाऊ दिवाणखान्यांत जाऊन एकटेच बसले. त्यांनां पाहून एका चाकरानें त्यांच्या पुढ्यांत पानसुपारीचें तबक आणून ठेविलें. ते पान खात बसले आहेत, इतक्यांत माधवरावांची स्वारी सायंकाळची हवा खाण्यासाठीं बाहेर जाण्याच्या तयारीनें बुटांचा कर्रर कर्रर शब्द करीत आली. मेहुण्यांस पहातांच ते आश्चर्यचकित होऊन ह्मणतात "अरे कोण! सदाशिवराव? कुठें वाट चुकलां—"

सदूभाऊंनीं नम्रपणें उत्तर दिलें " एक वेळ आपली भेट घ्यावी ह्मटलें."

"काय ह्मणतां! एवढा अनुग्रह? हं हं! बरें तें जाऊंद्या, खरेंखरें काय तें सांगा पाहूं."

"आपली वहीण रागावून आली आहे, तिला न्यायला आलों आहें."

" नेऊन मारूनबिरून टाकायचा विचारतर नाहींना ?"

" मारून टाकायची? ती कशी बुवा!"

" गळ्याला फांस लावून, नाहींतर अन्नावांचून उपासमार करून!"

हे शब्द ऐकतांच सदूभाऊ रागानें लाल झाले. परंतु त्या वेळीं राग आंतल्या आंत गिळून ते ह्मणाले "आह्मी पडलों गरीब आणि ह्मणूनच आह्मांला असें टाकून बोलण्याला आपण धजलां."

"अहो गरीब असतां, तर असे प्रकार झालेच नसते! पोटभर खायला घालीत नाहीं तें नाहीं अन् वरती नानाप्रकारचीं दुर्वचनें बोलून तिला छळीत जा! अशानें तुमच्या घरीं माणूस कसें नांदावें? असह्य जाचणूक झाल्यावांचून का ती तुमच्या घरून निघून आली?"

"हें पहा, आपल्याला वाटतो तसा कांहीं आपल्या बहिणीचा स्वभाव नाहीं."

"तें कांहीं असो, तुह्मींतर तिला मारहाण करून घालवून दिलीत? ठीक आहे. तिचें पालनपोषण करण्याचें सामर्थ्य ईश्वरानें आह्मांला दिलें आहे. तुमच्या ह्मणण्याप्रमाणेंच कां होईना, ती वाईटना? मग हो कां तुह्मी तिला परत नेण्याकरितां आलां? बरें, तुह्मी आलांत, ठीक केलेंत; तुमची इथें राहण्यांची मर्जी असेल, तर तुमचेंहि पालनपोषण करण्यास आह्मी राजी आहों."

"त्या उद्देशानें कांहीं मी इकडे आलों नाहीं!"

" ठीक आहे. त्याचा विचार पुढें पहातां येईल. आतां जरा मी बाहेरून जाऊन येतों."

असें ह्मणून माधवराव मोठ्या ऐटीनें हातांतील काठी गरगर फिरवीतफिरवीत बाहेर निघून गेले. इकडे सदूभाऊ खिन्नवदन होऊन बसले. कांहीं वेळानें ते आल्याची बातमी समजतांच त्यांचे दोघे मुलगे जगू व दामू धावतच बाहेर आले. जगू त्यांच्या मांडीवर जाऊन बसला व दामू आपल्या चिमुकल्या दोन्ही हातांनीं त्यांच्या मानेला विळखा घालून त्यांच्या पाठीवर चढला. दोघेहि हर्षभरानें बापाच्या तोंडाकडे पाहूं लागले. आपल्या बोबड्या मधुर शब्दांनीं नाना तऱ्हेचे प्रश्न विचारूनविचारून त्यांनीं सदूभाऊंना अगदीं भंडावून सोडलें. पुत्रसुखाच्या भरांत सदूभाऊ सगळा अपमान विसरून गेले. त्यांचें मन प्रफुल्ल झालें. इतक्यांत आंतून एका मोलकरणीनें त्यांना घरांत येण्याविषयीं सांगितलें. सदूभाऊ उठले. जगू आणि दामूहि त्यांचें धोतर धरून नाचतबागडत त्यांच्याबरोबर आंत गेले.

सदूभाऊ आंत येऊन पाटावर बसतात न बसतात तोंच गंगाबाईनीं सुरुवात केली "काय बाई बोलावंतरी माणसांनीं ! तुमच्यानं दोन दिवसदिखील दम धरवेना अं ! अगदीं मागोमाग येऊन ठेपलांच ! तें असंच आहे हो ! दांत धड आहेत तोंवर त्यांचीं योग्यताच कुणी जाणत नाहीं. ते पडले ह्मणजे मग मात्र तीं बरोबर कळून येते! बरं, इतक्या तांतडीनं आलां, असं कामतरी काय योजलं आहे?"

" इला नेण्याकरितां आलों आहें."

गंगाबाई किंचित् तिरक्या दृष्टीनें वहिणीकडे पाहून ह्मणाल्या "काय ग बोल तुझ्या पाठीवरचे वळ वरे झाले का ?"

पार्वतीबाई तोंड वेंगाडून नाकपुड्या फुगवून वेड्यावांकड्या स्वरानें ह्मणाल्या "काय बोलायचं आहे ? 'नेन्याकरतां आलों' बोलायला कांहीं वाटतंय तरी !"

बायकोच्या तोंडचे हे विनययुक्त भक्तिपूर्ण कर्णमधुर शब्द एकतांच सदूभाऊ गारीगार होऊन गेले ! कांहीं वेळपावेतों त्यांच्या मुखांतून शब्दच निघेना. शेवटीं ते ह्मणाले "तुझ्यासारखी बेशरम स्त्री दुसरी कुठेंहि नसेल !"

पार्वतीबाईला तेवढेंच पुरलें. त्या पूर्वीपेक्षांहि मर्मभेदक स्वरानें ह्मणाल्या " आणि अब्रूचे कायते आपण, आपली आई आणि आपलीं सर्व माणसं ! जगांतली सगळी अब्रू कायती आपल्या घरांत भरली आहे ! मी बेशरम, माझी वहीण बेशरम, आमचीं सगळीं माणसं बेशरमी ! मग अशा अब्रूदार माणसांनीं आह्मां बेशरमी माणसांच्या घरीं झक मारायला यावं कशाला आपलं काळं तोंड घेऊन ?"

नवऱ्यावर इतकें तोंडसुख घेतल्यावर आपलें आरक्त मुख बहिणीकडे वळवून मोठ्या गंभीरपणाचा आव घालून त्या ह्मणाल्या "ताई ! तुझे मेव्हणे आले आहेत तुझ्याकडे. तुला काय पाहिजे तो तूं त्यांचा पाहुणचार कर, किंवा काय हवं तें कर. परंतु माझ्यासमूर कुणी आल्यास मी साफ सांगत्यें, मांझ्या बिलकूल कामीं पडायचं नाहीं !"

यावर गंगाबाईनीं कांहीं विलक्षण हातवारे करून उद्गार काढिले "मीतर बाई हा प्रकार पाहून थक्कच झाल्यें ! बायको रागवून आली आहे, तिची दोन गोड शब्दांनीं समजूत करावी,तिला आंजारावीगोंजारावी, तेंतर बाजूलाच राहिलं, उलट दारांत पाऊल टाकलं नाहीं तोंच भांडणास प्रारंभ ! वाटेंत कांहीं भांगबीग पिऊनतर नाहींना आलां ?"

सदूभाऊ एक दीर्घ निश्वास टाकून बोलले "ठी–क आहे. आह्मी दारू पिऊन आलों आहों ! बरें येतों आतां."

असें बोलून ते उठून जाऊं लागले. हें पाहून पार्वतीबाई आपल्या बहिणीस ह्मणाल्या "पाहिलंसना ताई, तूंजी ह्मणत असतेस 'तुजवर प्रेम आहे–प्रेम आहे' आला ना त्या प्रेमाचा आतां प्रत्यय ?"

मेहुण्यांनां खरोखरच राग आला आणि ते आतां खरोखरच जातील असें गंगाबाईस वाटतांच त्यांनीं पुढें होऊन त्यांचा हात धरिला आणि ह्मणाल्या "हें हो काय असं हें ? तिनीसांजा होऊन गेल्या अन् आतां कुठं जातां अशा अवेळीं ? आल्यासारखे आजची रात्रतर रहा, मग सकाळीं पाहिजेतर खुशाल जा."

बहिणीचा हा चवळपणा पार्वतीबाईंनां मुळींच रुचला नाहीं; परंतु यजमान पुनः खालीं बसले हें पाहून त्या पुढं कांहींएक बोलल्या नाहींत. बहिणीला मनांतल्या मनांत खूपच शिव्या देऊन त्या आपल्याशींच पुटपुटल्या "बरं आहे, आजची रात्र राहूंद्या, मग उद्यां सकाळीं कसे जातात तें पाहीन !"

सदूभाऊंचें आपल्या पत्नीशीं आणि मेहुणीशीं चाललेलें हें संभाषण आटोपतें आहे, इतक्यांत एक चौदा वर्षांची सुकुमार बालिका आपल्या मनोहर स्मितानें आणि लोकोत्तर लावण्यप्रभेनें चारी दिशा आनंदोत्फुल्ल करीत मंदगतीनें सदूभाऊंच्या मागें येऊन उभी राहिली व विचारूं लागली "दादा, आमच्या घरची सर्व मंडळी खुशाल आहेना ?"

बालिकेच्या मुखांतून हे विनययुक्त मंजुळ शब्द पुरते बाहेर पडतात न पडतात तोंच गंगाबाईची भयंकर कर्कश गर्जना ऐकूं आली. " कोण बेशरम

कारटी हो ही ! ! नणंदा ह्मणजे जशा कांहीं हिच्या खिसगणतींतच नाहींत ! आपली पोर मेली किंवा जिवंत आहे याची साताजल्मांतहि जीं आईबापं खबर घेत नाहींत, तीं खु-षा-ल आहेतना, ह्मणून मोठ्या दिमाखानं विचारायला आली. करायचीं आहेत काय असलीं आईबापं जगून नि मरून ? मीतर असल्यांचं नांव सोडून कधींच निश्चिंत होऊन बसल्यें असत्यें. सासुरवासिणीचा उद्धटपणा तरी पहाना कसा तो !"

शरविद्ध हरिणीप्रमाणें भयविव्हल चित्तानें बालिका इकडेतिकडे पाहूं लागली. नंतर आस्तेआस्ते तेथेंच एका कोपऱ्यांत जाऊन नी मटकन् खालीं बसली. आपली नणंदरूपी डाकीण या वेळीं तेथेंच होती, हें बिचारीला माहितच नव्हतें. धगधगीत अग्नीवर जलसेचन केलें असतां तो जसा निस्तेज होऊन जातो, त्याचप्रमाणें बालिका अगदीं निस्तेज होऊन गेली. तिची ती नयनाल्हादक लावण्याची अपूर्व प्रभा अस्तंगत झाली. तिच्या कोमल अधरावरील मधुर हास्यविकास लोपून गेला. उन्हानें करपून गेलेल्या अर्धवट उमटलेल्या सुकुमार पुष्पकलिकेप्रमाणें तिचें सौंदर्य एकाएकीं काळवंडून गेलें. ती निर्जीव, निस्तब्ध, निश्चल दिसूं लागली. आमचे सदूभाऊतर अगदीं थक्कच होऊन गेले, ह्या वेळपर्यंत त्यांच्या तोंडांतून एकहि शब्द निघाला नाहीं. अकस्मात् विद्युत्पात झाला असतां मनुष्य ज्याप्रमाणें दचकून जातें, त्याचप्रमाणें सदूभाऊ अगदीं दचकून गेले! कांहीं वेळ गेल्यानंतर ते ह्मणाले "हो यमू, तुझ्या घरची सगळी मंडळी खुषाल आहे वरें."

परंतु बिचाऱ्या यमूनें हे शब्द ऐकले कीं नाहींत, हें कांहीं सांगतां येत नाहीं. कारण ती तेव्हां केवळ मृतवत् पडली होती. बालिका यमू-मनोरमा, सदूभाऊंची मावसबहीण आणि आमच्या माधवरावजींची द्वितीयपत्नी होती, हें वाचकांस येथें सांगितलें पाहिजे.

पुनः वीज कडाडली. "अग, आज तुला इथं येऊन उणींपुरीं दोन वर्सं झालीं, तरीसुद्धां तुला त्यांतलं खरं काय तें समजलंच नाहीं वाटतं? त्या मेल्या काळतोंड्या बापाची खबर घेऊन तुला करायचं आहे काय आतां ? मलातर वाटतं सगळीं मरून गेलीं, साता पिढ्यांतदिखील कुणी उरलं नाहीं ! कुणी असतं, तर विचारपूस केल्यावांचून का राहतं ?"

इतक्यांत बाहेर बुटांचा कर्रर्र कर्रर्र शब्द ऐकूं आला. तेव्हां पार्वतीबाई ह्मणाल्या "जा वहिनी, ऊठ, दादा आला वाटतं. त्याला जेवायला वाढ जा."

बालिका हळूहळू उठून उभी राहिली मात्र, तोंच पुनः बिचारीवर विद्युत्पात झाला ! गंगाबाईनीं भयंकर स्वरानें उच्चारिलेले शब्द वज्राघाताप्रमाणें तिच्या कानांवर आदळले. "आपण नको कांहीं वाढायला जायला बरं ! नवऱ्यापुढं जायला कशी अगदीं एका पायावर तयार ! बेशरम कुठली ! चल निघ, आणि बैस जा खालीं, दुसरं कांहींतरी काम करीत ! सगळ्यांचीं जेवणंखाणं आटोपल्यावांचून जर वर आलीस तर खबरदार ! हें चुलींतलं कोलितच तुझ्या पाठींत घालीन!"

बालिका निमूटपणें हळुहळू खालीं गेली. जातांना फार जपून, कोणाच्या लक्ष्यांत येऊं नये, अशा रीतीनें तिनें एक दीर्घ निश्वास सोडिला आणि डोळ्यांत आलेले अश्रुबिंदु त्या डाकिणीच्या दृष्टीस पडतील या भीतीनें हळूच पुसून टाकिले.

सद्‌भाऊंचें जेवण वगैरे आटोपल्यानंतर पुनः गंगाबाईच्या व त्यांच्या अशाच कांहीं गोष्टी झाल्या. निजावयाची वेळ झाल्यामुळें त्या तेथून उठून जाऊं लागल्या. जातांजातां त्या आपल्या बहिणीस ह्मणाल्या "उगाच अशीं रात्रंदिवस भांडण नि तंटे करून मरतां कां ? चल—तूं आपली मजजवळ नीज चल. निजूंदे सदाशिवरावांनां इथंच."

पार्वतीबाईनीं तोंड वेडेंवांकडें करून "बरं बरं, तुला नाहीं कुणीं या पंचायती सांगितल्या," असें बोलून गंगाबाईला जोरानें दाराबाहेर ढकलून देऊन दरवाजा बंद करून घेतला. कडी नीट लावून परत येऊन पहातात, तों यजमान गालावर हात ठेवून कसलासा विचार करीत बसले आहेत. त्यांचा हात बाजूला करून पार्वतीबाई लडिवाळपणानें ह्मणाल्या "एवढा कसला बरं विचार चालला आहे ? मला नाहीं का सांगायचं गडे !"

"हो हो, न सांगायला काय झालें ! मी विचार करीत होतों, कीं, तुझ्या बहिणी-प्रमाणें मलाहि जर एक बहीण असती तर कितीतरी सुरेख झालें असतें !"

"काय सुरेख झालं असतं ?"

"मग तुझा हा सारा तोरा पार नाहींसा झाला असता."

पार्वतीबाईला याचा अर्थ बरोबर समजला कीं नाहीं कोण जाणे. परंतु या प्रसंगीं तरी कांहीं युक्तिप्रयुक्तीनें आणि विनयी भाषणानें त्या पतीचें मन हरण करण्याचा प्रयत्न करूं लागल्या. लवकरच उभयतांमध्यें प्रेमकलह चालू झाला.

वाचक, चला आपण आतां दुसरीकडे जाऊं. पतिपत्नींच्या एकांताचा भंग करण्याचा तुह्मांआह्मांला काय अधिकार आहे ?

## प्रकरण दहावें.

### बालसहधर्मिणी.

इकडे गंगाबाई ज्या तेथून निघाल्या त्या घाईघाईनें स्वयंपाकघरांत आल्या. माधवरावांचें भोजन अद्यापि व्हावयाचेंच होतें. गंगाबाईनीं ताट वगैरे वाढिलें. माधवराव इकडेतिकडे पहातपहात पाटावर येऊन बसले. जेवतांजेवतां ते बहिणीस ह्मणाले "ताई, तूंचशी वाढायला आलीस? बाकीचीं माणसें कुठें गेलीं? दुसरें कुणीच नाहीं कीं काय वाढायला?"

आपल्या पत्नीनें आपल्याला जेवायला वाढावें, जवळ बसून गोष्टी सांगाव्या, अशी माधवरावांची फार इच्छा होती; परंतु काय उपयोग! गंगाबाईनीं तावडतोब उत्तर दिलें "आणखी कोण येणार बाबा वाढायला? येऊनजाऊन तुझी बायकोच कीं नाहीं? ती का माणूस आहे? जसं एकादं जनावर! आली आहे आमचीं हांडं खायला!"

माधवरावांनीं एक मोठा सुस्कारा सोडिला व ते अगदीं खिन्न वदनानें जेवूं लागले. जेवतांजेवतां मनाशींच विचार करूं लागले "मीं हिच्या रूपाला भुलून केवढा अन्याय केला हा? हा गळफांस मीं कशाला व्यर्थ लावून घेतला?"

जेवण आटोपतांच माधवराव शयनगृहांत गेले. बिछान्यावर पडून मनोरमा आतां येईल, मग येईल, या आशेनें त्यांनीं कितीतरी वेळ या कुशीवरून त्या कुशीवर, त्या कुशीवरून या कुशीवर लोळण्यामध्यें घालविला. मनोरमेला येण्याला जसजसा विलंब होऊं लागला तसतसें माधवरावांचें मन विरक्त होऊं लागलें. शेवटीं जेव्हां सगळ्या घरादाराची निजानीज होऊन जिकडेतिकडे अगदीं सामसूम झालें, तेव्हां मनोरमा एकाद्या चोराप्रमाणें लपतलपत आस्तेआस्ते शयनगृहांत आली, व अगदीं जपून, बिलकूल आवाज होऊं न देतां तिनें दरवाज्याला कडी घातली. नंतर जळत असलेल्या दिव्याला निरोप दिला आणि अगदीं पायांपासून डोक्या-पर्यंत गुरफटून पांघरूण घेऊन ती पतीच्या एका बाजूला हळूच येऊन निजली.

माधवराव हा वेळपर्यंत जागृतच होते. पत्नीचा हा व्यवहार पाहून त्यांचें मन उद्विग्न झालें. आधुनिक सुशिक्षित स्त्रियांप्रमाणें आपल्या पत्नीनें प्रत्येक कामांत आपल्याला साहाय्य करावें, संसारामध्यें तीच एक आपली खरी सोबतीण व्हावी, उभयतांनीं एकमेकांशीं मोकळ्या मनानें वागावें, ही माधवरावांची मनापासून इच्छा; परंतु दुर्भाग्यक्रमानें त्यांची ही स्तुत्य इच्छा पूर्ण झाली नाहीं. त्यांच्या मनानें पक्कें घेतलें, कीं, मनोरमेची आपल्यावर अंतःकरणापासून प्रीतिच नाहीं.

अर्थात् अशा पत्नीपासून आपल्याला कधींहि सुख होणें शक्य नाहीं. त्या मुग्ध बालिकेच्या कोमल हृदयांतील गंभीर प्रेमाचा अनुभव घेण्याइतकी पात्रताच मुळीं त्यांच्या अंगीं नव्हती. थोडा वेळ गेल्यावर ते ह्मणाले "मनोरमे! तूं माझ्याशीं अशी कां बरें वागतेस? मीं तुजवर कितीतरी प्रेम करितों, तुला मनापासून सुख देण्यास झटतों, परं—"

बालिका मृदु मंदस्वरानें ह्मणाली "अगदीं हळू बोलायचं. नाहींतर कुणीतरी ऐकेल बाई!"

पत्नीच्या या उत्तरानें माधवराव अगदींच असंतुष्ट झाले. विरक्त होऊन कांहीं वेळपावेतों ते अगदीं स्तब्ध पडून राहिले, परंतु असें रहाणेंहि त्यांनां अगदीं असह्य झालें. ते बिछान्यावर धडपड करूं लागले. शेवटीं रागानें आणि अभिमानानें अस्थिर होऊन ते पलंगावरून उठले. या वेळीं मनोरमेनें मधुर शब्दांनीं पतीचा बाहेर जाण्याबद्दल निषेध करून विनययुक्त भाषणानें त्यांचा कोप शांत केला असता, तर पुढें घडणारा कितीतरी अनर्थ टळला असता; परंतु बालिकेला तितकें धैर्य झालें नाहीं. अशा प्रसंगीं आपण काय करावें, हें तिला मुळींच माहीत नव्हतें. कोठूनतरी त्या डाकिणी नणंदेच्या कानांवर आपला अस्पष्ट शब्द-सुद्धां जाऊं नये, एवढ्याविषयींच कायती जिवापाड खबरदारी घेण्याला ती नेहमीं तत्पर असे. परंतु इकडे हा आपला सर्वस्वी नाश कसा होत आहे, याची तिच्या त्या बालबुद्धीला कल्पनासुद्धां नव्हती.

माधवराव बाहेर आले. त्या वेळीं घरांतील सर्व मंडळी गाढ झोंपेंत गुंग झाली होती. जिकडेतिकडे शांततादेवीनें आपलें साम्राज्य पसरून टाकिलें होतें. मनुष्याचा शब्दहि ऐकूं येत नव्हता. सर्व जगत् त्या गंभीर रात्रप्रसंगीं निद्रावश होऊन अचेतन झालें होतें. निसर्गदेवता जणुं कांहीं कोणत्यातरी अचिंत्य अदृश्य शक्तीनें या वेळीं अगदीं निर्जीव होऊन राहिली होती. परंतु माधवराव मात्र या वेळींहि सचेतन होते. त्यांच्या अंतःकरणांत अग्नीचा भडका उठला होता. दारुण तापानें त्यांच्या हृदयांतील प्रत्येक ग्रंथी विच्छिन्न होत होती. त्यांच्यानें एका ठिकाणीं स्थिर रहावेना. ते त्या अंधकारमय भयंकर रात्रीं गच्चीवर इकडूनतिकडे एकसारखे फिरत होते. चिंतेनें त्यांचें मन अगदीं अस्थिर करून सोडिलें होतें. त्यांनीं आपली पराकाष्ठा केली, परंतु ती राक्षसीण चिंता कांहीं केल्या त्यांच्या मनाला सोडीना. ते अधिकाधिकच अस्थिर होऊं लागले. आतांतर त्यांच्यानें मुळींच धीर धरवेना. ते पुनः शयनगृहांत शिरले आणि

त्यांनीं दार बंद करून घेऊन दिवा लाविला, परंतु दिव्याच्या प्रकाशांत त्यांच्या दृष्टीस जें कांहीं पडलें, त्यानंतर ते अगदींच स्तंभित झाले. त्यांनीं पाहिलें, कीं, मनोरमा खुषाल घोरत पडली आहे! मनोरमेच्या आचरणानें व्यथित होऊन आपण रागानें धडपड करीत येथून गेलों; आपल्या मनाला किती तरी क्लेश झाले; परंतु हिला त्याचा कांहींएक विधिनिषेधहि नाहीं! ही आपली खुषाल घोरत पडली आहे!! आतांपर्यंत त्यांच्या मनांत ज्या गोष्टीबद्दल नुसता विचार चालला होता, ती गोष्ट आतां त्यांनीं अगदीं स्थिर केली. त्या विचारांनींच त्यांचें हृदय विव्हल करून सोडिलें, त्यांच्या मनाची अस्थिरताहि शतपटीनें अधिक वाढली. अखेरीस क्रोधवश होऊन त्यांनीं गाढ निद्रेंत असलेल्या त्या निर्दोष बालिकेला तिच्या केंसांचा बुचडा धरून खसकन् वर उचलली. याच वेळीं त्या बिचारीला स्वप्न पडत होतें कीं, ती नवऱ्याजवळ बोलत होती म्हणून तिची ती राक्षसीण नणंद केश धरून तिला मारीत आहे; परंतु त्या चांडाळणीच्या भीतीनें ती गरीब बिचारी पोरगी ओरडण्याससुद्धां धजली नाहीं. इतक्यांत तिची झोंपमोड झाली. तिनें डोळे उघडून पाहिलें, तों समोर नणंदेच्या ऐवजीं पति! दृष्टादृष्ट झाली मात्र, बालिकेची भीति पार निघून गेली आणि तत्क्षणीं त्या भीतीच्या जागीं लज्जेनें आपलें ठाणें दिलें. बालिकेनें मस्तक खालीं घातलें.

माधवराव क्रुद्धस्वरानें ह्मणाले "तूं मजजवळ अशी कां वागतेस याचें कारण मला आज कळलेंच पाहिजे! तुझ्या प्रेमाला मी अपात्र कां तें अगदीं स्पष्टपणें मला सांग?"

बिचाऱ्या अल्पवयस्क मनोरमेला मुळीं या प्रश्नाचा अर्थच समजला नाहीं. तेव्हां ती काय उत्तर देईल! लज्जेनें अधोवदन करून ती स्तब्ध उभी राहिली. इकडे माधवरावतर उत्तरासाठीं अगदीं निकरावर आले होते. शेवटीं जेव्हां कांहींकेल्या उत्तर ह्मणून मिळालें नाहीं, तेव्हांतर त्यांचा क्रोध अगदींच अनावर झाला. मनोरमेच्या कंबरेंत रागानें थाडदिशीं लाथ मारून पुनः ते खोलीच्या बाहेर पडले. परंतु आतां पूर्वीप्रमाणें गच्चीवर न जातां पुढील दरवाजा उघडून ते तडक घराच्या बाहेर आले आणि आह्मीं पूर्वीं सांगितलेलीं नारयुवतींचीं मंदिरें असलेल्या रस्त्याकडे वळले.

मागेंपुढें न पहातां आवेशाच्या भरांत ते तेथें येऊन पोहोंचले खरे; परंतु आतां त्यांच्या मनानें थोडी उलट खाल्ली. मघांचा तो आवेश आतां राहिला नाहीं. कांहीं वेळ एका स्थळीं उभे राहून ते विचार करूं लागले. पुनः आस्ते-

आस्ते पुढें जाऊं लागले. पुनः स्थिरचित्तानें एका जागीं उभे राहिले. याप्रमाणें मागेंपुढें करतांकरतां शेवटीं ते एका सुंदर बंगल्याजवळ येऊत पोहोंचले. पुनः इकडे तिकडे फिरूं लागले. शेवटीं त्यांनीं मनांतल्या मनांत कांहीं ठरवून त्या बंगल्याचा दरवाजा ठोठावला. दरवाजा जोरानें ठोठावला खरा, परंतु आंतून कांहींएक उत्तर आलें नाहीं. इकडे त्या ठोठावण्याच्या आवाजानें निसर्गदेवतेच्या शांततेचा भंग करून शेवटीं त्यांचें स्वताचें हृदयहि कांपवून सोडिलें. जणुंकाय माधवरावांच्या हृदयांतदेखील कोणीतरी त्या वेळीं त्यांच्या हृत्कपाटाचा दरवाजा ठोठावीत होतें. पूर्वसंकल्पाचा त्याग करून घरीं जाण्याचा माधवरावांनीं निश्चय केला—परंतु बिचाऱ्या मनोरमेचें दुर्दैव खडतर! याच वेळीं बंगल्याचा दरवाजा उघडला. माधवराव भीतभीत पाहूं लागले, तों समोर हातांत सुंदर दीप घेऊन त्या दीपाच्या उज्वल प्रभेसहि लाजविणारी एक अपूर्व लावण्यवती युवती उभी आहे! आतां मात्र त्यांच्यानें परत फिरवेना! हतबुद्ध होऊन ते तेथेंच उभे राहिले. तरुणीनें माधवरावांनां ओळखिलें व त्यांचा हात धरून मोठ्या आदरानें त्यांस आंत नेलें. नदीच्या प्रबळ प्रवाहांत सांपडलेल्या एकाद्या गवताच्या काडीप्रमाणें माधवराव तिच्या पश्चात्पश्चात् जाऊं लागले.

या दिवसापासून त्यांच्या या बाजूला वारंवार खेपा होऊं लागल्या आणि याच दिवसापासून अभागिनी मनोरमेच्या जीवनांतील एकेक सुखाचा अंत होऊं लागला. तिची एकेक आशा नाश पावूं लागली.

इकडे कोणत्या अपराधामुळें पतीनें आपली अशी दुर्दशा केली हें मुळींच न समजल्यामुळें मनोरमेनें सगळी रात्र रडूनरडून अश्रूंनीं डोक्याखालील उशी साफ भिजवून टाकिली!

---

## प्रकरण अकरावें.

### बिचारे सदूभाऊ!

आतां पत्नीला नेण्यासाठीं श्वशुरगृहीं आलेल्या सदूभाऊंची काय हकीकत आहे, ती एकवार पाहूं. सदूभाऊंनां इकडे आल्यास दोनतीन दिवस झाले, परंतु आजवर त्यांनीं आपला उद्देश सिद्धीस नेण्याचा कांहींएक प्रयत्न केला नाहीं. एकदोन दिवसांच्या आंतच ते आईची आज्ञाहि विसरले आणि भावाची विनवणीहि पण साफ विसरून गेले.

# बिचारे सदूभाऊ.

सदूभाऊंचा स्वभाव फार भिडस्त. मनाचा निश्चितपणा हा त्यांनां मुळींच ठाऊक नव्हता. परंतु त्यांच्या पत्नीचा स्वभाव मात्र याच्या अगदीं उलट असे. तिच्या मनांत एकादी गोष्ट आली पुरे, ती शेवटास नेल्यावांचून तिला चैन ह्मणून पडत नसे. पतीनें आपल्या अगदीं अर्ध्या वचनांत वागावें, 'ऊठ' ह्मटलें कीं त्यानें उठावें आणि 'बस' ह्मटलें कीं बसावें, ही तिची मोठी इच्छा. पतीनें पत्नीचें ह्मणणें ऐकणें, तिच्या छंदाप्रमाणें वर्तन ठेवणें, हाच दाम्पत्यप्रणयाचा उत्कर्ष, असें तिला वाटत असे; आणि हें वर्चस्व संपादन करण्याकरितां रात्रंदिवस तिचे अगदीं जिवापाड उद्योगहि चालले होते. सदूभाऊ श्वशुरगृहीं आल्यापासून जेणेंकरून ते आपल्याला घरीं घेऊन न जातां माहेरींच राहूं देतील व तेहि आपल्यावरोबर तेथेंच रहातील, अशी युक्ति रचण्याचा तिनें सारखा प्रयत्न चालविला होता. आणि केवळ तिच्या या प्रयत्नानें सदूभाऊंची वर सांगितलेली अवस्था झाली होती.

सासरीं आल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं सकाळीं सदूभाऊ पत्नीस ह्मणाले "तुला आणण्याकरितां आईनें मला पाठविलें आहे, तूं येतेसना? बोल काय तें."

"मी येणार नाहीं!"

"कां?"

"माझी खुषी."

"पण तुझ्या खुषीला विचारतो कोण? मी मुद्दाम तुला नेण्यासाठीं आलों आहें, तेव्हां तुला आलेंच पाहिजे."

"परंतु माझी इथं रहाण्याची इच्छा असल्यामुळें तुह्मीं मला इथं ठेविलंच पाहिजे."

"लक्ष्यांत ठेव, मी तुझा नवरा आहें!"

"आपणहि लक्ष्यांत ठेवा, मी तुमची बायको आहें!"

"आणि ह्मणूनच मी तुला जबरीनें घेऊन जाइन!"

"मला जबरीनं न्याल तर मी जीव देईन!"

सदूभाऊंनां कांहीं हें बोलणें रुचलें नाहीं. त्यांनां आपल्या पत्नीचा स्वभाव पूर्णपणें माहीत होता. यामुळें तिचें हें उत्तर ऐकून पुढें कांहींएक न बोलतां उद्विग्न होऊन ते बराच वेळ स्तब्ध बसले. नंतर हलकेच ह्मणाले "तर मग तूं कांहीं मजबरोबर येत नाहींस?"

सदूभाऊ नरम होतांच पार्वतीबाई आपला स्वर थोडासा गरम करून ह्मणाल्या, "नाहीं!"

सदूभाऊ यावर एक दीर्घ निश्वास सोडून ह्मणाले "ठीक आहे. तूं खुषाल रहा, आह्मी जातों."

"तसं नाहीं व्हायचं. तुह्मांलाहि इथंच राहिलं पाहिजे."

"तें काय ह्मणून?"

"माझी खुषी—माझा हुकूम!"

"तुझी खुषी तुझ्यापाशीं! तुझा हुकूम मानण्यास मी कांहीं बांधलेला नाहीं!"

"एकटंच घरीं जायचं? बरं आहे, खुषाल जा. इथून गेल्याबरोबर मी गळफांस घेऊन जीव देईन, हें मात्र मी निक्षून सांगतें."

सदूभाऊ बिचारे स्तब्ध! त्या दिवसापासून त्यांनीं या गोष्टीचें नांवच टाकिलें.

---

## प्रकरण बारावें.

### आईनें पाठविलें ह्मणून!

सदूभाऊंनां घरीं येण्याला जसजसा विलंब होऊं लागला. तसतशा इकडे राधाबाई अधिकाधिक उद्विग्न होऊं लागल्या. आज येईल, उद्यां येईल, करतां करतां सबंध पंधरवडा लोटला, तरीसुद्धां मुलाचा ठिकाण नाहीं. ह्मातारी मोठ्या चिंतेंत पडली. तिला कांहींएक सुचेनासें झालें. मनांत नानाप्रकारच्या अमंगल शंका येऊं लागल्या आणि शेवटींतर तिनें अन्नपाणीहि वर्ज केलें. मुलाच्या या काळजीनें ती रात्रीच्या रात्री जागून काढूं लागली. बिचारीच्या डोळ्यांचें पाणी ह्मणून खळेना.सदूभाऊच्या सासुरवाडीस जाऊन त्यांची काय हकीगत आहे तें पाहून येण्याविषयीं राधाबाईनीं आज पांचसात दिवस विनोबांच्या मागें एकसारखी टुमणी लाविली होती, परंतु कांहींना कांहीं सबबीवर विनोबांनीं आजवर चालढकल केली. परंतु आईची दिवसेंदिवस होत चाललेली शोचनीय स्थिति पाहून आतां हें काम दिवसगतीवर टाकणें बरें नव्हे, असें त्यांनांहि वाटूं लागलें. दादांच्या सासुरवाडीस जाण्याचें त्यांनीं आईजवळ कबूल केलें आणि खरोखर दुसऱ्याच दिवशीं मोठ्या पहांटेस ते सदूभाऊंच्या सासरच्या रस्त्याला लागले.

विनोबा तिकडे निघाले खरे, परंतु मग ते मोठ्या विचारांत पडले. "काय करावें आपण आतां थोरामोठ्यांच्या घरीं जाणार, तेथें बडीबडी मंडळी आपल्याला भेटेल, त्यांच्याबरोबर बोलावें कसें, चालावें कसें, न जाणों आपल्यासारख्या गरिबाचा ते लोक तिरस्कार करितील, हंसतील, चेष्टा करितील, नीटपणें कुणी बोलणारसुद्धां नाहींत. काय करावें, सगळीच पंचाईत! बेहत्तर, यापेक्षां 'आपण

मुळींच आलों नसतों तरी बरें झालें असतें!" वगैरे वगैरे गहन विचारांनीं स्वारी अगदीं व्यग्र होऊन गेली. इतक्यांत आपले दादा आणि वहिनी तेथेंच आहेत, ही गोष्ट त्यांनां अकस्मात् आठवली, आणि मग मात्र विनोबांचा जीव जरासा थाऱ्यावर आला. मोठें धाडस करून स्वारी हळुहळू सदूभाऊंच्या श्वशुरगृहाच्या अंगणापर्यंत आली. सुदैवानें त्यांचे वडील बंधु त्यांनां अंगणांतच भेटले. आपल्या-साठीं आईची झालेली अवस्था विनोबांच्या तोंडून ऐकतांच सदूभाऊंनां मनस्वी दुःख झालें. मनांतल्या मनांत ते आपला धिक्कार करूं लागले. इकडे स्त्रीपुत्रांसह आपले दादा अगदीं खुषाल आहेत, हें समजतांच विनोबांनां पराकाष्ठेचा आल्हाद झाला. त्यांनां वाटलें, आपली कामगिरी आतां आटोपली. नंतर धाकट्या भावाला बरोबर घेऊन सदूभाऊ घरांत शिरले आणि त्याला दिवाणखान्यांत बसावयास सांगून त्याची जेवणाखाणाची व्यवस्था लावण्याकरितां आंत गेले.

इकडे विनोबांनां कांहींकेल्या दिवाणखान्यांत बसण्याचें धाडस होईना. त्या थाटामाटानें सुशोभित केलेल्या जागेंत पाय टाकण्याचेंच मुळीं त्यांनां भय वाटूं लागलें. कावऱ्याबावऱ्यासारखे ते इकडेतिकडे पाहूं लागले. इतक्यांत पलीकडे बाहेरल्या बाजूस असलेल्या एका लहानशा खोलीकडे त्यांची नजर गेली. आंत डोकावून पहातात तों तेथें बसावयास एक मोडकेंतोडकें बांक ठेविलें असून एका कोंपऱ्यांत तंबाखू, चिलीम, गुडगुडी वगैरे धूम्रपानाचीं अष्टायुधें आहेत व जवळच एक परसाहि धुमसत आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. मग विनोबांचा आनंद काय विचारावा! लागलीच त्या सुसज्जित दिवाणखान्याकडे पाठ फिरवून स्वारी चटकन् त्या खोलींतील बांकावर जाऊन बसली. कोनाड्यांत पडलेली चिलीम उचलून ती भरण्याची सुरुवातहि झाली. इतक्यांत खोलीचा मालक—रामचंद्रपंत सहस्रबुद्धे यांचा गडी—रामा घाईघाईनें त्या खोलींत आला. तेथें आपल्या आसनावर अधिष्ठित झालेली ही अगदींच अपरिचित मूर्ति पहातांच तो मोठ्या विस्मयांत पडला. रामानें पहिल्यानें जरा दरडावूनच प्रश्न केला "कोन बसलायर त्यो?"

विनोबा अगदीं घाबरून जाऊन अडखळत ह्मणाले "म-म-मी विनायक."

"हकड काय हव तुमाह्मी?"

"चि-ली-म-"

"त्ये समजल, पर तुमी कुनाह्मी पघत्याशी?"

"कुणाला नाहीं."

" मग हकड आल्याशी कशापाई ?"

" आईनें पाठविलें ह्मणून."

" आरच्या ! ह्यो बामन येडा बिडा त न्है ! अर गिरिस्ता आयान धाडलान खर, पर हकड कुनाकड पाठविलान बोलशील का न्है ?"

" दादाकडे."

" दादाकड ! आर त्या दादाश्नी नावगाव काय है का न्है ?"

" हो हो, आमच्या दादाचें नांव सदूभाऊ."

" काय ह्मनूत्याशी ! तुमी आमच्या जावयबावाच भावास, व्हाय ?"

" होय."

" त मग इकता वक्त अस बोलल्याशीं का न्है ? हकड द्या ती चिलीम. मी येतो तुमाश्नी तमाकु भरून."

रामानें भरून दिलेली चिलीम विनोबा आनंदानें ओढूं लागले. दम मारतां मारतां स्वारी आपल्याशींच ह्मणूं लागली "अरे बापरे ! इतक्या जेव्हां खाणाखुणा सांगितल्या, तेव्हां कुठें या बड्या लोकांच्या घरची एक तंबाखूची चिलीम मिळाली."

विनोबा चिलीम ओढण्यांत दंग होऊन गेले आहेत, तों दुसरा एक गडी तेथें आला व रामाला विचारूं लागला "कायव्ह रामादा ! जावयबावाच भावास आलाय तो हैतरी कुनीकड ? मला तो कुटबी गवसतच नाय बा. तुमासनी है का ह्माइत ?"

' विनोबांकडे बोट करून रामा त्याला डोळ्यानें खुणावूं लागला. परंतु त्या नवीन आलेल्या गड्याला कांहींकेल्या त्याची भाषा कळेना. तो पुनः मोठ्यानें ह्मणाला "तुमी काय माजी मस्करी करताव व्हय ?"

नाइलाजास्तव रामाला अगदीं स्पष्ट बोलणें भाग पडलें. तो ह्मणाला "अर, त्यामंदीर काय मस्करी करावाची ! एड्या, ह्येच त्ये आपल्या जावयबावाचे भावास !"

तो नवीन आलेला गडी विनोबांच्या तोंडाकडे पहात स्तब्ध उभा राहिला. तो मोठ्या विस्मयांतच पडला. त्याला कांहीं केल्या रामाचें बोलणें खरेंच वाटेना. इतक्यांत 'काका आले' 'काका आले हः—' ह्मणून मोठमोठ्यानें आरडतओरडत विनोबांचे लाडके पुतणे जगू आणि दामू यांच्या स्वाऱ्या उड्या मारीतमारीत तेथें येऊन थडकल्या. काका दिसावयाचीच खोटी, लागलेच दोघेहि त्यांच्या

मांडीवर उड्या मारून बसले. इतका प्रकार झाला तेव्हां त्या गड्याचा संदेह पार गेला, तो अगदीं नम्रतेनें विनोबांनां ह्मणाला "काकासाब, तडक चाय पिवायला तुमाह्मी बोलावलाय."

परंतु विनोबांनां कांहीं ती जागा सोडून आंत जाणें प्रशस्त वाटेना. त्यांनीं तेथेंच चहा आणावयाला सांगून त्या गड्याला घालवून दिलें. निरोप पोंचतांच तेथेंच चहा आला आणि मग मात्र आपल्या लाडक्या पुतण्यांना पुढ्यांत घेऊन विनोबांनीं मोठ्या आनंदानें त्याचा यथास्थित समाचार घेतला. नंतर दोन तासांनीं भोजन झालें. भोजनोत्तरहि विनोबांनीं आपलें आसन त्याच खोलींत टोकिलें.

संध्याकाळीं सदूभाऊ विनोबांनां जवळ बोलावून ह्मणाले "विनू, अरे तूं इथें असा नुसता बसून काय होणार आहे? ज्या कामासाठीं तूं आला आहेस, त्याबद्दल कांहीं खटपट करशील कीं नाहीं?"

दादाचे हे शब्द ऐकून विनोबा मोठ्या बुचकळ्यांत पडले. दादाला आणि वहिनींनां आपण नेण्याकरितां आलों आहों, हें ते विसरले नव्हते; परंतु त्यासाठीं पुढें खटपट ती काय करावयाची, हें कांहीं केल्या त्यांच्या ध्यानांत येईना. सदूभाऊ आपल्या धाकट्या भावाला पूर्णपणें ओळखीत होते. विनोबांच्या हातून कांहीं होणें नाहीं, आपल्यालाच कांहींतरी व्यवस्था केली पाहिजे, हेंहि ते जाणून होते. विनोबा कांहींच बोलत नाहींत असें पाहून ते पुनः ह्मणाले "विनू, तूं आतां असें कर. आमच्या श्वशुरांची भेट घे, आणि त्यांनां सांग कीं, हिला घेऊन येण्याकरितां आईनें आपल्याला मुद्दाम पाठविलें आहे. जगूचा आणि दामूचा तिनें रात्रंदिवस अगदीं ध्यास घेतला आहे. तर एवढ्यासाठीं उद्यां त्यांनां पाठविण्याची तजवीज अवश्य झालीच पाहिजे."

विनोबा बराच वेळ अगदीं स्तब्ध राहिले. नंतर डोकें खाजवीत खाजवीत ह्मणाले "दादा, आपल्याला नाहीं बुवा त्यांच्यासमोर एवढें बोलतां यायचें."

शेवटीं नाइलाजास्तव आपण स्वतांच सर्व हकीगत श्वशुरांच्या कानांवर घालावी असें योजून विनोबांस बरोबर घेऊन सदूभाऊ रामचंद्रपंतांच्या खोलींत आले. रामचंद्रपंतांशिवाय दुसरें कोणीहि या खोलींत बसतउठत नसे. या वेळीं ते 'शिवसंहिता' वाचण्यांत निमग्न झाले होते! जांवई आंत आलेले पहातांच रामचंद्रपंतांनीं त्यांस बसावयास सांगितलें. सदूभाऊ एका बाजूस बसले, परंतु विनोबांनीं आंत येतांच रामचंद्रपंतांस मोठ्या अदबीनें साष्टांग नमस्कार केला

आणि ते गुपचूप एका बाजूला उभे राहिले. त्यांच्याकडे नजर जातांच "हे कोण?" ह्मणून रामचंद्रपंतांनीं जामातांस विचारिलें.

सदूभाऊ ह्मणाले "हा माझा धाकटा भाऊ. आईनें जगूचा आणि दामूचा अगदीं ध्यास घेतला असून त्यांनां आणण्याकरितां याला पाठविलें आहे. तेव्हां ह्मटलें आपली परवानगी मिळाली ह्मणजे उदईक त्यांनां घेऊन जाऊं."

"हूं" असा एकदा ध्वनि करून रामचंद्रपंत बराच वेळ स्तब्ध राहिले. नंतर मोठ्या गंभीरतेनें ह्मणाले "अहो, मजजवळ कशाला उगाच या गोष्टी काढतां? माधवरावाला विचारा. प्रपंचाचा सर्व भार हल्लीं मीं त्याजवर सोंपविला आहे. तो तुह्मांला काय तें सांगेल."

सदूभाऊंनीं पुनः कांहीं तोंड उघडलें नाहीं. विनोबांनां बरोबर घेऊन ते माधवरावांनां भेटण्याकरितां दिवाणखान्यांत आले.

---

## प्रकरण तेरावें.

### वहिनींला तर कांहीं चाकरी नाहीं ना?

सदूभाऊ दिवाणखान्यांत आले. माधवराव आपल्या कामांतच गर्क असल्यामुळें सदूभाऊंबरोबर विनोबांनांहि पहातांच ते विस्मित होऊन ह्मणाले "कसें काय विनायकराव, आपली स्वारी कधीं आली?"

विनोबांनीं अदबीनें उत्तर दिलें "आज दोन प्रहरीं."

"ठीक ठीक! पण कां हो, आईला नाहींका बरोबर घेऊन आलां?"

"नाहीं, ती घरींच आहे."

"तिलाच हो आणखी घरीं रहाण्याचे कष्ट कां दिलेत? बरोबरच घेऊन आलां असतां ह्मणजे ठीक होतें!"

माधवरावांनीं आपल्याविषयीं दाखविलेला एवढा आत्मीयभाव पाहून आमच्या विनोबांनां मनांतल्या मनांत फार आल्हाद झाला; परंतु सदूभाऊंची स्थिति मात्र याच्या अगदीं उलट झाली. माधवरावांचा प्रत्येक शब्द त्यांच्या हृदयाला झोंबूं लागला. त्यांच्यानें आतां मुळींच स्तब्ध रहावेना. ते जरा रागानेंच ह्मणाले "विनू कांहीं तुमच्या घरीं रहायला नाहीं आला. तो तुमच्या बहिणीला नेण्याकरितां आला आहे."

## वहिनींला तर कांहीं चाकरी नाहीं ना ?

आपल्या भाषणाचा सदूभाऊंनां राग आला आहे हें माधवरावांच्या लक्ष्यांत आलें. तेव्हां ते किंचित् हंसतहंसत ह्मणाले "मी कांहीं त्या अर्थानें बोललों नाहीं."

सदूभाऊ ह्मणाले "जाऊं द्या हो. मला कळतें तें सारें. पण आपल्या बहि-णीला पाठविण्याबद्दलचें काय तें सांगा."

माधवराव आतां गंभीरपणाचा आव घालून ह्मणाले "तुमच्या बायकोला तुह्मी घेऊन जाणार, त्यांत आह्मी हो काय ह्मणून आड येऊं ? परंतु त्यांतल्या त्यांत असें पाहिलें पाहिजे, कीं, सध्यां तुह्मांला चाकरीधंदा कांहींएक नाहीं. तेव्हां संसाराला जितका कमी खर्च येईल तितका बरा. नाहींतर आस्तेआस्ते कर्ज काढायची पाळी यायची; काय, मी ह्मणतों हें खरें कीं नाहीं ?"

"तें सगळें खरें, परंतु आईला फार कष्ट होत आहेत. मुलांचा तर तिनें अगदीं ध्यास घेतला आहे. त्यांच्यासाठीं तिनें खाणेंपिणेंसुद्धां सोडलें आहे. आह्मीं तिचें हें दुःख कसें बरें पहावें ?"

"किती झालें तरी बायकोच कीं नाहीं ती! नेहमींनेहमीं आपण बायकांचें सगळें ऐकूं ह्मटलें तर कांहीं चालायचें नाहीं. तुह्मी जर तिला नीट समजावून सांगाल तर तिचीसुद्धां सहज समजूत पडेल."

सदूभाऊ बराच वेळ स्तब्ध राहिले. मनांतल्या मनांत ते कांहीं विचार करीत होते. त्यांनीं त्या विचाराबरोबरच मनामध्यें कांहीं प्रतिज्ञाहि केली. नंतर एक लांब सुस्कारा सोडून ते माधवरावांस ह्मणाले "होय, आपण ह्मणतां तेंच खरें. उद्यांच्या उद्यां मी चाकरीकरितां मुंबईस जातों. जेव्हां चाकरी मिळवीन तेव्हांच पुनः आपणां सर्वांनां तोंड दाखवीन."

माधवराव किंचित् हंसतहंसत ह्मणाले "नोकरीसाठीं कांहीं तुह्मांला मुंबईसच जाण्याची आवश्यकता नाहीं. त्याची व्यवस्था मीं अगोदरच करून ठेविली आहे. हल्लीं आमचें काम झपाट्यानें वाढत चाललें आहे. मला एकट्याला कांहीं सगळी-कडे पहायाला मुळींच होत नाहीं. उद्यांपासून तुह्मी माझ्याबरोबर काम शिक-ण्यास चला. शिवाय कंत्राटाचें काम आहे, दोन पैसे अधिकउणे मिळायला कांहीं हरकत नाहीं. तुह्मीं काम उत्तम प्रकारें शिकलां ह्मणजे मी मुळीं तुह्मांला भागीदारच करीन. मगतर झालें ना ?"

मोह पडण्याजोगीच गोष्ट! आमच्या सदूभाऊंच्यानें कांहीं हा मोहजाल तोडवेना. त्यांच्या तोंडाला एकदम पाणी सुटलें. चंचल लक्ष्मीच्या मोहिनीशक्तीला कोण बरें वश होणार नाहीं ? एवढा वेळ माधवरावांबद्दल सदूभाऊंच्या मनांत जें वैषम्य

उत्पन्न झालें होतें, तें तत्क्षणीं दूर झालें. आतां त्यांनां वाटलें, माधवरावांसारखा आपला हितैषी साऱ्या जगांत दुसरा कोणीहि नसेल. सदूभाऊ आपल्याशींच ह्मणूं लागले "इतक्या दिवसांनीं आज आपल्या राशीचे अनिष्ट ग्रह दूर झाले. आपले वाईट दिवस आजपासून खरोखरच संपले." ते आपली प्रतिज्ञा वगैरे पार विसरून गेले आणि माधवरावांच्याच ह्मणण्याप्रमाणें सर्व कांहीं स्थिर झालें.

विनोबांनां पहिल्यानें हें सगळें बरोबरसें कांहीं समजलें नाहीं. परंतु जें कांहीं मधूनमधून थोडेंबहुत समजलें तें अर्थात् त्यांनां कबूलच करावें लागलें. दादांनां नोकरी मिळते आहे हें ऐकून त्यांनां जितका हर्ष झाला, तितकाच वहिनी कांहीं आपल्याबरोबर येत नाहीं हें ऐकून त्यांनां विषाद वाटला. सदूभाऊ विनूला एकीकडे नेऊन ह्मणाले "समजलास विनू, इतक्या दिवसांनीं आपले सगळे कष्ट दूर होण्याचा सुयोग आला आहे. तूं स्वतांच आतां ऐकलेंसना, कीं, उद्यांपासून मी माधवरावांबरोबर काम पाहूं लागणार ह्मणून. आईला या सर्व गोष्टी तूं नीट समजावून सांग आणि यामुळेंच तूर्त आह्मांला तिकडे येतां येत नाहीं हेंहि तिला कळीव."

सदूभाऊंनां वाटलें होतें तितका कांहीं हें ऐकून विनोबांनां आनंद झाला नाहीं. ते ह्मणाले "दादा, तुला नोकरी मिळते आहे तेव्हां तूं आपला खुशाल इथें रहा; परंतु वहिनीला तर कांहीं चाकरीबिकरी नाहीं ना मिळत! मग तिला घरीं यायला काय अडचण आहे?"

"हें पहा विनू, सध्यां संसार चालविण्याचें काम आपल्याला मोठें कठीण झालें आहे. खर्चाची अगदीं तारांबळ उडत असते. ती इथें राहिली तर सध्यां आपला तितकाच खर्च वांचेल. आणि एवढ्याचसाठीं मी ह्मणतों, कीं, ती इथेंच राहील तर चांगलें."

दादांच्या या भाषणानें विनोबा अगदीं गारेगार होऊन ह्मणाले "हो हो, तर मग हेंच बरें. उद्यां पहांटेस मी घरीं जातों आणि आईला हें सगळें नीट समजावून सांगतों."

दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहाटेस उठून विनोबा आपल्या गांवीं निघून गेले. इकडे सदूभाऊ माधवराबाबरोबर कंत्राटाच्या धंद्यांत पडले.

# प्रकरण चौदावें.

## सगळाच घोटाळा.

या संसारांतील सुखदुःखांचें मूळ शोधून काढणें महा कठीण आहे. सुखाची उत्पत्ति कशापासून होते, अथवा दुःखाची उत्पत्ति कशापासून होते, हें सांगणें अनेक समयीं साधारण मनुष्यबुद्धीला अगदीं असाध्य असतें. आपण जे विषय सुखाचें मूळ ह्मणून समजतों आणि ज्यांच्या प्राप्तीनें आनंदसागरांत नुसते तरंगत रहातों, तेच विषय, प्रसंगविशेषीं आपल्याला अपार दुःखसागरांत लोटण्यास कारणीभूत होतात. त्याचप्रमाणें ज्यांनां आह्मी दुःखाचे पर्वत समजून ज्यांच्या नुसत्या कल्पनेनेंच दुःखसागरांत गटंकळ्या खाऊं लागतों, तेच, प्रसंगविशेषीं आपल्याला अनंत सुखसागरांत नेऊन सोडितात. प्रत्येक माणसास क्षणोक्षणीं याचा प्रत्यय येत असूनसुद्धां प्रत्येक इसम सुखासाठीं रात्रंदिवस एवढी धडपड कां करीत असतो, हा प्रश्न प्रत्येकानें विचार करून सोडविला पाहिजे. असो.

दादानें सांगितलेली मोठ्या आनंदाची बातमी घेऊन विनोबा आज आपल्या घराकडे येत होते. त्यांनां पक्कें वाटत होतें, कीं, ही बातमी ऐकून आपल्या आईला परमानंद होईल. कारण दादानें सांगितलें होतें, कीं "इतक्या दिवसांनीं आपले सगळे कष्ट दूर होण्याचा सुयोग आला आहे." विनोबांच्या मनांत अद्यापि हेच शब्द घोळत होते.

विनोबा लवकरच अगदीं निश्चिंत मनानें आपल्या घरीं येऊन पोहोंचले. ओटीवरच आईची आणि त्यांची भेट झाली. मुलाला पहातांच राधाबाईनीं "पार्वती कितीशी मार्गं आहे?" असा मोठ्या उत्सुकतेनें प्रश्न केला.

विनोबा ह्मणाले "वहिनींचें तूर्त कांहीं येणें होत नाहीं."

राधाबाईनीं घाईघाईनें विचारिलें "कां रे बाबा, तिच्या घरचीं सगळीं माणसं खुशाल आहेत ना?"

"सगळीं खुशाल आहेत ग; त्याबद्दल कांहींएक काळजी करायला नको. दादाला तिथें नोकरी मिळते आहे. माधवराव त्याला आपल्या धंद्यांत भागीदार करणार आहेत. ह्मणूनच वहिनींला तूर्त कांहीं ते पाठवीत नाहींत.

"तुझा दादा आतां घरजांवई का होऊन बसणार आहे?"

"नाहीं ग आई, दादा कांहीं घरजांवई नाहीं झाला. त्याला खरोखरच तिथें रोजगार मिळतो आहे."

"सदूला रोजगार का मिळतो आहे? देव करो नि तुझ्या तोंडांत साखर पडो. पण काय रे, पार्वतीला इकडे न यायला काय झालं?"

"दादा ह्मणाला, आधींच इकडे आपली खर्चाची अगदीं ओढाताण होत असते, आणखी यांनांहि इकडे पाठविलें, मगतर खर्च अधिकच वाढेल!"

विनोबांच्या तोंडून हे शब्द ऐकतांच राधाबाई अत्यंत संतापल्या. मुलाच्या तोंडून खर्चाच्या ओढाताणीबद्दल ऐकिलें ह्मणजेतर ह्मातारीला पराकाष्ठेची चीड येत असे. संतापाच्या भरांत ती ह्मणाली "मेल्या, तुझी अक्कलच तितकी! तुला अधिक कुठून समजणार? तुझ्या त्या शहाण्या दादाला रोजगार मिळाला आहे ना? मग खर्चाची ओढाताण कां होईल? मी कांहीं बोळ्यानं दूध पीत नाहीं, या असल्या वेडगळ गोष्टी घेऊन माझी समजूत करायला आला आहेस तो! ठीक आहे, होऊं द्या, मेल्यांनों, तुमचा एकाचाहि आतांपासून काडीचासुद्धां भरंवसा मी धरणार नाहीं. आतांच्या आत्तां मी आपली मुळीं काशीसच निघून जात्यें. इथं राहून उगीच मरमर मरूंतरी कशासाठीं?"

ह्मातारीचें बोलणे संपतें न संपतें, तोंच तिचा संताप पार विझून जाऊन अश्रुवर्षावाला आरंभ झाला. पदरानें डोळे पुशीतपुशीत ती घरांत गेली. आमचे विनोबा अगदीं थक्क होऊन गेले. "आतां आईनें सांगितलेली गोष्ट शिंची आपल्याला तेव्हां कशी सुचली नाहीं!" हें कांहीं केल्या त्यांच्या ध्यानांतच येईना. आणि शिवाय सुखदुःखांचें हें असें आकस्मिक परिवर्तन कसें झालें, हेंहि त्यांनां कळेना. बिचारे अगदीं बुचकळ्यांत पडले.

---

## प्रकरण पंधरावें.

### हें स्वप्न तर नसेल!

त्या दिवसापासून दीक्षितांच्या घरीं प्रायः राधाबाईच्या रडण्याशिवाय दुसरा आवाज ऐकूं येईना. सकाळ नाहीं दुपार नाहीं, रात्र नाहीं दिवस नाहीं, ह्मातारीचें रडणें एकसारखें चाललेलें असे; खरोखर ह्मटलें तर वडील मुलगा आणि वडील सून यांच्या आचरणानें राधाबाईला पराकाष्ठेचा त्रास होत असे; तरीहि त्या मोठ्या कुशलतेनें संसार चालवीत होत्या. परंतु आतां मात्र संसारांत त्यांचें मन मुळींच राहिलें नाहीं. त्या अगदीं विरक्त होऊन वेड्यासारख्या सगळा दिवस रडून काढूं लागल्या. गृहकृत्यांकडे त्यांचें मुळींच लक्ष्य नसल्या-

मुळें घरांत सगळा गोंधळ माजून गेला. कांहीं दिवस त्या एकच वेळ स्वयंपाक करूं लागल्या. एकट्या विनोबांसाठींच रात्रीं चूल पेटविण्याचें त्यांच्यानें होईना. पुढेंपुढें सगळ्या दिवसांत एकदांसुद्धां जेवण होण्याची मारामार पडूं लागली. मनांत असतें तर हरतऱ्हेनें राधाबाईनीं चुलीची एकदांतरी संभावना केली असती; परंतु ह्मातारीचें आतां तिकडे लक्ष्यच नव्हतें.

या संसारांतील सगळे हाल पत्करतील, सगळ्या यातना सोसवतील, परंतु या पोटाची आग कांहीं सोसवत नाहीं. या यातनेपुढें रोग, शोक किंवा दुसरी प्रत्येक यातना अगदींच तुच्छ आहे. पुत्रशोकानें तळमळणाऱ्या आईलासुद्धां या पोटाची तरतूद करावी लागते! खरोखर, दारिद्र्य हें अनंत यातनांचें मूळ होय. दरिद्री मनुष्य कितीहि मानी असला तरीहि त्याला पदोपदीं अपमान सहन करावा लागतो. ज्ञानी असला तरी कोणीहि त्याच्या त्या ज्ञानाचा आदर करीत नाहीं; विद्वान् असला तरी कोणीहि त्याच्या विद्वत्तेला मान देत नाहीं. या जगांत मान, मरातब, ज्ञान, बुद्धि हीं एका लक्ष्मीच्या पाठीपाठींशीं नाचणारी चाकर-मंडळी आहे. आणि ह्मणूनच लक्ष्मीची अवकृपा आणि तिच्या अक्काचें दर्शन होतांच हीं सगळीं एकदम नाहींशीं होतात. या जगांत जेथें धन तेथेंच मान, तेथेंच विद्वत्ता आणि तेथेंच गौरव असावयाचा.

दीक्षितांच्या घराण्यावर अक्काबाईची कृपादृष्टि उत्तरोत्तर अधिकाधिक होऊं लागली; आणि त्याच प्रमाणानें गांवांत त्यांनां मिळणारा मानसन्मानहि क्रमाक्रमानें नष्ट होऊं लागला. घरांत वेळच्यावेळीं दिवा लागेना, अंगणांत केरसुणी फिरेना व घराला कधीं सारवणहि पडेना. मग अशा घरांत मंगलकार्य किंवा होमहवन होण्याचें तर दूरच. जिकडे पहावें तिकडे अमंगलतेचीं चिन्हें दिसत होतीं. तें घर ह्मणजे मूर्तिमंत दारिद्र्याचें माहेरघर असें वाटून मन कसें उद्विग्न होत असे. स्मशानाचा देखावा जसा भयानक असतो, तशीच भयानक कळा सांप्रत दीक्षितांच्या घरावर दिसूं लागली होती. राधाबाईचा क्रोध जसजसा वाढूं लागला तसतसा तिचा पुत्रस्नेह ऱ्हास पावूं लागला. क्रोधवश होऊन त्या सपाट्यांत राधाबाईनीं मुलाची एकदां पराकाष्ठेची निर्भर्त्सना केली ह्मणजे तत्काळ अत्यंत सुखमय अशा मातृस्नेहाचा जो अनुभव नेहमीं विनोबांनां येत असे, तो आतां आतां त्यांनां मुळींच येईनासा झाला. शेवटीं दारिद्र्याच्या या दुःसह यातनांनीं आणि आईच्या त्या अकल्पित कठोरतेनें विनोबांसारख्या जडमूढालासुद्धां अस्थिर करून सोडिलें.

एके दिवशीं तर आईनें नाना तऱ्हेनें तिरस्कार केल्यामुळें विनोबा रडतच बसले. यापूर्वी आईनें किती हवातितका तिरस्कार केला, ती रागावलीजाजावली तरीहि विनोबांनां वाईट वाटून ते रडत बसले आहेत, असें कोणींहि कधींहि पाहिलें नव्हतें. विनोबांच्या आजच्या या रुदनानें राधाबाईचें अंतःकरण कळवळून गेलें. त्यांच्या हृदयांतील पुत्रस्नेह पुनः उचंबळून आला. त्यांच्यानें आतां स्वस्थ रहावेना. आपल्या वेड्याबागड्या पुत्राशीं केलेल्या कठोर आचरणाचें आतां त्यांनां स्मरण होऊन त्याहि रुदन करूं लागल्या. त्या दिवशीं त्या शुभसूचक वेळीं तीं मातापुत्र पुष्कळच रडलीं. काय असेल तें असो, परंतु त्या दिवशीं त्या रुदनानें उभयतांनां अतिशय सुख वाटूं लागलें. बऱ्याच वेळानें त्यांचें रुदन बंद झालें. एकमेकांचे अश्रु एकमेकांनीं पुसून काढिले. या रुदनानंतर उभयतांचींहि मनें प्रफुल्ल झालीं. मुलापेक्षां आईलाच या गोष्टीचा अधिक विस्मय वाटला. कारण, तिचें सगळें आयुष्य रडण्यांत गेलें होतें; पण रडण्यापासून इतकें सुख तिला आजवर कधींहि झालें नव्हतें. विनोबांची गोष्ट तर पुसूंच नका! ते अगदीं प्रफुल्ल मुखानें ह्मणाले "आई!"

अहाहा! तो 'आई' शब्द कितीतरी मधुर! जणूं काय स्वर्गीचा वीणाच राधाबाईच्या कानांत वाजूं लागला! मुलाच्या हनुवटीखालीं प्रेमानें हात घालून त्या ह्मणाल्या "काय ह्मणतोस बाळा?"

"आई! काय केलें ह्मणजे तूं सुखी होशील, सांग पांहूं?"

राधाबाईचें हृदय आज आनंदानें नाचूं लागलें. विनोबांच्या मुखांतून असे शब्द येतील, ही आशा त्यांनीं आपल्या आयुष्यांत कधींच केली नव्हती. आनंदानें त्या इतक्या अधीर झाल्या, कीं, त्यांनां पुत्राच्या या प्रश्नाचें उत्तर धडपणें देववेचना. त्या मनांतल्या मनांत ह्मणाल्या "माझ्या सुखाला आतां काय कमी आहे बाबा?"

विनोबांनीं पुनः विचारिलें "आई! कशानें तूं सुखी होशील, सांगना?"

आईच्या नेत्रांत आनंदाश्रूंचें भरतें आलें. ती डोळे पुसून ह्मणाली "बाबारे, माझ्या लक्ष्मीला तूं घेऊन ये. ती इथं आली ह्मणजे मला सुख वाटेल."

कांहीं वेळ विनोबा अगदीं स्तब्ध राहिले. नंतर मनांत कांहीं योजून स्वारी खोलींत गेली. थोड्याच वेळानें डोकीला पागोटें चढवून व अंगावर जुनेंसें एक उपरणें घेऊन विनोबा बाहेर आले व त्यांनीं आईच्या पायांवर डोकें ठेविलें. राधाबाईनीं विस्मयजनक मुद्रेनें मुलाच्या तोंडाकडे पहातपहात विचारलें "विनू, बाबा कुठं रे चाललास?"

विनोबा प्रफुल्ल मनानें ह्मणाले " तिला आणायला जातों !"

राधाबाई थक्क झाल्या. "हा काय माझा पूर्वीचाच विनू? छे, छे ! हें स्वप्न तर नसेल ना !"

---

## प्रकरण सोळावें.

### विनोबांची सासुरवाडी.

श्रावणाचा महिना. रस्त्याच्या दोहों बाजूंस लागून राहिलेल्या हिरव्यागार शेतांची ती अपूर्व शोभा वर्णन करणें अशक्य आहे. जिकडे पहावें तिकडे हिरवींचार शेतेंच दृग्गोचर होत आहेत. सृष्टिदेवतेनें जणुं काय आपल्या पृष्ठभागावर हिरव्या रंगाचा शालूच घेतला आहे ! दूर—अति दूरपर्यंत लागून राहिलेले अनेक गगनचुंबित वृक्ष, जणूं त्या शालूचे पदरच भासत आहेत. अहाहा ! या सुवर्णमय भरतभूमिव्यतिरिक्त असें नयनतोषक, चित्ततापहारक, प्रीतिप्रद, मनोरम सृष्टिसौंदर्य भूपृष्ठावर अन्यत्र कोठेंतरी आढळेल काय ! हें सौंदर्य केवळ आमच्या नेत्रांनां गार करूनच रहात नाहीं, तर त्याबरोबरच हृदयामध्यें उन्नत विचारांचें, थोर थोर आशांचें बीजारोपण करून आमच्या जीवनशक्तीचीहि वृद्धि करीत असतें.

असो. हा असा सुंदर प्रदेश आक्रमण करीतकरीत श्वशुरगृहीं निघालेले आमचे विनोबा, सायंकाळचे चार वाजण्याच्या सुमारास गांवांत येऊन पोहोंचले. प्रथम सासरीं न जातां ते बाजारांतील एका दुकानांत शिरले व गुपचूप एका बाजूला उभे राहिले. दुकानदार गिऱ्हाइकांनां माल देण्यांत अगदीं चूर झाला होता, त्यामुळें त्याचें लक्ष्य बराच वेळपावेतों विनोबांकडे गेलें नाहीं. विनोबांनांहि त्याचें कांहीं. वाटलें नाहीं. किंचित् वेळानें गिऱ्हाइकांची गर्दी अमळ कमी होतांच दुकानदाराची नजर सहज विनोबांकडे वळली. तेव्हां तो चकित होऊन ह्मणतो "ओहो ! कोण विनायकराव ! आपली स्वारी आलीतरी कधीं ?"

विनोबा हळूच ह्मणाले "हा आतांच येतों आहें."

"बसा; अहो, बसा तर खरे जरा. आल्यासारखे एक चिलीमतर ओढाल कीं नाहीं ?" असें बोलून दुकानदारानें जवळच असलेल्या आपल्या भाच्याकडे पाहिलें.

दुकानदाराच्या या भाच्याचें नांव बाळकृष्ण. बाळकृष्णाचें वय अवघें दहा अकरा वर्षांचें होतें; पोरगा मोठा हुषार आणि बोलण्याच्या कामांत तर अगदीं पटाईत होता. कसलाहि प्रश्न त्याला विचारा, त्याचें उत्तर जणुं काय त्याच्या जिभेच्या टोंकावर ठेविलेलें. घरची अगदीं गरीबी असल्यामुळें तो आपल्या मामाच्या दुकानावर राहिला होता. मामाचा शब्द ऐकतांच बाळकृष्ण चट्दिशीं उठून चिलीम भरण्यास गेला. दुकानदार पुनः विनोबांकडे वळून ह्मणाला "पण कां हो, तुह्मी अजून नानासाहेबांच्या घरीं गेलांच नाहीं वाटतें ?"

"नाहीं, हा मी नुकताच आलों."

दुकानदार विनोबांच्याच गांवचा होता. तिकडे बरोबर जमेना ह्मणून आज सहासात वर्षें तो इकडे दुकान घालून राहिला होता. बऱ्याच दिवसांनीं विनोबा भेटले, ह्मणून साहजिकच मोठ्या उत्कंठेनें तो आपल्या गांवचें कुशलवृत्त विचारूं लागला. त्यांच्या इकडच्यातिकडच्या गप्पागोष्टी चालल्या आहेत, इतक्यांत बिनोबांच्या सासरचा एक गडी कांहीं जिन्नस घेण्याकरितां त्या दुकानीं आला. त्या गड्यानें पहिल्यानें कांहीं विनोबांनां ओळखिलें नाहीं. आणि खरेंच, त्यानेंतरी कसें बरें ओळखावें ! जांवईबुवांच्या अंगावर धुरळ्याचीं पुटेंच्यापुटें बसलेलें एक अंगवस्त्र, पायांत फाटूनफाटून चिंध्या झालेला जोडा, अंगांतली बंडीहि जागजागीं फाटलेली, आणि हात, पाय, तोंड, यांची धुरळ्यानें जी कांहीं अवस्था झाली होती तीतर विचारूंच नका ! तेव्हां अशा शोचनीय स्थितींत विनोबांनां पाहून आपल्या धन्याचे—श्रीमंत नानासाहेब देशमुख यांचे-हे जांवई, ह्मणून त्या बिचाऱ्या गड्यानें ओळखावेंतरी कसें ? गड्याची ही स्थिति दुकानदाराच्या ताबडतोब लक्ष्यांत आली. ह्मणून तो त्याला हांक मारून हंसतहंसत ह्मणाला "काय रे रामा ! तूं यांनां ओळखलंस का हे कोण ते ?"

रामा बराच वेळ विनोबांकडे टक लावून पाहूं लागला. नंतर किंचित् विस्मित होऊन ह्मणाला "काय ! आमच जांवयबोवा-त न्हव ?"

"हं, आतांतरी बरोबर ओळख पटली कीं नाहीं?" दुकानदार किंचित् हंसून ह्मणाला.

रामा खालीं वांकून मोठ्या अदबीनें जांवईबुवांनां रामराम करून ह्मणाला "कस काय जांवयबोवा ! कंदी आल्याशी ? आन् हत् कशान्नी बसल्याशी ?"

# विनोबांची सासुरवाडी.

विनोबा बोलण्याच्या पूर्वीच दुकानदार ह्मणाला "अरे, हे आत्तां तुझ्यापुढेंच येत आहेत. येतील, आतां तुमच्याच घरीं येतील, हो !"

त्याच्या बोलण्याकडे बिलकूल लक्ष्य न देतां रामा पुनः विनोबांकडे वळून ह्मणाला " जांवयबोवा चला, बेगीबेगी चला. ताईसायबान्नी तुमच्या भेटीचा रातदिस लय घोर लागलाया. तुमी आलाव ह्मंजी आज त्येंना म्वाप आनंद वाटल. आतां हत कशान्नी खोटी व्हताव ? चला—"

इतक्यांत बाळकृष्ण चिलमीवर झळफळीत निखारे ठेवून फूंक मारीतमारीत मोठ्या गडबडीनें तेथें आला. त्यानें ही रामाची बडबड ऐकिली. आपण इतक्या कष्टानें तयार करून आणिलेली चिलीम ओढल्याविनाच पाहुणे जातात, हें पाहून त्याला मनस्वी वाईट वाटलें. अर्थात् त्याला कांहीं तें सहन झालें नाहीं. तत्क्षणींच रागरागानें रामाच्या अंगावर येऊन तो ह्मणाला "काय रे ! उगाच काय वटवट लाविली आहेस ? हे तुमचे जांवई आणि आमचे जसे काय कुणीच नाहींत वाटतें ! कां इथें बसले तर तुमचे जांवई बाटतील कीं काय, एकसारखा चला चला करतो आहेस तो ? तूं जा आपलें काम कर पाहूं ! ते येतील सावकाश. आल्यासारखे इथें थोडा वेळ बसतील, पानतंबाखू खातील. जरा विश्रांति घेतील आणि मग त्यांनां जर वाटलें तर येतील तुमच्या घरीं नाहींतर नाहीं येणार, समजलास ? तूं कशाला एवढी किटकिट लाविली आहेस त्यांच्याभोंवतीं ?"

"तूं लय पाजी पोरगा हैस. दम धर, मी धनीसायबान्नी जाउनशान खबर येतो." असें बोलून रामा तेथून तडक निघालाच.

इकडे विनोबांनीं चिलमीवर यथास्थित दम मारण्यास सुरवात केली. हातपाय धुऊन जरा थंड झाले. पुनः इकडल्यातिकडल्या गप्पाष्टकांनां प्रारंभ झाला. इतक्यांत विनोबांचे श्वशुर नानासाहेब देशमुख स्वतः दुकानापाशीं येऊन ठेपले. बरोबर तो मघांचा गडी आणि शिवाय दुसरीहि आठदहा मंडळी होती. नानासाहेबांस पहातांच दुकानावर जमलेली सर्व मंडळी मोठ्या अदबीनें उठून उभी राहिली: विनोबांनीं श्वशुरांनां साष्टांग नमस्कार केला. नानासाहेबांनीं मोठ्या प्रेमानें जामातांना वर उचलून आशीर्वाद दिला व नानाप्रकारें कुशल प्रश्न विचारीतविचारीत ते विनोबांनां आपल्याबरोबर घरीं घेऊन गेले. घरीं जातांजातां वाटेंत गांवांतील आणखीहि बरीच मंडळी त्यांनां येऊन मिळाली. सर्वांचीं मुखकमलें या प्रसंगीं

आनंदानें अगदीं प्रफुल्लित होऊन गेलीं होतीं. देशांतरास गेलेल्या एखाद्या जवळच्या नातलगाची फार दिवसांनीं भेट झाली असतां मनाला जसा विलक्षण आनंद होत असतो, त्याहूनहि जास्त आनंद विनोबांच्या आगमनानें केवळ नानासाहेबांनांच नव्हे, तर त्यांच्याबरोबर असलेल्या त्या सर्व मंडळीलाहि झाला. विनोबांचेंच मुखकमल मात्र कायतें भीतीनें अगदीं म्लान होऊन गेलें होतें! पोलिसच्या शिपायांनीं धरून बांधलेला एकादा कैदी ज्याप्रमाणें मोठ्या भयभीत चित्तानें कारागृहांत प्रवेश करितो, त्याहिपेक्षां जास्त भीतिग्रस्त चित्तानें विनोबांनीं श्वशुरालयीं प्रवेश केला.

---

## प्रकरण सतरावें.

### बालकृष्णा.

विनोबांच्या आगमनानें सगळ्या गांवभर मोठी गडबड उडून गेली. त्यांतहि विशेषतः तरुण मुलांमुलींची धांदल तर विचारूंच नका! नानासाहेब देशमुख हे गांवांत प्रमुख गृहस्थ असून सर्व लोकांशीं नेहमीं मिळूनमिसळून वागणारे, उदार स्वभावाचे, थोर मनाचे, गोरगरिबांनां मदत करण्यास सदैव तत्पर आणि ईश्वरकृपेनें संपत्तिमान् असे होते. मग त्यांच्यासारख्या कुलशील आणि संपन्न गृहस्थाची गांवांत मोठी मानमान्यता असल्यास नवल तें काय! नानासाहेबांचें घराणें आबालवृद्धांनां परम प्रिय असे. सर्वांनां त्यांचा अभिमान होता. तशांत त्यांची मुलगी सुशीला, हीतर आपल्या अंगच्या गुणांनीं, बुद्धीनें आणि अलौकिक विनयसंपन्नतेनें व दानधर्मानें सर्वांनां अतिशय प्रिय झाली होती. तेव्हां विनोबांचें–सुशीलेच्या प्रिय पतीचें–आगमन सर्वांनां आनंददायक झालें, व त्याचप्रमाणें सुशीलेच्या मैत्रिणींत एकसारखी गडबड उडून गेली, यांत कांहीं एक आश्चर्य नव्हतें. तरुण स्त्रियांनींतर नानासाहेबांचें घर या वेळीं अगदीं गजबजून सोडिलें होतें. त्याचप्रमाणें बाहेर दिवाणखान्यांत तरुण पुरुषमंडळीचीहि सारखी गर्दी उडून राहिली होती. या प्रसंगीं नानासाहेबांचें घर जणूं काय आनंदानें नाचतच होतें. सर्वत्र आनंदीआनंद होऊन गेला होता. जांवईबुवांची थट्टामस्करी करण्यांत या तरुण मंडळीची सारखी चढाओढच लागली होती.

परंतु इकडे विनोबांचा जीव अगदीं खालींवर होत होता. ही एवढी मंडळी आपल्याभोंवतीं कां जमली आहे, हें कांहींकेल्या त्यांच्या लक्ष्यांतच येईना.

मंडळी एवढी पराकाष्ठेची थट्टामस्करी करीत होती, परंतु त्यांपैकीं कोणाएकाशीं अक्षरहि बोलण्यास किंवा कोणाला कुशलप्रश्न विचारण्यास विनोबांना धैर्य होईना. ते अगदीं मुखस्तंभासारखे स्तब्ध राहिले होते. "हो, थोरांमोठ्यांशीं प्रसंग, त्यांतून ही पडली शहरांतील मंडळी, यांच्याशीं नीट बोलतां आलें तर ठीक, नाहींतर उगाच फटफजीती मात्र व्हावयाची; त्यापेक्षां आपलें मुळींच न बोललेलें काय वाईट ?" असा पोक्त विचार करून विनोबांनीं मौनव्रत स्वीकारलें होतें. त्यांतूनहि एकदोन वेळां स्वारीनें बोलण्याचा प्रयत्न केला, परंतु तोंडांतून शब्द निघेल तर शपथ ! जशी कांहीं कोणीं मानेवर सुरीच ठेविली होती ! जामातांच्या या विलक्षण मौनानें, सर्व मंडळी अगदीं हिरमुसली झाली आणि कंटाळून हलुहळू आपापल्या घरीं निघून गेली. जातांजातां बापड्या विनोबांना कोणी गर्विष्ठ, कोणी पढतमूर्ख इत्यादि ज्याला जें वाटलें तें तें मनांतल्या मनांत ह्मणत चालते झाले.

मंडळीची गडबड मोडतांच इतका वेळ विनोबांचा जीव जो अगदीं उडून गेला होता तो जरा स्वस्थ झाला आणि त्यांना आतां स्वतंत्र झाल्यासारखें वाटलें. परंतु हा बाहेरचा त्रास चुकतो न चुकतो तोंच आंतून निरोपांवर निरोप येऊं लागले. आतां काय करावें ? विनोबा गहन विचारांत पडले ! त्यांना कांहींएक सुचेना. आंत गेल्यावांचून तर गत्यंतर नव्हतें. बराच वेळ स्वतांशीं विचार करून स्वारी एकदम उठली आणि तडक त्या दुकानदाराच्या येथें पुनः येऊन थडकली. विनोबांनीं दुकानदाराला इत्थंभूत हकीगत सांगितली. आपण इकडे कोणत्या उद्देशानें आलों हेंहि सांगितलें, आणि या अडचणींतून निभावण्याला आतां कांहींतरी युक्ति सांगण्याविषयीं त्याची ते विनवणी करूं लागले. विनोबांची ही सारी हकीगत बाळकृष्णा मोठ्या कौतुकानें ऐकत होतीं. तो मध्येंच एकदम ह्मणाला "दादा, मला न्याना तुमच्याबरोबर पाठराखा ! जांवयाच्या पंक्तीचा दोन दिवस अनायासें लाभ मिळून चंगळतरी उडेल ! आणि मी बरोबर असलों ह्मणजे मग तुह्मांला एक अक्षरहि उच्चारायला नको. पहातर खरें, मी सगळ्यांना कशी झटपट उत्तरें देतों तीं ! बोला, नेतां का मला ? पहा बुवा, तुमच्या बऱ्याकरितां ह्मणून सांगतों."

विनोबांच्या हातांत जणूं स्वर्गच आला ! त्यांनीं बाळकृष्णाला आपल्याबरोबर पाठविण्यास दुकानदाराची मोठ्या मिनतवारीनें सम्मति मिळविली.

तो पोरगाहि मोठ्या आनंदानें आपले ते दुकानावरचे मळकट कपडे काढून अगदीं जिवापलीकडे जपून ठेवलेलें सणासुदीनाच्या दिवशीं नेसावयाचें रेशमी धोतर, अंगरखा, टोपी वगैरे चढवून मोठ्या थाटानें विनोबांबरोबर निघाला. दोघांच्या स्वाऱ्या दिवाणखान्यांत जाऊन बसतात न बसतात तोंच "फराळाला उठा, आतां उगीच उशीर कां ?" असा अगदीं निकडीचा निरोप आला. त्याबरोबर विनोबांनां आंत जावेंच लागलें. बाळकृष्णाची स्वारीहि त्यांच्या मागोमाग चालली. आंत प्रवेश करतांच सुशीलेच्या तरुण मैत्रिणींचा मंद हास्यध्वनि कानीं येऊं लागला. त्याबरोबर विनोबांच्या तोंडचें पाणीच पळालें, आतां काय करावें! अंतर्गृहाच्या ज्या बाजूकडून हा ध्वनि येत होता ती बाजूच अजीबात टाळावी, हाच उत्तम मार्ग, असा पोक्त विचार करून विनोबा दुसऱ्याच बाजूला जाऊं लागले; परंतु त्यांचा तो प्रयत्न निष्फळ झाला. एका मोलकरणीनें तावडतोब पुढें होऊन जिकडे जाण्याचें ते चुकवूं पहात होते, त्याच खोलींत चलण्याविषयीं विनोबांनां नम्रतेनें विनंति केली. बलिदानास्तव नेत असलेल्या एखाद्या बकऱ्याप्रमाणें, कांपतकांपत विनोबांची स्वारी अगदीं नाइलाजास्तव त्या खोलींत शिरली. तोंच झट्दिशीं तेथील मुलींच्या नेत्रकटाक्षांमधून तारायंत्र फिरलें. या अपूर्व नेत्रपल्लवीनें सगळ्या जणी क्षणार्धांत परस्परांचे मनोभाव जाणून चुकल्या. विनोबांनीं पाहिलें, तों त्या विस्तीर्ण अंतर्गृहांत चोहोंकडे अनेक युवती एकत्र झाल्या असून मध्यभागीं चांदीच्या ताटामध्यें फराळाकरितां नानाविध मिष्टान्नें वाढलीं आहेत. खालच्या मानेनें जांवईबुवा पाटावर तर जाऊन बसले. अर्थात् त्यांचे पानजांवई ऊर्फ पाठराखे बाळकृष्ण यांची स्वारीहि त्यांच्या शेजारींच दुसऱ्या पाटावर विराजमान झाली. विनोबांचे एकंदर व्यवहार पाहून त्या युवतींचें तें मधुर हास्य एकदम मावळलें. किंचित्काळ अंतर्गृह निःशब्द झालें. त्या सकल रमणींचीं प्रफुल्ल मुखकमलें निस्तेज झालीं. परंतु एवढा मोठा युवतिसमूह आणि बराच वेळ स्तब्ध कसा राहूं शकेल! एकीनें शेवटीं त्या कंटाळवाण्या स्तब्धतेचा भंग केलाच. ती हंसतहंसत ह्मणाली "भावजी! आज इतक्या दिवसांनीं सहज वाट चुकून इकडे आलां वाटतं ?"

पण भावोजींचें तोंड उघडतें आहे कशाला! मान वर उचलतील तर शपथ! वास्तविक पाहिलें असतां त्यांनां आतां तोंड उघडण्याची आवश्यकताहि राहिली नव्हती. बाळकृष्णाला त्यांनीं आपल्या वतीनें पूर्ण मुखत्यारपत्र दिलें होतें. त्यानें चट्दिशीं उत्तर दिलें "वहिनी! अहो, आह्मी रस्ता चुकलों असतों तर नेमके

इथेंच कसे बरें आलों असतों ? रस्ता अगदीं बरोबर माहीत होता ह्मणूनचतर बिनचूक इथें येऊन पोहोंचलों !"

हें सणसणीत उत्तर ऐकतांच सगळ्या जणी बाळकृष्णाच्या त्या बालमूर्तीकडे पहातच राहिल्या ! जांवयांच्या बरोबर हा मुलगा कोण, हें कांहीं केल्या त्यांच्या लक्ष्यांत येईना. शेवटीं पहिला प्रश्न करणाऱ्या तरुणीनें सर्वांची मनीषा तृप्त करण्याकरितां मोठा हिय्या करून " जांवईबुवांला तुह्मीं कुठं गांठलं ? " ह्मणून बाळकृष्णाला विचारिलेंच.

बाळकृष्णच तो. त्यांनां सरळ उत्तर देतो थोडेंच ! विनोबांकडे बोट दाखवून तो ह्मणाला " हे माझे दादा. " इतकेच शब्द उच्चारून ताटांतील सबंध अर्धा लाडू उचलून त्यानें एकदम तोंडांत टाकिला. त्याच्या या बोलण्याचें त्या स्त्रियांनां मोठे कौतुक वाटलें व त्यांच्या निस्तेज झालेल्या मुखकमलांवर पुनः मधुर हास्य विलसूं लागलें.

बाळकृष्णानें दिलेलीं उत्तरें ऐकून विनोबांच्या आनंदास तर पारावारच राहिला नाहीं. ते मनामध्यें त्या मुलाची एकसारखी वाहवा करूं लागले. हा बरोबर होता ह्मणूनच आज आपली अब्रू राहिली, असें त्यांनां वाटूं लागलें. तरीहि इतक्या परक्या बायका सभोंवतीं जमलेल्या पाहून फराळ करण्याला त्यांनां किंचित् लज्जाच वाटूं लागली. इकडे त्या स्त्रियातर जामातांची अधिकाधिकच थट्टा करूं लागल्या. विनोबांचा हात अगदींच थांबला. त्यांनां फराळबिराळ कांहींएक सुचेना. केव्हां एकदा या त्रासांतून सुटतों, असें त्यांनां होऊन गेलें. हें पाहून बाळकृष्ण त्या स्त्रीमंडळीस उद्देशून ह्मणाला " इतक्या लांबून आल्यानें दादांला फार त्रास झाला आहे. तर पहिल्यानें यथेच्छ फराळ करून आह्मांला जरा ताजेतवाने होऊं द्या आणि मग वाटेल तितकी थट्टा करा. आमची बिलकूल ना नाहीं, पण काहो वहिनी ! थोडीं भजीं आणखी कां आणीत नाहीं ? आमच्या दादांनां किनई तीं फारच आवडतात. "

सगळ्यांचीं तोंडें एकदम बंद झालीं. तो मुलगा होता ह्मणूनच आपल्या वर्तनावर केलेली ही झणझणीत टीका त्या स्त्रियांनां सहन झाली. इतकेंच नव्हे, तर त्याच्या बोलण्याचा कांहींएक विषाद न मानितां उलट त्यांच्याची अधिकच थट्टामस्करी करण्यास प्रवृत्त झाल्या. इतक्या अवधींत विनोबांचा फराळ जेमतेम आटोपला. बाळकृष्णाच्या ताटांत मात्र कांहींएक शिल्लक राहिलें नाहीं. आणखीहि गट्ट करण्याचा त्याचा विचार होता, परंतु विनोबा उठले तेव्हां नाइला-

जास्त त्यालाहि उठणें भाग पडलें. हात पुशीतपुशीत पानसुपारी खाण्याकरितां शेजारच्या खोलींत जांवईबुवांची स्वारी शिरली. बाळकृष्णहि पाठोपाठच चालला. तें पाहून सर्व स्त्रिया पुनः कौतुकानें गालांतल्या गालांत हंसूं लागल्या. त्यांनां या मुलाच्या प्रत्येक शब्दानें व प्रत्येक कृतीचें मोठें कौतुक वाटूं लागलें.

विडा वगैरे खाऊन सुंदर बिछायतीवर लोडाशीं टेंकून विनोबा बसतात न बसतात तोंच हास्यविनोद करण्यास उत्सुक झालेला तो युवतीसमूहहि पुनः तेथें येऊन हजर झाला. विनोबांनां वाटलें होतें, कीं, तूर्ततरी आपण या कचाटांतून सुटलों; परंतु पुनः जेव्हां ही मंडळी त्यांनां वेढा देऊन उभी राहिली, तेव्हां त्यांचा जीव अगदीं खालीं वर होऊं लागला. छाती धडधड उडूं लागली. मुख अगदीं म्लान झालें. इतक्यांत एका अनुपम रूपसंपन्न बालिकेनें कर्णमधुर मंजुळ स्वरानें विनोबांनां विनयपूर्वक विचारिलें " भावजी ! आमची आठवणतरी आहे का, का ओळखदेखसुद्धां विसरलां ?"

भावोजींच्या तोंडाला कुलूप ! परंतु बाळकृष्णानें डोळे मिचकावीतमिचकावीत तत्क्षणींच उत्तर दिलें " वा: ! आठवण नसती तर इकडे आलों असतों हो कशाला ? आह्मी इथें आलों आहों एवढ्यावरूनच आठवण आहे हें सिद्ध होत नाहीं का ? ओळखीविषयीं ह्मणाल, तर आपल्यासारख्यांनां एकवार पाहिल्यावर आपली ओळख विसरणें शक्यतरी आहे ? मी तो विसरायचा नाहीं, मग आमच्या दादांची गोष्ट कशाला हवी ! "

बिचारी बालिका या अकल्पित उत्तरानें अगदींच खजील होऊन सर्वांच्या मागें जाऊन लपली. त्यासरशीं दुसरी एक तरुणी जरा धिटाईनेंच ह्मणाली " तूं रे कां जिथंतिथं तोंड घालतोस ? तूं आपला चूप बस कसा ! तुला कांहीं कुणी विचारीत नाहीं, समजलास ? "

बाळकृष्ण या असल्या बोलण्याची थोडीच पर्वा करतो ! तो खडखडून ह्मणाला "हें काय भलतेंच बोलतां हो तुह्मी वहिनी ! मी काय आपला दादांच्या पंक्तीला केवळ यथेच्छ जेवायलाच आलों आहें वाटतें, मला चूप बसायला सांगतां त्या?"

" तुझे दादा मुकेबिके आहेत वाटतं, त्यांनां विचारलेल्या प्रत्येक प्रश्नाचं उत्तर तूंच देत आहेस तो ? "

" कां असतील मुके ? मी आहेंना त्यांचेबरोबर ! मला ज्या प्रश्नाचें उत्तर अगदीं देतांच येणार नाहीं, त्याच प्रश्नाचें उत्तर ते देतील, समजलां ! भलत्या सलत्या क्षुल्लक प्रश्नांनां ते काय ह्मणून जबाब देतील ? "

बाळकृष्णाच्या या उत्तरानेंतर खूपच हंशा पिकला. किंचित् काळ गेल्यानंतर तीच स्त्री पुनः ह्मणाली " वाः रे वा! फारच हुशार मुलगा आहेस तूं! कांहो जांवईबुवा, हा असला हुषार सोबती तुह्मांला मिळालातरी कुठं?"

यावर बाळकृष्ण मोठ्या आढ्यतेनें ह्मणतो " वहिनी! राजांनां हत्तीघोडे कुठें मिळतात?"

त्या स्त्रियांची हंसतांहंसतां मुरकुंडीच वळली. बाळकृष्णाचें हें अपूर्व चातुर्य पाहून विनोबांनांहि आतां बोलण्याचें धाडस करावेंसें वाटलें. परंतु कोणाजवळ आणि काय बोलावें, हेंच त्यांनां कांहीं केल्या सुचेना. शेवटीं ते बाळकृष्णाकडेच वळून ह्मणाले " बाळकृष्णा! एक चिलीम तरी भरून आण पाहूं."

विनोबांच्या तोंडून शब्द निघण्याचाच अवकाश, बाळकृष्ण उड्या मारीतच गेला. इतक्यांत हळुहळू एक वैधव्यदुःखाग्नीनें पोळलेली म्लानवदन मूर्ति दारासमोर येऊन उभी राहिली. तत्काळ सगळ्यांची दृष्टि तिकडे वेधली. आपल्या सदूभाऊंचे श्वशुर रामचंद्रपंत सहस्रबुद्धे यांची ही वडील सून. अर्थात् माधवरावांचे ज्येष्ठ बंधु परलोकवासी नारायणराव यांची विधवा स्त्री व नानासाहेबांच्या सख्या चुलत बंधूंची कन्या. आह्मीं पूर्वी वर्णन केलेल्या हतभागिनी लक्ष्मीबाई त्या याच. यांचा विशेष परिचय आह्मी मागाहून देऊं. एक क्षणभरच आंत डोकावून, हरि जाणे मनांत काय आलें तें, दुर्दैवी लक्ष्मीबाई झट्दिशीं अदृश्य झाल्या. विनोबा आश्चर्यचकित होऊन सगळ्यांच्या तोंडाकडे पहात राहिले. हें पाहून त्यांतील एक तरुणी सुस्कारा टाकून अगदीं करुणाजनक स्वरानें ह्मणाली "बिचारीवर आकाशची कुऱ्हाड कोसळली आहे. कसलाहि आनंदउत्साह पहातांच बापडीला दुःखाचं भरतं येतं. आह्मी तुमच्याशीं हास्यविनोद करीत आहों, हें पाहून आंत गेली. काय करील बापडी!"

थोडा वेळ जिकडेतिकडे अगदीं स्तब्ध झालें. कोणाएकीच्याहि तोंडांतून शब्द निघाला नाहीं. कांहीं वेळ गेल्यावर ती मागें लपलेली बालिका पुनः धीर करून पुढें येऊन आपल्या मंजुळ मृदुस्वरानें विचारूं लागली "भावजी, आजपर्यंत अनेक वेळां तुह्मांला बोलावणीं पाठविलीं; एकदींनदांतर मुद्दाम गाडीसुद्धां पाठविली होती, परंतु तीहि परत आली; असं असून आज आपण होऊनच तुह्मी आलां, हा एवढा आमच्यावर अनुग्रह कसा झाला? मलातर बाई वाटलं, कीं, भावजी आमच्यावर अगदीं रागावले!"

छोट्या मेहुणीचें हें लडिवाळपणाचें सरळ भाषण ऐकून विनोबांनीं उत्तर देण्याचें धाडस केलें. शिवाय बाळकृष्णहि अद्यापि परत आला नव्हता. ते ह्मणाले " आईनें पाठविलें ह्मणून आलों—"

" अस्सं ! तरी मला वाटलं बाई हें झालंतरी कसं ? "

ती बालिका पुढें आणखी कांहीं बोलणार आहे, इतक्यांत हातांत चिलीम घेऊन बाळकृष्णाची मूर्ति तेथें प्राप्त झाली. आपल्या पक्षाचा पूर्ण पराजय होत आहे हें तत्काळ त्याच्या लक्षांत आलें. विनोबांच्या हातांत चिलीम देऊन तो तत्क्षणींच ह्मणाला " असें हो काय भलतेंच बोलतां तुह्मी ? आमच्या वहिनींनां नेण्याकरितां आईनें आह्मांला पाठविलें आहे, समजलांत. आईनें सांगितल्याविना का आह्मीं त्यांनां न्यायला यावें ? वाः, तुह्मीतरी बऱ्याच आहां कीं हो !"

बिचाऱ्या बालिकेची अगदीं त्रेधा उडाली. आपण कोठच्या कोठें बोललों असें तिला होऊन गेलें. तिला किंचित् रागहि आला. " याचं आपलं जिथंतिथं आहेच कांहींतरी !" असें पुटपुटत ती तेथून चालती झाली. पुनः पुढें ह्मणून कांहीं आली नाहीं.

युवतिवर्गांत बाळकृष्णाच्या या समयोचित उत्तराची फारच तारीफ होऊं लागली. सर्वांनां त्याचें मोठें कौतुक वाटूं लागलें. त्या त्याची अधिकाधिकच थट्टा करूं लागल्या. शेवटीं एक सुंदरी त्याच्या नांवावर टीका करून त्याला लाजविण्याच्या उद्देशानें मोठ्या डौलानें ह्मणाली "काय रे, तुझं नांव बाळकृष्ण ना ? अरे, कृष्णतर बाळपणीं गुरं राखीत होता, तूंहि तसंच करतोस वाटतं ! "

परंतु बाळकृष्ण कसला वस्ताद ! चट्दिशीं हंसतहंसत ह्मणाला " हो हो ! मी गुरें राखीत असतों, इतकेंच नाहीं, तर रानांत गेल्यावर कदंबाच्या झाडाखालीं मुरलीहि वाजवीत बसतों, समजलें ! "

या भाषणानंतर ललनागणांत एकच हंशा पिकला. एक बालिका हंसतहंसत ह्मणाली " अहाहा ! काय पण मुरली वाजविणाराचं तोंड ! तुला गायलातरी येतं का, मुरली वाजवतों ह्मणतोस तो ! "

" हो हो, सांगा कोणतें पद गाऊं तें. आत्तां गाऊन दाखवितों ! "

शेवटपर्यंत त्याचा पिच्छाच पुरवावा या विचारानें ती बालिका ह्मणाली " तूं मुरली वाजवितों ह्मणतोस ना ? ह्मण तरमग एक मुरलीचंच गाणं पाहूं !"

बाळकृष्णाची ताबडतोब सुरुवात झाली. आपल्या बालमधुर आवाजानें तो मोठ्या ऐटीनें गाऊं लागलाः—

जमुनापे बाजे बासरियां!
बाजे बासरियां—
बाजे बासरियां-हो,
जमुनापे बाजे बासरियां ! । ध्रु० ।
गोकुल बाजे-बिंद्राबन बाजे—
फिरके सुनाजा शांवरियां,
हो-जमुनापे बाजे बासरियां!

युवतीवर्ग तटस्थ! आमच्या विनोबांची स्वारीतर नुसती तल्लीन होऊन गेली. बाळकृष्ण ही एक अद्वितीय मूर्ति आहे, असें त्यांनांहि वाटूं लागलें. त्या अल्पवयस्क बालकाच्या मधुर कंठांतून अगदीं तालसुरांत निघणारे ते मधुर आलाप ऐकून त्या रमणी वेडावूनच गेल्या. आपापल्यापरी त्या त्याची अत्यंत प्रशंसा करूं लागल्या. याप्रमाणें या गृहदेवता तुष्ट झाल्यावर बाळकृष्णाचीहि खाण्यापिण्याची यथेच्छ चंगळ उडाली, हें निराळें सांगावयास नकोच !

---

## प्रकरण अठरावें.

### पतिपत्नींची भेट.

रात्रीं दहांचा समय झाला आहे, भोजनादि विधि उरकून विनोबांची स्वारी नुक्तीच शयनगृहांत आली आहे, परंतु त्यांची पत्नी लक्ष्मीबाई मात्र अद्यापपर्यंत आली नव्हती. अगदीं संध्याकाळपर्यंत विनोबा रमणीवृंदामध्येंच होते; परंतु बाळकृष्ण जवळ असल्यामुळें त्यांनां मोठा धीर होता. बाळकृष्णाच्या वाक्चातुर्यानें त्यांचीहि संकोचवृत्ति अंमळ कमी झाली होती. परंतु आतां कांहीं तो बरोबर येऊं शकणार नाहीं, आतां आपली फजिती होईल, या विचारानें त्यांनां पुनः मोठी भीति पडली. त्यांचें तोंड सुकून गेलें. सुशिक्षित, बुद्धिमान् पत्नीबरोबर सगळ्या रात्रभर आपला टिकाव कसा लागेल! तिनें जर कांहीं प्रश्न विचारला तर त्याचें उत्तर काय द्यावें? यदाकदाचित् समर्पक उत्तर देतां आलें नाहीं तर तिच्याजवळ आपली फटफजिती व्हावयाची! या विवंचनेनें त्यांनां अगदीं ग्रासून टाकिलें. इतक्यांत लक्ष्मीबाई अगदीं मंदमंद पाउलें टाकीत शयनगृहांत आल्या. विनोबांच्या हृदयांततर धडकीच भरली! अगदीं गाढ झोंप लागली आहे, असें ढोंग करून स्वारी डोक्यावरून अगदीं गुरगटून पांघरूण घेऊन पलंगावर एके बाजूस निजून राहिली. लक्ष्मीबाईनीं हळूहळू

पतिसन्निध शयन केलें. बराच वेळपर्यंत दोघेंहि स्तब्ध पडून राहिलीं. कोणाच्याच मुखांतून शब्द निघेना! आणि ही गोष्ट विनोबांच्यातर अगदीं पथ्यावरच पडली; परंतु आमच्या सुशीलाबाईनां हें असलें कंटाळवाणें मौन अगदींच असह्य झालें. त्यांच्यानें आतां स्तब्ध रहावेचना. त्यांनीं मोठ्या विनयानें विनोबांला विचारिलें "घरची सर्व मंडळी खुशाल आहे ना ?"

विनोबा या प्रश्नाचें कांहींएक उत्तर देऊं शकले नाहींत. एकदां त्यांनां वाटलें, या प्रश्नाचें उत्तर 'होय' या एकाच शब्दानें द्यावयाचें आहे, यापेक्षां जास्त कांहींएक करावयाचें नाहीं, मग उत्तर देण्याला अडचण ती कसली ? परंतु लागलाच त्यांनां दुसराहि विचार सुचला. या प्रश्नाचें उत्तर दिलें, तर ही आणखी दुसरा प्रश्न विचारील; दुसऱ्याचें दिलें कीं तिसरा विचारील; आणि मग असे जर एकावर एक प्रश्न येऊं लागले, ह्मणजे त्यांवर उत्तरें तरी काय द्यावीं ? न जाणों वेळेस कांहीच्याबाहींच व्हावयाचें! त्यापेक्षां आपलें आतांच उत्तर देऊं नये ह्मणजे दुसरा प्रश्नच यावयाचा नाहीं. असा पोक्त विचार करून 'मौनं सर्वार्थसाधनं' या महामंत्राचा जप करीत स्वारी अगदीं तोंडाला कुलूप लावून स्तब्ध राहिली. बराच वेळ झाला. आपल्या प्रश्नाला कांहींएक उत्तर येत नाहीं, हें पाहून लक्ष्मीबाई नंतर दुसरा प्रश्न विचारण्याच्या भरीस पडल्या नाहींत. हळूच उठून पतीची पादसेवा करण्यास त्यांनीं सुरुवात केली. परंतु त्यांनीं पायाला हात लाविला मात्र, तोंच विनोबा "ऊंः! आयाईग कळ लागली!" असें ओरडतच सुटले.

पतीच्या या वेदना पाहून लक्ष्मीबाईचें हृदय अगदीं कळवळून गेलें. त्यांनीं आपला हात काढून घेऊन करुणस्वरानें विचारिलें "कशानं बरं एवढी कळा लागली?"

विनोबांनीं पाहिलें, एकवार आपण बोलून चुकलों, तेव्हां आतां या प्रश्नाला उत्तर दिल्यावांचून गत्यंतरच नाहीं. ह्मणून मोठा धीर करून ते हळूच ह्मणाले "इतका लांब शिंच्या त्या खडकाळ रस्त्यानें चालून आल्यामुळें पाय अगदीं आंबून गेले आहेत, जरा कांहीं लागतांच एकदम कळ उठते."

लक्ष्मीबाई यावर कांहींएक बोलल्या नाहींत. तत्क्षणींच पलंगावरून उठून घरांत गेल्या. एका वाटींत तेल आणून तें त्यांनीं दिव्याच्या ज्योतीवर चांगलें गरम केलें. नंतर अगदीं हलक्या हातानें तें पतीच्या पायांत चोळीत बसल्या. विनोबांचे पाय खरोखरच फार दुखत होते. गरम तेल चोळतांच त्यांनां बराच आराम वाटला. तेल चोळतांचोळतां लक्ष्मीबाईनीं पुनः विचारलें "घरची सर्व मंडळी खुशाल आहे ना?"

विनोबांनीं उत्तर दिलें "हं."
"जाऊबाई ह्मणे रागानं माहेरीं निघून गेल्या?"
"हं."
"आणि त्यांनां आणायला इकडून जायचं झालं होतं?"
"हं."
"मग त्यांनीं कां बरं जाऊबाईनां पाठविली नाहीं?"

आतां काय करावें? हें शिंचें मोठेंच लचांड आलें! आतांपर्यंत नुसत्या 'हं' नें निर्वाह झाला; परंतु या प्रश्नाचें उत्तर कांहीं 'हं' किंवा 'अं हं' करून देतां येणें शक्य नव्हतें! अर्थात् विनोबांची घाबरगुंडी उडाली. परंतु नाइलाज झाला. उत्तर तर दिलेंच पाहिजे. शेवटीं बराच विचार करून ते ह्मणाले "दादाला तेथें रोजगार लागला आहे ह्मणून."

"खरोखरच मला आणण्यासाठींच का सासूबाईनीं इकडे पाठविलं आहे?" पुनः विनोबा पूर्वपदावर येऊन ह्मणाले "हं."

"तरी ह्मणायची इतक्या दिवसांनीं सासूबाईनां माझी आठवण झाली! त्यांच्या या वयांत त्यांची सेवाशुश्रूषा करावी, अशी माझी मोठी इच्छा; परंतु आजवर कांहीं त्यांनीं ती पूर्ण होऊं दिली नाहीं. पुष्कळ वेळां मला वाटे, कीं, मी त्यांचा नकळत कांहींतरी महान् अपराध केला असला पाहिजे, आणि म्हणूनच त्यांनीं मला ही असह्य शिक्षा दिली असावी; परंतु तो असा अपराध तरी काय, हें बाई कांहीं केल्या माझ्या ध्यानांत येईना. असो. तें कांहीं का असेना, आज माझी सर्व चिंता दूर झाली. बरं, पण इतके दिवस सासूबाईनीं मला कां नेलं नाहीं, तें नाहींका मला सांगायचं?"

विनोबांचा धीर आतां बराच चेपला होता. ते ह्मणाले "तुझे दागिने कांहीं आईला आजवर सोडवतां आले नाहींत, आणि ह्मणूनच तुला तिकडे नेण्यास तिला अगदीं जड वाटत होतें."

"सासूबाई मला इतकी का क्षुल्लक समजतात? त्या दागिन्यांचं मला आतां कारण राहिलं नाहीं. बाबांनीं मला केव्हांच दुसरे दागिने करून दिले आहेत. आणि नसते दिले, तर त्या दागिन्यांवर का माझा जीव अडून बसलां होता?"

"पण याहि खेपेला तूं हे आपले सगळे दागिने बरोबरच घेणार का काय?"

"कायतरी बाई चमत्कारिक विचारणं हें! न न्यायला कोणती अडचण आहे? हे दागिनेहि आपलेच आहेत बरं! गरजच लागली, तर यांचाहि उपयोग करायला कुणाची हरकत का आहे?"

## धाकट्या सूनबाई.

पत्नीचें हें भाषण ऐकून विनोबा थक्क झाले! बराच वेळ ते कसलासा विचार करीत होते. नंतर या सर्व विचारांपासून मुक्त करून पूर्ण विराम देण्याची शक्ति ज्या देवतेच्या अंगांत आहे त्या देवतेला–चिलमीला–एकवार अनन्य भावानें शरण जाण्याच्या उद्देशानें शय्यात्याग करून विनोबांची स्वारी उठूं लागली. लक्ष्मीबाई अद्यापि त्यांचे पाय चुरीतच बसल्या होत्या. पतीचा उठण्याचा उद्देश त्यांच्या लक्ष्यांत येतांच विनोबांनां पुढील श्रम कांहीं त्यांनीं दिले नाहींत. पतीची ही संवय त्यांनां माहीत होती व त्याप्रमाणें त्यांनीं सर्व सिद्धता पूर्वीच करून ठेविली होती. आमच्या धाकट्या सूनबाईनीं तत्काळ उठून आपल्या हातानें चिलीम भरून पतीच्या हातीं दिली. विनोबांचा विस्मय विचारूं नका. बिचाऱ्यांची इतकी शुश्रूषा साऱ्या जन्मांत कोणीं केली नव्हती!

---

## प्रकरण एकोणिसावें.

### नानासाहेब देशमुख.

रात्रीं पांघरलेली काळी शाल दूर सारून पूर्वदिशा शुभ्र वस्त्र परिधान करीत आहे; निबिड वृक्षांमधून एकाद्या दुसऱ्या पक्ष्याचा मंजुल रव कानीं येत आहे; सूर्योदयाला अजून कितीतरी अवकाश आहे; पक्षिगण अजून घरट्याबाहेर पडलेला नाहीं; मंद, शीतल वायु झुळझुळ वहात आहे; अहाहा! या प्रातःकाळच्या शीतल वायूची महती किती ह्मणून गावी! हा कितीतरी शीतल कितीतरी सुगंधित, आल्हाददायी आणि शांतिसुख देणारा! याच्या सुखकर स्पर्शानें सर्वांग जणूं अमृतरसानेंच अभिषिक्त होतें. अंतःकरण सुप्रसन्न आणि उल्लसित होतें. सृष्टिदेवतेचें या वेळचें स्वरूप किती मधुर, कोमल आणि आनंददायी ह्मणून सांगावें! या माधुर्याचा, ह्या कोमलतेचा केवळ अंतःकरणानें अनुभवच घेतला पाहिजे; वर्णन करून तें व्यक्त करतां येणें शक्य नाहीं.

अशा या रम्य उषःकालीं आमचे नानासाहेब देशमुख, शय्यात्याग करून शुचिर्भूत होऊन नित्यनियमाप्रमाणें प्रातःस्मरण करीत करीत हातांमध्यें फुलांची परडी घेऊन बाहेर पडले होते.

*** चन्द्रकिरण शीतल भई ***
*** त्रिविध मंद चलत पवन पल्लवद्रुम डोले!**
**जागिये रघुनाथ कुंवर! पंछी बन बोले!**

## नानासाहेब देशमुख.

प्रातभानु प्रगट भयो, रजनीकौ तिमिर गयो,
भृंग करंत गुंज गानं, कमलन दल खोले !
जागिये रघुनाथ कुंवर ! पंछी बन बोले !
ब्रह्मादिक धरत ध्यान. सुरनरमुनि करत गान
* * नयन पलख खोले !
जागिये रघुनाथ कुंवर ! पंछी बन बोले !
* * * * *

* भोर भयो प्यारे !
राजिवलोचन विशाल प्रीतबापिका मराल
ललित कमलबदनउपर मदन कोटि वारे !
जागिये कृपानिधान !
अरुण उदित विगत शर्वरी शशांक किरणहीन
दीन दीपज्योति मलिन द्युतिसमूह तारे !
जागिये कृपानिधान !
मनोज्ञानवनप्रकाश
आसत्रासतिमिर तोषतरणि तेज जारे
जागिये कृपानिधान
तुलसिदास अति अनंद देखिकै मुखारविंद—
* * मंद द्वंद्वभारे
जागिये कृपानिधान !

वरीलप्रमाणें मुखानें भूपाळ्या ह्मणतह्मणत नानासाहेब मोठ्या पहांटेस बागेमध्यें नित्य फिरत असत. ईश्वरकृपेनें त्यांच्या पदरीं अनेक चाकरमाणसें होतीं, तरीहि हें काम ते स्वतांच करीत. घराला लागूनच त्यांचें एक रमणीय पुष्पोद्यान होतें. सांप्रतच्या कित्येक श्रीमंत हौसी लोकांच्या उद्यानांप्रमाणें नानासाहेबांच्या उद्यानामध्यें विदेशीय गंधविहीन पुष्पवृक्ष अथवा केवळ रम्य पर्णधारी वृक्षवल्ली मुळींच नव्हत्या. तर केवळ देवसेवेलाच उपयुक्त अशा नानाविध सुवासिक फुलझाडांनीं हें उद्यान नेहमीं परिपूर्ण असे. नानासाहेब फुलें खुडीतखुडीत चोहोंकडे मंद पावलें टाकीत फिरत असतां प्रभातसमयींचा तो शीतल वायु

आपल्या सुखकर स्पर्शानें जणूं मनोभावानें त्यांची सेवा करी. सत्संगाचा महिमाच असा आहे! पहांटेच्या वेळचा तो वायु केवळ शीतलच नसे, तर नानाविध सुगंध पुष्पपरागांच्या संसर्गानें या वेळीं अति मनोरम परिमल धारण करून हृदयाला त्याचप्रमाणें देहाला तुष्टिपुष्टीचा लाभ देत असे. आणि ह्मणूनच नानासाहेब फुलें गोळा करण्याकरितां स्वतः नित्यनेमानें मोठ्या पहांटेस बागेमध्यें येत असत. शिवाय देवसेवेवर त्यांची निस्सीम भक्ति होती. अर्थात्, अशा पवित्र कार्याचा भार चाकरमाणसांवर ते कां बरें टाकतील?

जाई, जुई, मल्लिका, गुलाब, मांदार, कांचन, पारिजातप्रभृति सुमनोहर पुष्पें, कोमल बिल्वपत्रें आणि तुलसीदलें इत्यादिकांनीं परडी भरतांच नानासाहेब घरीं येत. तदनंतर घरांतील सांसारिक कार्यांची व्यवस्था लावून बाहेर ओटीवरील बैठकीवर येऊन बसत. गांवांतील दुसरेहि कित्येक कुलीन, संभावित गृहस्थ आस्तेआस्ते या ठिकाणीं जमत. या वेळीं बहुधा दररोज ही मंडळी येथें एकत्र होत असे. ही मंडळी या ठिकाणीं निरर्थक गप्पा झोकण्यास किंवा पानसुपारीचा फन्ना पाडण्यास गोळा होत नसे; तर या संभावित गृहस्थांच्या साहाय्यानें नानासाहेब गांवांतील लोकांच्या देवघेवीच्या व दुसऱ्या सर्व फिर्यादीअर्यादींचा न्याय करीत. शिवाय गांवांतील समाजशासनाचा भारहि त्यांच्याच शिरावर होता. गांवामध्यें नानासाहेबांचा विलक्षण दरारा असे. आणि याला कारण त्यांच्या अंगची थोर विद्वत्ता, आदरणीय देवभक्ति, अतुलनीय न्यायपरायणता आणि देवदुर्लभ चरित्र हेंच होय. केवळ ऐश्वर्याच्याच जोरावर लोकांवर इतकें वजन संभवनीय नाहीं.

नानासाहेबांच्या या पंचाईतसभेचा निवाडा कोणीहि अमान्य करीत नसे. कारण, गांवांतील आबालवृद्धांची या सभेवर पूर्ण भक्ति आणि श्रद्धा असे. अनर्थमूलक कोर्टाची पायरी चढून सर्वस्व गमावून बसण्याची पाळी या गांवांतील कोणाहि व्यक्तीचे कपाळीं येत नसे. अर्थात्, या पंचाईतसभेच्या निवाड्यानें वादी प्रतिवादी असे दोघेहि संतुष्ट होत. शिवाय जे कित्येक अपराध राजशासनाखालीं येत नाहींत, अशा सर्व सामाजिक अपराधांचीहि येथें चौकशी चालत असे. कोणीं एकाद्या सामाजिक व धर्मसंबंधीं नियमाचें उल्लंघन केलें, तर त्याला त्याच्या अपराधाप्रमाणें न्हावी, धोबी, गुडगुडी इत्यादि बंद करून यथायोग्य शासन करण्यांत येत असे. शिवीगाळ, मारामारी वगैरे फौजदारी खटल्यांत झालेल्या दंडाची जी रकम गोळा होई, तिचा गांवांतील आंधळेपांगळे, अनाथअपंग आणि

दरिद्री अशा लोकांनां साह्य करण्याकडे विनिमय होत असे. त्या संपूर्ण गांवांत नानासाहेबांसारखा योग्य मनुष्य दुसरा कोणीहि नव्हता. शिवाय गांवांतील आबालवृद्धांची त्यांच्यावर इतकी कांहीं अमर्याद भक्ति आणि श्रद्धा होती, कीं, गांवांतील दुसऱ्या चारचौघां संभावित गृहस्थांच्या सल्लयाशिवाय त्यांनां एकट्यांनांच हें काम करतां आलें असतें; परंतु आपल्या हातून कधींहि चुकी होणार नाहीं अशी त्यांनां घमेंड नव्हती; आणि ह्मणूनच दुसऱ्या चारचौघां शिष्ट जनांची सल्लामसलत घेतल्यावांचून ते कोणत्याहि गोष्टीचा विचार करीत नसत. या पंचाईतसभेपुढें आलेल्या खटल्यांचा निकाल करण्याकरितां सकाळीं सुमारें सव्वा प्रहर दिवस होईपर्यंत नानासाहेब बसत असत. तदनंतर स्नानसंध्या, देवपूजादि आन्हिककर्में करण्यांत ते नियुक्त होत. देवपूजा आटोपतांआटोपतां दोन प्रहर दिवस उलटून जात असे. पूजा आटोपतांच ते पुनः बाहेर येत. या ठिकाणीं दोनचार तरी अतिथी बसलेले असावयाचे. मोठ्या आनंदानें सर्वांआधीं त्यांची भोजनाची व्यवस्था करून नंतर नानासाहेब स्वतः अन्नग्रहण करीत. अर्थात्, भोजन उरकेपर्यंत चांगले तीन प्रहर होत. त्यांच्या भोजनाला प्रायः रोज याप्रमाणें विलंब होत असे. कारण, अतिथिअभ्यागत येण्याचा समय टळल्याविना ते अन्नाला मुळींच स्पर्श करीत नसत.

भोजनोत्तर दोन घटका वामकुक्षी करून चारांच्या सुमाराला पुनः ते बाहेर ओटीवर येऊन श्रीमद्भागवताचें पठण करीत बसत. नानासाहेब बाहेर येण्यापूर्वींच बरीच श्रोतेमंडळी ओटीवर जमलेली असे. कारण, या वेळीं रोज पुराण चालत असे. प्रत्येक श्लोकाचा अर्थ अगदीं स्पष्ट करून ते तो सर्वांनां समजून सांगत. श्रोतेमंडळीच्या धारणशक्तीप्रमाणें श्लोकांच्या व्याख्याहि नानाप्रकारें होत. नानासाहेबांच्या त्या स्पष्टीकरणाची श्रोतृमंडळीच्या मनावर इतकी कांहीं छाप बसे, कीं, सर्व मंडळी अगदीं तल्लीन होऊन या मायामय क्षणभंगुर संसाराचा मोह विसरून जाई व सर्वांच्या चित्तवृत्ति परमेश्वराच्या ठिकाणीं लीन होत. श्रोते आणि वक्ते क्षणभर ब्रह्मानंदांत पोहूं लागत!

तदनंतर कोणी शास्त्री पंडित आला असल्यास त्याच्याशीं नानाशास्त्रांसंबंधीं चर्चा चाले. शास्त्रांचें रहस्य शेवटीं सर्व श्रोतेमंडळीला नीट समजाविण्यांत येई. कधींकधींतर नानासाहेब आपल्या खर्चानें दूरदूरच्या विद्वान् शास्त्री पंडितांनां योग्य बिदागी देऊन मुद्दाम बोलावून आणीत आणि त्यांच्यापासून शास्त्रांसंबंधीं प्रश्नांचा उलगडा करून घेत. आज असा शास्त्री पंडित कोणीहि आला

नसल्याकारणानें नानासाहेब स्वतांच श्रीमद्भागवत वाचीत बसले होते. इतकें होतांहोतां संध्याकाळ झाला.

पुनः हस्तपाद प्रक्षालन करून नानासाहेब देवघरांत गेले व सायंसंध्या, जप, अनुष्ठानादि कर्मांत निमग्न झाले. सर्व नित्यकर्म यथासांग करून नारायणाचा प्रसाद घेऊन ते अंतर्गृहांत गेले. तेथें वृद्ध अन्नपूर्णाबाई फलाहाराची सर्व सिद्धता करून पतीची मार्गप्रतीक्षा करीतच बसल्या होत्या. नानासाहेब आंत येऊन फलाहार करीत बसले. थोड्या वेळानें अन्नपूर्णाबाई ह्मणाल्या "ऐकलं का, जांवई ह्मणे सुशीलेला न्यायला आले आहेत."

"मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. चांगला मुहूर्त पाहून सर्व व्यवस्था करूं."

परंतु अन्नपूर्णाबाईचे डोळे पाण्यानें भरून आले. आंसवें पुसून त्या ह्मणाल्या "मुलगी सासरीं जाते, ही आनंदाची गोष्ट तर खरीच; परंतु जांवई पडले हे असे; संसाराची सारखी ओढाताण. अशा स्थितींत मुलीला तिकडे पाठवून मला कसं बरं चैन पडेल ?"

"मुलगी सासरीं गेल्यावर तुह्मांला चैन पडणार नाहीं, तर तुह्मीहि तिच्याबरोबर जांवयांच्या घरीं जा हव्यातर. तुह्मांला चैन पडणार नाहीं, ह्मणून पोरीच्या सुखांत व्यत्यय आणणें योग्य नाहीं. पतिसेवेविना स्त्रियांनां दुसरा धर्म कोणता आहे?"

बिचारी ह्मातारी नंतर कांहींएक बोलली नाहीं. ती आपली बराच वेळ डोळे पुशीत होती. परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. फलाहार आटोपतांच नानासाहेब हातांत पंचांग घेऊन मुलीची सासरीं पाठवणी करण्यास शुभ दिवस पहात बसले. अन्नपूर्णाबाईचा हुंदका आतां अगदींच अनावर होऊन त्या उच्चस्वरानें रुदन करूं लागल्या. पत्नीचें दोन समाधानाच्या शब्दांनीं सांत्वन करून नानासाहेब बाहेर आले. अन्नपूर्णाबाई विषण्ण वदनानें तेथेंच भूमीवर निजून राहिल्या.

बाहेर येतांच सुशीला आणि विधवा लक्ष्मीबाई नानासाहेबांच्या दृष्टीस पडल्या. तत्क्षणीं सुशीलेला उद्देशून ते ह्मणाले "बेटा ! तुला सासरीं नेण्यासाठीं जांवई स्वतः आले आहेत. येत्या बुधवारीं पहांटेस गर्गाचार्यांच्या शुभ मुहूर्तावर तुझी रवानगी करण्याचें मीं योजिलें आहे. त्या दिवशीं तुला घरीं गेलें पाहिजे. बाळे सुशीले ! तूं ही गोष्ट मनामध्यें पक्की वागीव, कीं, पति मूर्ख, कुरूप, दरिद्री, कसाहि का असेना, पतिसेवेशिवाय स्त्रियांनां दुसरी गति नाहीं ! पति स्त्रियांनां साक्षात् देवताच होय. बेटा ! माझें तुला अगदीं आग्रहपूर्वक सांगणें आहे, कीं, तेथें गेल्यावर तूं मनोभावानें पतीची आणि त्याचप्रमाणें इतर वाडवडिलांची सेवा

करून त्यांचे मंगल आशीर्वाद ग्रहण कर, म्हणजे त्यांतच तुझें कल्याण आहे. त्यापासूनच तुला अक्षय्य सुख आणि मुक्ति लाभणार आहे."

इतक्यांत त्या क्षीण दीपप्रकाशांत हतभागिनी लक्ष्मीबाईचें अश्रुपूर्ण मुखकमल अवचित दृष्टीस पडतांक्षणींच नानासाहेबांच्या अंतःकरणांत चर्र झालें. म्हातारा अगदीं व्यथित होऊन गेला, विधवेसमोर पतिसेवेचा महिमा गाइला, हें बरोबर झालें नाहीं, हें तत्क्षणीं नानासाहेबांच्या लक्ष्यांत येऊन चुकलें. वैधव्यपंकांत रुतलेल्या त्या दीन गाईला—लक्ष्मीबाईला—संबोधून नानानाहेब म्हणाले "बेटा, तुझें मुख असें खिन्न कां ? मुली ! तूं पहातच असशील, बागेमध्यें अनेक फुलें फुलत असतात; परंतु सगळ्यांच्याच दैवीं देवसेवा कोठें असते ? सुंदर, सुगंधित अशीं बहुतेक सर्व पुष्पें विलासीजनांच्या उपभोगाच्या वस्तु होऊन बसतात; परंतु ज्या फुलाचें अति सौभाग्य, सबळ पुण्याई, तेंच केवळ देवाच्या मस्तकावर जाऊन पडतें, बेटा, तूं कां बरें दुःखी होतेस ? तूंच खरोखर भाग्यवती आहेस. देवसेवा करून देहाचें सार्थक्य करण्यासाठींच देवानें तुला निर्माण केलें आहे. या यःकश्चित् क्षणिक सुखासाठीं तूं आपलें मन कां बरें चंचल होऊं देतेस ?"

सुशीला आणि लक्ष्मीबाई, दोघीहि अवनत मुखानें स्तब्ध उभ्या होत्या. नानासाहेब चट्दिशीं तेथून बाहेर जाऊन डोळे पुसूं लागले.

---

## प्रकरण विसावें.

### सुशीलेची सासरीं पाठवणी.

आज मंगळवार. उदईक उषःकालीं सुशीलेची सासरीं पाठवणी करण्याचें निश्चित झाल्यामुळें नानासाहेब देशमुखांच्या घरीं आज फारच गडबड उडून राहिली होती. तांदूळ, डाळ, तेल, तूप, हळद, मीठमसाला, इत्यादि इत्यादि संसारोपयोगी हरएक जिन्नसा, त्याचप्रमाणें चिरगूटपांघरूण, कपडेलत्ते व इतर नानाविध वस्तु खरेदी करून घरीं आणून ठेवण्यांत सर्व मंडळी अगदीं मग्न झाली होती. तांब्यापितळेचीं संसारोपयोगी लहानमोठीं भांडीं काल्च आणून ठेविलीं होतीं. जांवईबुवांच्या घरची स्थिति समाधानकारक नसल्याकारणानें मुलीला सासरीं पाठवितांना नानासाहेबांनीं बराच खर्च केला. सरासरी सहा महिनेपर्यंत कोणतीहि जिन्नस विकत घेण्याची आवश्यकताच पडूं नये, अशा अजमासानें प्रत्येक जिन्नस खरेदी केली होती. शेजारीपाजारीतर या वस्तु

पाहून अगदीं थक्कच होऊन गेले. मुलीला सासरीं पाठवितांना तिच्याबरोबर कांहीं पाठविण्याची चाल आहे खरी; परंतु सगळयांनीं अगदीं मोकळ्या मनानें कबूल केलें, कीं, मुलीला पाठवितांना आजपर्यंत कोणींहि इतका अतोनात खर्च केलेला आपल्या पाहण्यांत नाहीं. बिचाऱ्या अन्नपूर्णाबाई एकसारख्या रडून रडून दिवस काढीत होत्या: परंतु त्यांनांसुद्धां मुलीबरोबर देण्याकरितां तयार केलेले हे जिन्नस पाहून किंचित् समाधान वाटलें.

गांवांतील स्त्रिया आज सुशीलेला भेटण्याकरितां एकीमागून एक येऊं लागल्या. वडिलांनीं दिलेल्या जिनसा सुशीला मोठ्या प्रेमानें आणि आदरपूर्वक सर्वांनां दाखवूं लागली. त्या वस्तु पाहून सर्व स्त्रिया बिचाऱ्या चकितच होऊन गेल्या. गांवांतील लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांची सुशीला अत्यंत आवडती असल्यामुळें तिचा आज वियोग होणार, ही गोष्ट ज्याच्यात्याच्या अंतःकरणास अगदीं लागून राहिली, सर्वांची मुखश्री म्लान होऊन गेली. "लोभ ठेवा बरं! अगदींच विसरून जाऊं नका," इत्यादि गोड शब्दांनीं सुशीला सर्व मंडळीचा निरोप घेऊं लागली. सुशीलेच्या हृदयांत आज हर्ष आणि विषाद यांचा एकसमयावच्छेदेंकरून उदय झाला होता. पतीबरोबर पतिसेवेसाठीं जात आहे, यापेक्षां सुशीलेला आणखी आनंदाचा दिवस तो कोणता! परंतु पिता, माता, आत्मीय, स्वजन, शेजारीपाजारी, इष्टमैत्रिणी या सर्वांचीं अंतःकरणें आज सुशीलेला पतिगृहीं जाण्यास्तव निरोप देतेवेळीं अत्यंत व्यथित झालीं होतीं; मग या सगळ्यांसाठीं सुशीलेचें कोमल अंतःकरण विरहदुःखानें व्यथित झाल्याविना कसें बरें राहील?

आज आमच्या धाकट्या सूनबाईंची धांदल काय विचारावी! सगळ्या सामानसुमानाची यादी त्या करीत होत्या. कोणती वस्तु कशा रीतीनें नेली असतां चांगली सुरक्षित जाईल, याचा विचार करून गडीमाणसांकरवीं त्या सगळ्या जिनसा एका जागीं नीट रचून बंदोबस्तानें त्या स्वतः ठेववीत होत्या. आमच्या बाळकृष्णाच्या महदानंदाला तर पारावारच राहिला नाहीं! साऱ्या जन्मांत अशा नानाप्रकारच्या वस्तु एका जागीं त्या बिचाऱ्याच्या कधींहि दृष्टीस पडल्या नव्हत्या. विशेषतः खाण्यापिण्याचे पदार्थ रगड पाहूनतर विनोबां-बरोबरच त्यांच्या घरीं जाण्याची त्यानें आपलीहि सर्व तयारी केली. संध्याकाळीं बैलांच्या चार गाड्या आणवून त्यांत तें सर्व सामान भरण्याची सुरुवात झाली. सर्व सामान गाडींत नीट काळजीपूर्वक भरण्याच्या कामीं बाळकृष्ण मारे एकसारखी गडबड करूं लागला. जणूं हें सर्व सामान त्याच्या स्वतांच्याच घरीं

जावयाचें होतें! प्रहर रात्रीच्या सुमारास सामानाच्या गाड्या पुढें रवाना झाल्या. त्या खटाऱ्यांबरोबरच जाण्याची बाळकृष्णपंतांची तयारी होती; परंतु नानासाहेबांनीं गाड्यांबरोबर आपल्या एका विश्वासू गड्यास पाठविल्यामुळें बाळकृष्णाला जाण्याचें कांहींएक प्रयोजन राहिलें नाहीं. त्या रात्रीं बाळकृष्णाचा डोळ्याशीं डोळा म्हणून कसा तो लागला नाहीं. कधीं एकदां पहांट होते व कधीं आपण निघतों असें त्याला होऊन तो बिछान्यावर एकसारखा तळमळ करीत होता. मोठ्या पहांटेस एक घोड्याची गाडी पुढल्या दरवाजाशीं येऊन उभी राहिली. गाडीच्या चाकांचा खडखडाट कानीं पडतांच तत्क्षणीं बिछान्यांतून उडी मारून बाळकृष्णाची स्वारी बाहेर आली.

अन्नपूर्णाबाईनीं स्फुंदतस्फुंदत, नानासाहेबांनीं नानाप्रकारें हितोपदेश करीत करीत व इतर आत्मीयजनांनीं निश्वास टाकीतटाकीत जामात आणि कन्या सुशीला यांनां गाडींत बसविलें. सुशीलेनें सजल नयनांनीं पिता, माता व इतर वडील माणसांच्या पायांवर मस्तक ठेवून सर्वांचा निरोप आणि आशीर्वाद घेतला. आमचे विनोबासुद्धां या मंडळीला नमस्कार करण्यास विसरले नाहींत. परंतु आनंदाच्या भरांत बाळकृष्ण मात्र तें साफ विसरला! त्याला गाडीच्या बाहेरील भागीं बसण्यास सांगण्याच्या पूर्वींच टुणूदिशीं उडी मारून स्वारी यथास्थानीं—गाडीवानाच्या शेजारीं—विराजमान होऊन राहिली होती, आणि मोठ्या आल्हादानें डाव्या हातांत अश्वरज्जु ग्रहण करून उजव्या हातांत ऐटीनें चाबुक धारण केला होता व स्वतांच गाडीवान बनण्याविषयीं मारे एकसारखी धांदल करीत होता. इतक्यांत गाडीवान स्वस्थानीं येऊन त्यानें बाळकृष्णाच्या हातांतून अश्वरज्जु काढून घेऊन घोड्यावर चाबुक ओढिला. तत्क्षणीं गाडी चालू झाली. गाडी दृष्टीआड होईपर्यंत नानासाहेब आणि सुशीलेला निरोप देण्यासाठीं जमलेली सर्व मंडळी गाडीकडे सारखी दृष्टी लावून विषण्णवदनानें त्याच जागीं उभी होती.

---

## प्रकरण एकविसावें.

### सून नव्हे—साक्षात् लक्ष्मीच!

रस्त्यामध्यें सांगण्यासारखें विशेष कांहीं घडलें नाहीं. आपल्याला गाडी हांकावयाला मिळावी यासाठीं बाळकृष्ण मात्र सारा रस्ता उमेदवारी करीत होता. शेवटीं गाडी जेव्हां विनोबांच्या गांवासमीप आली, तेव्हां गाडीवानानें बाळ-

कृष्णाच्या विनंतीला कबूल होऊन अश्वरज्जु त्याच्या हातीं दिले. महोल्हासपूर्वक रज्जु हातांत घेऊन मोठ्या ऐटीनें चाबूक फडकावीत बाळकृष्ण गाडी हांकूं लागला. मघांपासून तो गाडी चालविण्याचें कौशल्य लक्ष्यपूर्वक अवलोकीतच होता; तेव्हां त्याला हें काम कांहीं फारसें अवघड गेलें नाहीं. गाडीवानापक्षांहि तो अधिक द्रुतगतीनें अश्व चालवूं लागला.

हांहां ह्मणतां गाडी हमरस्ता सोडून विनोबांच्या गांवांत जाणाऱ्या रस्त्याला लागली. या अरुंद रस्त्यामधून नवशिक्या बाळकृष्णाला गाडी हांकूं देणें उचित नव्हतें, ह्मणून गाडीवानानें घोड्यांच्या दोऱ्या आपल्या हातीं घेतल्या. तरीहि चाबुक बाळकृष्णाच्याच हातीं राहिला. मधूनमधून सकारण अकारण, चाबूक फडकावीत बाळकृष्णाची स्वारी घोड्यांवर आपलें प्रभुत्व गाजवीत गाजवीत चालली होती. याच ठिकाणीं त्यांनां ते बैलांचे चार खटारे भेटले. सर्वांच्या पुढें ही घोड्याची गाडी आणि मागून ते बैलांचे चाऱ्ही खटारे आस्तेआस्ते विनोबांच्या गांवांत शिरले. गांवांतील लहानलहान मुलें आपला खेळ सोडून त्या गाड्यांच्याच मागें जाऊं लागलीं. केवळ मुलांचीच गोष्ट कशाला? एक घोड्याची गाडी आणि तिच्यामागून चार बैलगाड्या, असें हें लटांबरच्यालटांबर त्या लहानशा गांवांत शिरतांच गांवांतील साऱ्या लोकांमध्यें मोठी गडबड उडून गेली. हांहां ह्मणतां बातमी फुटली, कीं, विनोबांची स्वारी कुटुंबाला माहेराहून घेऊन येत आहे. घोड्यांची गाडी गांवांत येण्याचें कारण तेव्हां लोकांच्या लक्ष्यांत आलें. तरीदेखील प्रत्येकजण मोठ्या विस्मयांत पडला, कीं, घोड्याच्या गाडीमागून हे सामानाचे चार खटारे काय ह्मणून बरें चालले आहेत!

या प्रश्नाची भवतिनभवति त्या वेळीं कांहीं फारशी झाली नाहीं. ज्यांच्या ज्यांच्या ह्मणून दृष्टीस या पांच गाड्या पडल्या, ते ते विस्मितनेत्रानें एकमेकांकडे पहातपहात त्या गाड्यांच्या मागून विनोबांच्या घराजवळ आले. विनोबांच्या आईच्या आनंदालातर आज पारावारच राहिला नाहीं! वेड्यासारखी म्हातारी धावतधावतच बाहेर आली आणि सुनेला गाडींतून उतरून घेऊन मोठ्या आदरानें आणि प्रेमानें तिला घरांत घेऊन गेली. समोरच ते सामानाचे चार खटारे येऊन उभे राहिले होते, तिकडे म्हातारीची ह्या वेळपर्यंत नजरसुद्धां गेली नाहीं. राधाबाईच्या पाठोपाठच बाहेर जमलेला शेजारीपाजारी स्त्रियांचा घोळकाच्या घोळका आंत शिरला. विनोबादेखील श्वशुरानें नजर केलेल्या वस्त्रालंकारांची पेटी सासरहून बरोबर आलेल्या गड्याच्या डोकीवर देऊन घरांत

शिरले. सगळी मंडळी आंत जातांच खटाऱ्यांतील सामान हलकेच लवकर लवकर काढून नीट रचून ठेवण्याकरितां बाळकृष्णपंतांची स्वारी गाडीवाल्यांवर एकसारखी गर्जना करूं लागली. चार गाड्यांमधील हें एवढें सामान पाहून मघांपासून जी मंडळी मोठ्या बुचकळ्यांत पडून एकसारखी मुकाट्यानें तिकडेच पहात राहिली होती, त्यांनीं या वेळीं बाळकृष्णाला एकटाच पाहून उत्सुकतेनें त्याच्याशीं विचारपूस चालविली. बाळकृष्ण गंभीरपणानें ह्मणाला " कां बरें, हें सगळें आमचेंच ! "

बाळकृष्णाचें हें विचित्र उत्तर ऐकतांच तेथें उभा असलेला एक गृहस्थ ह्मणाला "तुझें, आणि मग तें इथें कां रे ? तूं आपल्या घरीं कां नाहीं घेऊन जात ? "

" अहो, पण हेंच आमचें घर नव्हे का ? "

" काय ! हें तुमचें घर ? तें रे बुवा कसें ? "

" अहो, कसें ह्मणून काय विचारतां ? मी आतां दादांकडे चाकरीला राहिलों आहें; मग हें घर आमचें नाहीं का झालें ?"

" इथें कांहीं दुकानबिकान घालायचा विचार आहे वाटतें ? "

बाळकृष्णाला बराच घुस्सा आला. तो रागारागानेंच ह्मणाला " फिरून मी दुकानावर चाकरी करीन वाटतें ? काय तुमची पण अक्कल हो ! वाः वाः ! अहो हें सगळें सामान आमच्या दादांच्या सासऱ्यांनीं आमच्या वहिनींच्या-बरोबर दिलें आहे ! आतांतरी समजलें कीं नाहीं ? "

" आं ? ! ! "

प्रश्न करणारा गृहस्थ बिचारा नुसतें "आं ? " करूनच चूप बसला. दुसरा शब्द ह्मणून कांहीं त्याच्या मुखांतून निघाला नाहीं ! तोंडांत बोट घालून तो टकमक पहातच राहिला. तेथें जमलेल्या इतर मंडळीचीहि तीच अवस्था झाली. बाळकृष्ण त्या चाऱ्ही गाडीवानांकरवीं गाडींतील सामान आंत नेऊन ठेवूं लागला आणि कोणी कांहीं वस्तु वगैरे चोरूनबिरून नेईल ह्मणून आपण स्वतः बाहेर पहारा करीत उभा राहिला. आस्तेआस्ते सर्व सामान घरांत जाऊन पडतांच बाळकृष्णहि घरांत शिरला. राधाबाईदेखील तें एकंदर सामान पाहून चकित झाल्या. सुनेच्या बरोबर सामानाच्या या राशींच्या राशी येऊन पडलेल्या पहातांच ह्मातारीचा आनंद गगनांत मावेनासा होऊन तिच्या दोन्ही डोळ्यांनां आनंदाश्रूंचें भरतें आलें. जमलेल्या सर्व स्त्रियांकडे पुढा करून त्या उच्चस्वरानें ह्मणाल्या "बायांनों ! आज ही माझी धाकटी सून नाहीं आली—आज साक्षात् लक्ष्मीच माझ्या घरीं धावून आली आहे बरं ! "

आंतल्या दोन्ही तिन्ही खोल्या सामानानेंच गच्च भरून गेल्या. आगंतुक मंडळीला उभें रहावयाला देखील जागा उरली नाहीं. बाळकृष्णांनें येऊन पाहिलें, बरेंच सामान ओटाणांत अस्ताव्यस्त पडून खराब होत आहे. त्याच्यानें कांहीं तें पहावेना. तें उचलून तो नीटनेटकें रचून ठेवूं लागला. सुनेनें आणलेली भेट-मेवामिठाई शेजाऱ्यापाजाऱ्यांनां वांटण्याकरितां म्हातारी अगदीं उतावीळ होऊन गेली व आपण स्वतांच तें काम करूं लागली. बाळकृष्णालाहि तिनें आपल्या मदतीला बोलाविलें. परंतु ती सुमिष्ट मेवामिठाई आपल्याच हातांनीं सगळ्यांनां वांटून देण्यास त्याचा लोभी जीव कसा बरें कबूल व्हावा? तो मुळींच कबूल होईना. परंतु राधाबाईनां आज मनुष्यांची उणीव का होती? मान वर करण्याचाच अवकाश, किती तरी बाया त्यांनां या कामीं साह्य करूं लागल्या!

हां हां म्हणतां आगंतुक स्त्रीपुरुषमंडळानें दीक्षितांचें घर अगदीं फुलून गेलें. एका घटकेच्या आंतच जे विलक्षण स्थित्यंतर झालें, तें सांगतां पुरवत नाहीं. गेल्या तीन वर्षांमध्यें ब्राह्मण, भिक्षुक किंवा इतर मंडळी जी या घराकडे कधीं ढुंकूनहि पहात नव्हती, तीच मंडळी आज 'राधाकाकू' 'राधाकाकू' करीत, कांहीं लाभ साधला तर पहावा या आशेनें विनोबांच्या घराशीं लाळ घोटूं लागली. क्षणार्धांत त्या खेडेगांवामध्यें मोठी गडबड उडून राहिली. तरुण, वृद्ध, बायकामुलें यांच्या गोंगाटानें विनोबांचें घर अगदीं गजबजून गेलें. आमच्या धाकट्या सूनबाईची आणि त्यांच्या आईबापांची जो तो प्रशंसा गाऊं लागला. कोणाच्याहि तोंडून दुसरी गोष्ट म्हणून ऐकूं येईना! परंतु आमची पक्की खात्री आहे, शेजारीपाजारी आपल्याला जितका आल्हाद झाल्याचें बाहेरून दाखवीत होते तितका-नव्हे त्याच्या शतांशहि त्यांनां अंतर्यामीं खचीतखचीत झालेला नव्हता. आंतून बहुतेकांचें हृदय ईर्ष्यानलानें पोळत होतें. आम्ही खात्रीनें सांगतों-न्नांन्याची आई, कलहशास्त्रविशारदा म्हाळसाबाई, सखू गोलकरीण वगैरे अनेक मंडळीच्या अंगाचा त्या रात्रीं दाह होत होता. बिचाऱ्यांनां झोंपसुद्धां लागली नाहीं!

---

## प्रकरण बाविसावें.

### धाकट्या सूनबाई स्वगृहीं.

त्या रात्रीं अनेकांनां ज्याप्रमाणें ईर्षानलानें अंगाची काहिली होऊन झोंप आली नाहीं, त्याचप्रमाणें आनंदातिशयामुळें सदूभाऊंच्या आईचाहि डोळ्याशीं डोळा कसा तो मुळींच लागला नाहीं! सारी रात्र बिछान्यावर या कुशीवरून त्या कुशीवर

ती एकसारखी तळमळ करीत होती. पहांटेपहांटे किंचित् गुंगी आली खरी, तथापि तीहि सुखस्वप्नपूर्ण. मोठ्या पहांटेस उठून राधाबाईनीं गृहकृत्यास आरंभ केला. परंतु म्हातारी सडासंमार्जन करते न करते तोंच धाकट्या सूनबाई (आतां आम्ही सुशीला म्हणणार नाहीं–धाकट्या सूनबाईच म्हणूं,) उठून आल्या आणि म्हातारीच्या हातांतून सड्याचें भांडें काढून घेऊं लागल्या. म्हातारी म्हणाली "छे ग बाई! मी तुला मुळींच कामकाज करूं देणार नाहीं!"

"मग मला कशाला बरं इकडे आणली?"

"माझ्या संसाराचं कामकाज करायला नाहीं बरं मीं माझ्या बाईला आणली! अग, मुळीं तूं माझ्या घरची लक्ष्मी आणि म्हणूनच तुला आणली बरं. मला एकटीलाच इथलं काम पुरत नाहीं—"

"असं काय बरं बोलायचं हें! मीतर आपली सेवाशुश्रूषा करायला मिळेल म्हणून मोठ्या आशेनं आल्यें. मी बसून राहूं आणि आपण घरांतलं सगळं कामकाज करायचं!"

अजूनहि म्हातारीची खोड गेली नव्हती. सुनेच्या या भाषणानेंहि राधाबाईचे डोळे भरून आले. परंतु हें रुदन दुःखाचें नसून सुखाचेंच होतें. डोळ्यांतील आंसवें पुसून राधाबाई म्हणाल्या "असे कळवळ्याचे दोन शब्द मला कुणी बोलेल तर एकच काय, पण असल्या दहा संसारांचा रगाडा मी एकटी उठवीन! अग, मी कामाला का भित्यें आहें? बायकांच्या जल्माला येऊन कामाचा कंटाळा केल्यास कसं बरं चालेल?"

"पण मी इथं असून आपणच हीं सगळीं कामं करावीं हें चांगलं का दिसतं? आपण किंनई बसूनबसून कायकाय करायचं तें मला सांगावं. काम करायची आपली हौस नाहींका अजून फिटली?"

आमच्या धाकट्या सूनबाईनीं आपली पराकाष्ठा केली, सासूच्या हातूंन केरसुणी, भांडीं वगैरे हिसकावून घेण्याचाहि दोनचारदां प्रयत्न केला, पण छे! म्हातारी कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं नाइलाजास्तव त्या सासूबाईनां मदत करूं लागल्या. रोजचें आवश्यक कामकाज आटोपल्यावर लक्ष्मीबाईनीं नवीन कामाला हात घातला. हें काम दुसरेंतिसरें कांहींएक नसून घरांत जिकडेतिकडे चक्क करणें हेंच होय. बाळकृष्ण आणि माहेरचा बरोबर आणलेला गडी यांनां मदतीला घेऊन आमच्या धाकट्या सूनबाईनीं सगळ्या घरांतील केरकचरा काढून झाडलोट करून आणि जमिनी वगैरे सारवून जिकडेतिकडे स्वच्छ करण्यास

झपाट्यानें सुरुवात केली. मग काय विचारतां, हांहां ह्मणतां पुष्कळ दिवसांचें वाढलेलें रान, जंगल, गवत, पार लख्ख झालें. हें इतकें उरकेपर्यंत चांगला दोन प्रहर दिवस लोटला, सुनेला हे अनुचित श्रम करतांना पाहून ह्मातारीचें कोवळें अंतःकरण एकसारखें वरखालीं होऊं लागलें; परंतु एवढ्या अल्पावकाशांत घरामध्यें जिकडेतिकडे झालेलें हें विलक्षण स्थित्यंतर पाहूनतर तिच्या आनंदाला पारावारच राहिला नाहीं. घरांत लग्नमुंजीचा किंवा दुसरा कसलातरी तशाच प्रकारचा मोठा समारंभ असला ह्मणजे खेड्यांतील गृहस्थ लोक जसें घरदार झाडूनसारवून चक्क करितात, तसेंच किंबहुना त्याहूनहि किंचित् जास्त, दीक्षितांचें घर आणि अंगण आज अगदीं लख्खचक्क दिसूं लागलें.

भोजनोत्तरहि धाकट्या सूनबाईनीं क्षणभरसुद्धां विश्रांति घेतली नाहीं. शयनगृह सुसज्ज करण्यास सुरुवात केली. जी वस्तु ज्या स्थळीं ठेविली असतां विशेष शोभा येईल, ती वस्तु त्या त्या योग्य स्थानीं ठेवून दिली. बिछाने अगदीं नव्यानें घातले. याप्रमाणें एकामागून एक अशा तीन निजावयाच्या खोल्या साफसूफ करून त्यांतील सामानसुमान जेथल्यातेथें नीट व्यवस्थित रीतीनें लावून टाकिलें. आह्मीं पूर्वींच सांगितलें आहे, कीं, दीक्षितांच्या घराची स्थिति अत्यंत शोचनीय झाली होती. आमच्या धाकट्या सूनबाईनीं त्याच दिवशीं एकंदर घराची दुरुस्ती करण्याचा बंदोबस्त केला. बापानें दिलेले कांहीं पैसे होते, अर्थात् त्याच पैशांतून ही सगळी व्यवस्था झाली. लवकरच पुढचा दिवाणखाना, मंडळीला बसण्याउठण्याच्या उपयोगीं पडण्याजोग्या स्वरूपांत आला, त्याच गांवांत रहाणाऱ्या एका गृहस्थाच्या तोंडून आह्मीं ऐकिलें आहे, कीं, धाकट्या सूनबाई आल्यानंतर एकाच आठवड्यानें तो दीक्षितांच्या घरीं एक दिवस गेला असतां त्या घराच्या अंतर्बाह्य स्वरूपावरून हें घर कोणाचें, हें कांहीं त्याला झटदिशीं ओळखतां आलें नाहीं!

इकडे विनोबांनीं पाहिलें; पत्नी आल्यापासून घरदार सगळें चक्क झालें आहे. जेवणाखाणाचीहि कसलीच विवंचना राहिली नाहीं. जरूर लागल्यास आठचार आण्यांचे पैसेहि पत्नीकडून तावडतोब मिळतात. बरें, इतकेंहि असून एखाद्या दासीसारखी मनोभावानें चाकरी करण्यास ती सदैव तत्पर आहेच! तेव्हां अर्थात्च पूर्वीपूर्वीं पत्नीजवळ असतांना स्वारीला एकप्रकारची जी भीती वाटत असे ती त्यांची भीति आतां क्रमाक्रमानें नष्ट होत चालली. इतकेंच नव्हे, तर हळुहळु पत्नीला कोणतीहि गोष्ट विचारून तिची सल्ला घेण्याच्या कामीं विनोबा संकोच

बाळगीतनासे झाले. याप्रमाणें विनोबांच्या अंतकरणांतून पत्नीसंबंधींची भीति जसजशी असंगत होऊं लागली, तसतसा प्रीति, प्रणय यांचा तेथें उदय होऊं लागला. यत्न केला, मनःपूर्वक प्रेम केलें, तर वश होणार नाहीं असा प्राणी या पृथ्वींत सांपडणें नाहीं. विनोबा जडमूढ होते, तरीहि त्यांच्या अंतःकरणांत परोपकारप्रभृति कित्येक सद्गुण स्वाभाविकच वास करीत होते. मग अशा मनुष्याचें हृदय सतत यत्न आणि निष्कपट, मनःपूर्वक प्रेम यांनीं वश होणार नाहीं अशी गोष्टतरी कधीं संभवेल काय ? आमचातर दृढ विश्वास आहे, कीं, या जगतांतील प्रधान प्राणी जो मनुष्य त्याचें हृदय कितीहि कठीण असो—अगदीं पाषाणासारखेंहि का असेना—हळुहळू आघात करीत राहिलें तर निश्चयपूर्वक त्यापासून प्रत्याघात होईलच होईल !

विनोबा आपले दोन वेळ यथेच्छ जेवून चिलमी फुंकीत सगळ्या गांवभर रिकामटेंकडे हिंडत असत. संसारसंबंधीं यत्किंचित्देखील कामकाज करीत नसत. परंतु पतिव्रता लक्ष्मीबाईनीं एक दिवससुद्धां कधीं पतीचा तिरस्कार किंवा सौम्य भर्त्सनाहि केली नाहीं. उलट पतीला श्रम पडूं नयेत ह्मणून त्यांनां लागणाऱ्या वस्तूंची त्या आपल्या हातानें तरतूद करून ठेवीत असत. लक्ष्मीबाई प्राणांपलीकडेहि पतीविषयीं कळकळ बाळगून मनःपूर्वक त्यांची सेवाशुश्रूषा करीत. आणि याचमुळें विनोबांचें पत्नीविषयींचें भय अंतर्धान पावलें होतें. आस्तेआस्ते विनोबांनां पत्नीचा ओढा लागूं लागला. पत्नीविषयीं त्यांच्या मनांत पूर्ण प्रेमाबरोबरच पूर्ण आदराचाहि उगम झाला. हळुहळू संसारकृत्यांकडेहि त्यांचें लक्ष्य आकर्षूं लागलें. पूर्वीप्रमाणें सगळ्या गांवभर उगीच भटक्या मारीत फिरण्याचें विनोबांनीं आतां आस्तेआस्ते सोडून दिलें. आमच्या परम दक्ष सुगृहिणी लक्ष्मीबाई क्रमाक्रमानें एकएक संसारकृत्यांचा भार पतीवर टाकूं लागल्या. विनोबाहि आस्तेआस्ते कामकाज करण्यास शिकूं लागले. पूर्वी विनोबा ह्मटले ह्मणजे कृशदेही, मलिनवस्त्रें परिधान केलेले असावयाचे; परंतु पत्नीच्या योग्य जोपासनेनें त्यांच्या शरीरस्वास्थ्याची जसजशी उन्नति होत गेली, त्याबरोबरच त्यांचा तो मलिनवेषहि अंतर्धान पावला. विनोबा आतां पुष्टदेही होऊन स्वच्छ वस्त्रप्रावरणें परिधान करून संसारकार्यांत गढून गेलेले दिसत. मुलाचें याप्रमाणें स्थित्यंतर झालेलें पाहून राधाबाईच्या आनंदाला सीमाच राहिली नाहीं. ज्याच्यात्याच्या तोंडावर ह्मातारी बोलत सुटे "माझी लक्ष्मी खरोखर परीसच आहे ! माझी बाई ज्याला ह्मणून हात लावील त्याला सोनेंच करून टाकील !"

गांवांतील आबालवृद्ध स्त्रिया दीक्षितांच्या कुटुंबांत हें जें आकस्मिक स्थित्यंतर झालें, त्याचें सर्व श्रेय आमच्या धाकट्या सूनबाईनांच देऊन एकमतानें त्यांची प्रशंसा करूं लागल्या. गांवांतील तीनचार मंडळी एकत्र जमली पुरे, दीक्षितांच्या धाकट्या सूनबाईची गोष्ट निघाली नाहीं, असें कधीं घडलेंच नाहीं !

याप्रमाणें आमच्या लक्ष्मीबाईनीं तीनचार महिने संसारशकट सुयंत्रित चालविला. आपली वडील जाऊ आणि तिचीं मुलें यांनां आणण्याविषयीं त्यांनीं अनेक वेळां सासूची विनवणी केली; परंतु राधाबाई कांहीं केल्या त्या गोष्टीला कबूल होईनात. नाइलाजास्तव पुढें त्यांनां हा नाद सोडून द्यावा लागला. तरीदेखील मधूनमधून गडी मनुष्य पाठवून मुलांचा समाचार घेण्यास लक्ष्मीबाई विसरल्या नाहींत. इकडे आमचे सद्भाऊ माधवरावांबरोबर कंत्राटाचें काम करण्यांत गढून गेले होते; परंतु घरीं खर्चाकरितां आजपर्यंत एक कपर्दिकाहि पाठविण्याची बिचाऱ्यांनां कधींच आठवण झाली नाहीं !

---

## प्रकरण तेविसावें.

### धाकट्या सूनबाईची संसारदक्षता.

आमच्या धाकट्या सूनबाईनीं आपल्या अंगावर संपूर्ण भार घेऊन तो मोडकळीस आलेला संसाराचा गाडा आज जवळजवळ चार महिने सुयंत्रित चालविला. बापानें सामानसुमान यथास्थित दिलें होतें, यामुळें आतांपर्यंत किरकोळ खर्चच कायतो पहावा लागत असे. परंतु त्या कांहीं कल्पतरु नव्हत्या ! बाराहि महिने कसें चालावें ? आजवर सद्भाऊंकडून कांहींतरी खर्चास येईल म्हणून आशा होती; परंतु चारपांच महिने झाले तरी एक छदामसुद्धां आला नाहीं, तेव्हां तीहि आशा मुळींच राहिली नाहीं. शेवटीं पुष्कळ विचार करून अन्य मार्ग जेव्हां कांहींच दिसेना, तेव्हां त्यांनीं बापानें दिलेले आपले सर्व दागिने विकून टाकण्याचा कृतसंकल्प केला व सासूबाईनांहि ही गोष्ट कळविली. परंतु राधाबाई हें ऐकून विस्मितच झाल्या. त्या म्हणाल्या "तें काय म्हणून बाई ? माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंततरी तुला मी दागिने विकूं देणार नाहीं."

सासूची नानाप्रकारें समजूत घालून लक्ष्मीबाई म्हणाल्या "ऐकिलं किंनई, आपण असा हट्ट धरून बसूं नये. मजजवळ जें कांहीं थोडंबहुत आतां राहिलं आहे, त्यांत मोठ्या शिकस्तीनें फारफार तर आणखी दोनतीन महिने आपलं कसंबसं चालेल. परंतु मग पुढं कसं होईल ?"

## धाकट्या सूनबाईची संसारदक्षता.

म्हातारीचा गळा दाटून आला. ती सजल नयनांनीं म्हणाली "बाई ग, चालेल तितके दिवस तर चालूं दे. पुढचं पुढं पाहतां येईल. मग एकादा दागिना गहाण ठेवूं, म्हणजे आणखी कांहीं दिवस चालेल."

"छे, छे ! गहाणाबिहाणाचं नांव काढूं नका. गहाण ठेवल्यानं इतकं मात्र होईल, कीं, माझे सगळे दागिने फुकट जातील. संसार चालविण्यास त्यापासून काडीचाहि उपयोग होणार नाहीं. त्यापेक्षां आतांच हे सगळे दागिने एकदम विकून टाकले असतां हजारएक रुपये सहज येतील. हल्लीं धान्याचा भाव अगदीं स्वस्त आहे, तेव्हां मी म्हणत्यें, आपण या पैशाचं धान्य खरीद करून ठेवावं; पुढं जेव्हां धान्याला चांगला दर येईल, तेव्हां कसोशीनं विकून टाकलं तर फायदा होईल आणि त्यावर आपला हा संसार चालूं शकेल. धान्य घेऊन आतां आपल्या घरींच सांठवून ठेवूं. दागिने घरांत ठेवण्यापेक्षां धान्य घेऊन ठेवलेलं बरं नाहीं का आपल्याला वाटत ?"

सुनेच्या या दूरदर्शीपणाच्या भाषणानें म्हातारी अगदीं चकितच झाली. ती शांत स्वरानें म्हणाली "बाई ग ! तूं म्हणत्येस तें सर्व खरं आहे. परंतु आपण पडलों बायकामाणसं. विनू नुकतासा कुठं संसाराकडे पाहूं लागला आहे. त्याच्यानं का हा व्यवसाय होणार आहे ? कुणीतरी सहज ठकवून जाईल झालं. बरं धान्य आतां खरीद कुणीं करावं ? दरदाम ठरवावा कुणीं ? गिऱ्हाइका-बरोबर घासाघिस करावी कुणीं ? ही इतकी घालमेल करायला चांगलाच मनुष्य पाहिजे, नाहींतर उगीच नुकसान मात्र व्हायचं."

"कां नुकसान होईल बरं ? आम्ही बायकामाणसं असलों म्हणून काय आम्हांला एवढादिखील व्यवसाय करितां यायचा नाहीं ? आणि आपला हा बाळकृष्ण असा कांहीं चलाख आणि धूर्त आहे, कीं, माझीतर पक्की खात्री आहे, तो दरदाम ठरवून देवघेवीचं काम अगदीं कसोशीनं करील."

इतक्यांत "कां हो वहिनी, कसली खरेदी ?" असें ओरडतओरडत स्वतः बाळकृष्णाची स्वारीच तेथें येऊन उपस्थित झाली. बाळकृष्णानें आतां राधाबाईला 'आई', विनोबांनां 'दादा' आणि लक्ष्मीबाईनां 'वहिनी' म्हणण्याचा परिपाठ घातला होता. लक्ष्मीबाई हंसतहंसत म्हणाल्या "काय रे बाळकृष्ण ! आपण जर आतां धान्याचा व्यापार करण्याचं मनांत आणलं, तर तुला त्याची व्यवस्था पहातां येईल कीं नाहीं ?"

बाळकृष्णहि हंसतहंसतच ह्मणाला "हें काय विचारायला हवं वहिनी? अहो, माझा जन्मच शेतकीच्या कामांत गेलेला आणि धान्याचा व्यवसाय मला करतां येणार नाहीं मग तो येईलतरी कुणाला?" आपल्या कर्तबगारीबद्दल संशय घेतलेला खारीला खपला नाहीं.

यावर लक्ष्मीबाई चकित होऊन ह्मणाल्या "काय ह्मणतोस! तुला शेतकीचीं कामं येतात?"

बाळकृष्णाचें वय अवघें अकरा वर्षांचें! परंतु तो जरा चिडल्यासारखा दिसला. उत्साहपूर्ण स्वरानें तो ह्मणाला "शेतकी करणाऱ्या घराण्यांत जन्म घेऊन शेतकीचीं कामें येत नाहींत ह्मणणें, ह्मणजे आईबापांच्या नांवाला काळिमा आणण्यासारखें आहे!"

आतां लक्ष्मीबाई सासूकडे वळून ह्मणाल्या "ऐकलं का, बाळकृष्ण काय ह्मणतो आहे तें? मीं या बाळकृष्णालाच हाताशीं घेऊन शेतकी आणि धान्याचा व्यापार करण्याचं योजिलं आहे. फक्त दागिने विकण्याला आपली तेवढी परवानगी मिळाली पाहिजे आहे."

नाइलाजास्तव शेवटीं राधाबाई कबूल होऊन ह्मणाल्या "तुझ्यासारख्या सुबुद्धिसंपन्न मुलीला काय बाई करतां येणार नाहीं! परंतु मुली, तुझे हे दागिने पुनः नाहींसे करतांना माझा जीव तिळतिळ तुटत आहे. तुझ्या अंगावर कांहीं घालण्याला आमच्या जळल्या त्या हातांला शक्ति नाहीं. परंतु आहे तें काढून घ्यायला मात्र—काय बाई करावं दैव आमचं! जा बाई, तुला वाटेल तें तूं खुशाल कर." ह्मातारीचा कंठ दाटून आला. डोळ्यांतून टपटप अश्रू गळूं लागले. तिनें मोठ्या प्रेमानें आपल्या लाडक्या सुनेला पोटाशीं धरिलें.

दोनचार दिवसांच्या आंतच एका ओळखीच्या सोनाराला बोलावून आणून त्याच्या मार्फत लक्ष्मीबाईंनीं ते दागिने विकून टाकिले. परंतु सासू अगदीं पिच्छासच बसल्यामुळें सगळे दागिने कांहीं त्यांनां विकतां आले नाहींत. अगदीं जरूर असे चारपांच ठेवावेच लागले. त्यांचे जवळजवळ १७००रुपये आले. हल्लीं पौष महिना चालला होता आणि तशांतून या वर्षी पिकेंहि चांगलीं आलीं असल्यामुळें धान्यहि विपुल झालें होतें. लक्ष्मीबाईंनीं दीड हजार रुपये खर्चून पाऊणशें खंडी दाणा खरीद करून कोठारांत सांठवून ठेविला. दीक्षितांची कांहीं मालकीची जमीन होती. ही जमीन अल्पस्वल्प मक्त्यानें एका कुळाकडे लाविली होती. परंतु कुळाकडून ती जमीन काढून घरींच लागवड करण्याचें त्यांनीं

ठरविलें. त्या जमिनींत थोडी बागाईत जमीनहि होती. त्यांत ऊंस, मका, वांगीं, मुळा, कांदा वगैरेंची लागवड केली. बाळकृष्णाचें वय लहान होतें खरें, परंतु त्याची बुद्धि पराकाष्ठेची तीक्ष्ण असे. हुषार, मेहनती असे गडी कामावर घेऊन तो त्या जमिमीची लावगड करण्यांत नियुक्त झाला. आमच्या विनोबांनांसुद्धां आस्तेआस्ते यांतील मर्म कळूं लागलें. सदूभाऊंकडून हा वेळपर्यंत खर्चासाठीं एक छदामदेखील आला नव्हता. तरीसुद्धां धाकट्या सूनबाईच्या दक्षतेमुळें राधाबाईच्या संसाराची ओढाताण आतां मुळींच राहिली नाहीं.

---

## प्रकरण चोविसावें.

### माधवरावांची प्रणयतृष्णा.

"प्रियकरा! माझं तन मन धन सर्व कांहीं आपणच आहां. माझ्या देहावर, माझ्या प्राणांवर आतां माझी मुळींच सत्ता नाहीं. आपणच त्याचे खरे खरे मालक—धनी आहां. आपलं सुख तेंच आतां माझं सुख; आपलं दुःख तेंच आतां माझं दुःख. या जगांत आतां आपल्याविना मला दुसरी एकहि वस्तु प्रिय नाहीं. आपण जसं सांगाल तसं मी करीन आणि आपण जें मागाल तें आपल्याला देईन. आपणाला काय पाहिजे? आपली इच्छा तृप्त करायला ही दासी—

"मेरी प्यारी! मेरा जान! माझ्या जिवाच्या कलिज्या! प्रेम! प्रेम! प्रेम! मी प्रेमाचा अभिलाषी—प्रेमाचा भुकेला आहें. या याचकाला प्रेमभिक्षा पाहिजे, दुसरें कांहींएक नको. अहा! मेरी प्यारी—"

कोणी तरुणी, अचल कटाक्षयुक्त मधुरस्मित करीत, कोणा तरुणाच्या गळ्यांत प्रेमानें हात घालून लडिवाळपणानें बोलली. तरुणानें आनंदविव्हल होऊन वरील उत्तर दिलें.

हें जोडपें एका रमणीय दिवाणखान्यांतील एका सुंदर कोचावर बसलें होतें. दिवाणखाना प्रशस्त असून उत्तमप्रकारें शृंगारलेला होता. उत्कृष्ट कारागिरांनीं आपलें सर्व चातुर्य खर्च करून मोठ्या कुशलतेनें रंगविलेल्या सुंदर पुष्पांनीं आणि लतापत्रांनीं दिवाणखान्याच्या भिंती मोठ्या रमणीय दिसत होत्या. दिवाणखान्याच्या मध्यभागीं एक सुंदर हस्तिदंती पलंग असून अतिशय मऊ अशा शुभ्र शय्येनें तो सुशोभित केला होता. पलंगावर जागजागीं पुष्पगुच्छ पसरले होते. जिकडेतिकडे सुवासिक पुष्पमाला लोंबत होत्या. मंदवायूच्या झुळकेनें

मधूनमधून किंचित् उडत असलेली पलंगावरची नाजुक, जाळीदार, बर्फासारखी शुभ्र मच्छरदाणीतर फारच मनोहर दिसत होती. जवळच एका उघड्या खिडकी-पाशीं सुंदर बैठक घातली असून तिच्यावर शुभ्र तक्के, लोडें, मखमालीच्या गिरद्या व्यवस्थित रीतीनें ठेविल्या होत्या. दरवाजासमोर स्पष्टपणें दिसणारें मोठें थोरलें घड्याळ, गादीच्या चारपांच मौल्यवान् खुर्च्या, उत्तम वार्निश केलेल्या दोन काळ्याभोर आरामखुर्च्या, एक (रॉकिंगचेअर) झोंके घ्यावयाची खुर्ची, दोन मोठे थोरले बिलोरी आरसे, टेबलावर पडलेल्या चिनीमातीच्या बशा, पेले इत्यादिकांनीं तो प्रशस्त दिवाणखाना व्यापून टाकिला होता. जागजागीं असलेल्या संगमरवरी दगडाच्या राउंड टेबलांवर कांहीं मनोहर कांचपात्रें, धातूचे पुतळे वगैरे वस्तु दिवाणखान्याची शोभा वाढवीत होत्या. प्रत्येक वस्तु जेथल्या तेथें नीट व्यवस्थेनें मांडण्यांत आली होती. बैठकीशेजारींच एक पानसुपारीचें रुप्याचें तबक, त्याच्या-जवळच एक पितळेचें पिंकपात्र, मे ब्लॉसम—अमेरिकन तंबाखू–चा एक डबा आणि नार्वेदेशीय अग्निशलाकांची एक चिमुकली पेटी, इत्यादि वस्तुहि दृग्गोचर होत होत्या. समोरच्या कपाटाच्या कांचेंतून डोकावीत असलेलीं लहानमोठीं ग्लासें, रक्तवर्ण औषधाच्या डझन अर्ध डझन बाटल्या, त्या रमणीय बैठकीवर अधिष्ठित झालेल्या मंडळीचें चित्ताकर्षण करीत होत्याच ! भिंतींवर लटकत असलेल्या त्या आर्यांग्लयुवयुवतींच्या तसबिरी मनोहर तर खऱ्याच, परंतु किती अश्लील ! प्रत्येकीमध्यें कामदेवाची लीला परिपूर्ण भरलेली. या ठिकाणच्या इतर यच्चयावत् वस्तुहि अशाच प्रकारच्या–अंतःकरणाची चलबिचल करणाऱ्या होत्या. हें गणिकागृह आहे, हें आणखी निराळें सांगितलें का पाहिजे ?

कोण बरें हीं तरुणतरुणी ? अहो, हेतर आपले पूर्वपरिचित माधवरावजी सहस्त्रबुद्धे. रामचंद्रपंत सहस्त्रबुद्धे यांचे हे चिरंजीव ! आतांतरी ओळख पटली ना नाहीं ? आणि तरुणी ? हाय—या युवतीची ओळख आह्मीं कशी द्यावी ? परंतु काय करावें ? ग्रंथकाराच्या कर्तव्याला अनुसरून नाइलाजास्तव लिहिणें प्राप्त आहे. ही युवती आमच्या माधवरावजींच्या गांवचीच ताराजी नांवाची एक प्रख्यात विश्वयोषिता होय.

ते दिवशीं रात्रीं माधवरावजींची स्वारी क्रोधांध होऊन आपली बालसह-धर्मिणी मनोरमा हिला पदाघात करून जी बाहेर पडली, ती याच ताराजींच्या मंदिरांत येऊन दाखल झाली होती. तत्पूर्वी माधवराव आपल्या एका जीवश्च

## माधवरावांची प्रणयतृष्णा.

कंठश्च मित्राच्या पराकाष्ठेच्या आग्रहावरून ताराजींच्या येथें फक्त एकदाच कायते गाण्याला.आले होते व त्याच प्रसंगीं उभयतांचा थोडासा परिचयहि झाला होता. माधवरावजींचें आगमन होतांच ताराजींनीं त्यांची फारच उत्तम बरदास्त ठेविली होती. ताराजींचें लोकोत्तर लावण्य पाहून आणि कोकिळेलाहि लाजविणारा त्यांचा सुमधुर कंठरव ऐकून माधवरावजींची स्वारी अगदीं खूष होऊन गेली होती. दुर्भाग्यक्रमानें याच संधीस बिचारी लज्जाशील बालिका मनोरमा पतिप्रेमाचा ओघ आपल्याकडे ओढून घेण्यास असमर्थ झाली. मग काय विचारावें ! माधवरावजींचें मन सहजच ताराजींकडे आकर्षित झालें.

कोणत्याहि दुष्कृत्याला प्रवृत्त होण्यापूर्वीं साधकबाधक प्रमाणांनीं मनाशीं बराच झगडा करून व मनाची कशीतरी समजूत घालून त्याला उत्तेजन देण्याची प्रत्येकजण खूप धडपड करीत असतो. कारण, मन साफ नसेल तर सदसद्विवेकबुद्धीची आंतून एकसारखी होत असलेली टोंचणी सहन करणें मोठें कठिण होतें. बालिका मनोरमेनें पतीची अवज्ञा करून गंभीर अपराध केला असल्यामुळें माधवरावांनां तिचा भयंकर राग आला होता व त्या रागाच्या भरांत बिचाऱ्या त्या पोरीचा सूड उगविण्याकरितां माधवरावजींनीं अशी पापसमुद्रांत उडी घेतली होती. त्या मूर्खानें मनांतल्या मनांत स्थिर केलें, कीं, यांत आपला कांहींएक दोष नाहीं; सर्व दोषांचें मूळ आपली पत्नी मनोरमा आहे, आणि ह्मणून यांत जर कांहीं पातक घडण्याचा संभव असेल तर त्या पातकाला धनीहि मनोरमाच आहे. पापी मनुष्य पापकर्माला उद्युक्त होतांना याप्रमाणेंच कांहींना कांहीं सिद्धांत करून पापकर्माला भीत असणाऱ्या मनाला उत्तेजन देत असतो.

माधवराव सुशिक्षित, विद्वान्, बुद्धिमान्, विचारी होते; तरीहि लहानपणापासून सर्वांचे फार लाडके असल्यामुळें त्यांनीं पूर्ण स्वातंत्र्य उपभोगिलें होतें. शिवाय वडिलांची स्थिति चांगली—नव्हे पूर्ण श्रीमंतीची असल्यामुळेंतर त्यांनां कसल्याच प्रकारचे शारीरिक किंवा मानसिक कष्ट ठाऊक नव्हते. यौवनकालीं त्यांची प्रणयतृष्णा प्रबल झाल्यावेळीं लज्जाशीला बालिका मनोरमेकडून त्यांची ती पिपासा तृप्त झाली नाहीं. पत्नीपासून प्रणयलाभ घडणें अशक्य आहे असा मनांतल्या मनांत अविचारानें सिद्धांत ठरवून ते एकदम ज्ञानशून्य बनले. त्यांची विद्या, बुद्धि, ज्ञान, हीं सारीं पार कोणीकडच्या कोणीकडे वाहून गेलीं.

आणि त्याबरोबरच, हाय हाय ! बिचाऱ्या त्या निरपराध, निर्दोष कोमल बालिकेचेंहि कपाळ फुटलें !

इतके दिवस माधवरावांचा ताराजींबरोबर कांहींएक ठराव वगैरे झाला नव्हता. आज तत्संबंधीं कायतें ठरावयाचें होतें आणि ह्मणूनच आज हें मोहक मधुरस्मित आणि मारू नेत्रकटाक्ष यांचा सारखा भडिमार चालला होता. ताराजींच्या अंगीं जी कांहीं ह्मणून मोहिनीशक्ति होती त्या सर्व शक्तीचा, वेडे झालेल्या माधवरावांवर आज प्रयोग होऊं लागला. आज माधवरावांच्या हातीं स्वर्ग आणून देण्यासमुद्धां ताराजींची तयारी होती. आणि एवढ्याचसाठीं हें सारें लाघव चाललें होतें. माधवरावांच्या गळ्याला मिठी मारून ताराजी ह्मणाल्या "प्रियकरा ! आपली इच्छा तृप्त करायला ही दासी तयार आहे."

माधवरावांनां आणखी कशाचीहि अपेक्षा नव्हती. पत्नीप्रेमाविषयीं पूर्ण निराशा झाल्यामुळें तें प्रेम अन्यत्र संपादण्याकरितां ते अधीर होऊन अगदीं उल्लू बनले होते. आणि ह्मणूनच ते प्रेमविव्हल होऊन ह्मणाले "मेरी प्यारी ! मेरा जान ! मी प्रेमाचा भुकेला आहें. मला प्रेमभिक्षा पाहिजे. प्रेमाव्यतिरिक्त आणखी कांहींहि मला नको."

योग्य स्थलीं योग्य याचना झाली. हातीं स्वर्ग आणून देण्याचें जिचें सामर्थ्य, तिला क्षुद्र प्रेमदान करणें का अशक्य आहे ! ताराजी एक लांब सुस्कारा टाकून ह्मणाल्या "काय बाईतरी विचित्र मागणं हें ! अजूनहि का माझं प्रेम आपल्याला मिळालं नाहीं ? मी जी आपल्यावर जीवापलीकडेहि प्रीति करत्यें, ती अजूनहि आपल्या ध्यानीं येत नाहीं ? प्रिया ! एक क्षण आपली ही मनमोहन मूर्ति दृष्टीआड झाली, कीं, या दासीला जो चोंहींकडे सर्वत्र अंधकार भासतो, आहारनिद्रासुद्धां सुचत नाहीं, एकसारखा या पायांचाच ध्यास लागून राहतो, तें आपल्या ध्यानांतच येत नाहीं ? जें मी आपण मागण्यापूर्वी केव्हांच आपल्याला देऊन चुकल्यें आहें, तें पुनः आणखी काय देऊं ?"

मायाविनी मायाजाल पसरून अपूर्व चातुर्यानें माधवरावांला मोहित करूं लागली. ताराजी केवळ तोंडानें "मी आपल्यावर प्राणापलीकडेहि प्रेम करित्यें," इत्यादि बोलूनच स्वस्थ राहिली नाहीं, प्रेमाबरोबरच तिनें मायाजालहि पसरण्यास आरंभ केला. हांहां ह्मणतां ताराजींचे नेत्र अश्रूंनीं व्याप्त झाले. कंठ दाटून आला.

या मोहजालानें माधवरावतर अगदींच मोहित होऊन गेले. त्या चारुगात्रीचें ते अश्रुपूर्ण नेत्र स्वचक्षूंनीं अवलोकिल्यावर आणि तिचा तो बाष्पनिरुद्ध कंठरव स्वकर्णांनीं श्रवण केल्यावर, मग ताराजींच्या निस्सीम प्रेमाबद्दल माधवरावांना संशयतरी कसा यावा ? प्रेमभरानें ताराजींच्या गुलाबाहूनहि सुकुमार अशा लुसलुशीत गालांचें एक गोड चुंबन घेऊन हातांतील रुमालानें तिचे नेत्र पुशीत पुशीत माधवराव ह्मणाले "लाडके ! तुझें मजवर अंतःकरणापासून प्रेम आहे हें मी पूर्ण ओळखून आहें, आणि ह्मणूनचतर तुजवर मी फिदा झालों आहें. तुझें जर मजवर प्रेम नसतें, तर तुझ्या प्रेमांत मी एवढा बद्ध कसा झालों असतों? हें आपलें प्रेम अखंड असेंच कायम रहावें, एवढेंच परमेश्वरापाशीं मागणें आहे."

"मीहि त्याजपाशीं रात्रंदिवस हीच भिक्षा मागत आहें. आपण गडे याला कांहीतरी लवकर उपाय करा. याउपर आपल्याविना या देहावर अन्य कुणाचीहि मालकी नाहीं. सर्वस्वीं ही दासी या पायांलाच वाहिली आहे. प्रियकरा, माझ्या घरीं दुसऱ्या कुणींहि येऊं नये व मलाहि निरर्थक सतरापंधराजणांची मनधरणी करण्याचा प्रसंग येऊं नये, असा बंदोबस्त आपण नाहीं का करणार ? आपण जर असं करणार नाहीं, तर खरंच सांगत्यें, विष खाऊन आपल्या पायांपुढं मी प्राण देईन." ताराजींचा कंठ रुद्ध झाला. नेत्रांतील अविरल अश्रुप्रवाहानें वक्षःस्थल भिजूं लागलें.

माधवरावांनांहि गहिंवर आल्याविना राहिला नाहीं. असें हें अकृत्रिम, निस्सीम प्रेम पहातांच कोणाला बरें तसें होणार नाहीं ? ते ताराजींला गाढालिंगन देऊन तिचें अश्रुमार्जन करीत ह्मणाले "प्रियतमे ! माझीसुद्धां तीच इच्छा आहे. तूं आईला जरा हांक मार पाहूं. मी तिच्याजवळ यासंबंधीं सगळा बंदोबस्त करून टाकतों, तुह्मांला महिन्याला खर्चाला काय द्यावें लागेल तें एकदां नक्की ठरलें, ह्मणजे बरें पडेल."

"छे ग बाई ! मी नाहीं जा आईला बोलावयाची ! माझी काय अवस्था झाली आहे, हें माझं मला ठाऊक. तिला का याची कल्पना होणार आहे ? नी आपली चारपांचशें घेऊन बसेल आणि मग एकादे वेळीं आपण इकडे यायचंहि टाकून द्याल. नी आपण एक दिवस माझ्या दृष्टीआड झालां कीं माझा प्राण निघून जाईल. मी नाहीं आईला बोलावणार गडे ! या बाबतींत आपल्यापाशीं मेला ठराव तो काय करायचा ? ज्यांच्या चरणीं प्राण, जीवन, समस्त वाहिलें आहे, त्यांच्याशीं

का आतां त्या यःकश्चित् पैशाविषयीं ठराव करीत बसायचं ? आपल्याला जें बरं दिसेल तें आपण करावं. आमचा खर्च भागला झालं, दुसरी कांहींएक इच्छा नाहीं.''

" तुमचा दरमहा किती रुपयांचा खर्च आहे ?"

मुरके मारीत आणि डोळे मिचकवीतमिचकवीत ताराजी ह्मणाल्या "खर्चाचं काय, करावा तेवढा थोडाच आहे ! परंतु आतां हा सगळा खर्च आपल्या एकट्याच्याच शिरावर पडणार, तेव्हां अद्वातद्वा खर्च करायला माझं मन कसं बरं धजेल ? महिन्याला शंभर रुपये द्या, झालं. मी आपली खूप काटकसर करून कसंतरी त्यांतल्यात्यांत चालवून घेईन."

ताराजींचे त्या वेळचे ते अंगविक्षेप, नेत्रकटाक्ष, मधुरस्मित आणि लाघवी भाषण यांचा माधवरावांच्या मनावर असा कांहीं विलक्षण परिणाम झाला, कीं, ताराजींनीं मागितलेली ही शंभर रुपयांची रकम त्यांनां अगदींच क्षुद्र वाटली. ताराजींचें आपल्यावर अंतःकरणापासून प्रेम आहे आणि केवळ त्या प्रेमामुळेंच ती एवढ्या थोड्या रकमेवर संतुष्ट आहे, हें मनांत येऊन ते महाल्हादपूर्वक तिला दरमहा शंभर रुपये पगार देण्यास कबूल झाले.

आपली कार्यसिद्धि झाली हें पहातांच ताराजी गर्वानें पुनः मोहिनीस्वरूप धारण करून वेश्यासुलभ नाना हावभाव प्रकाशित करून मनांतल्या मनांत ह्मणूं लागल्या "इतक्या सहजासहजीं शंभर रुपये देण्याचं कबूल करून घेणं का त्या येरडीच्यानं झालं असतं ? तिनं फार–फार–फार तर पंचवीस रुपये मागितले असते. तीस–चाळीस ह्मणजे डोक्यावरून पाणी ! यापेक्षां जास्ती रक्कम तोंडांतून उच्चारायला तिची जीभ धजलीच नसती ! शंभराला स्वारी झटपट राजी झाली–आणखी कांहीं चढवलं असतं तरीदिखील पदरांत पडलं असतं. फिकिर नाहीं, शिकार हातींच आहे, पाहून घेईन ! हळुहळू दोनशें रुपयांवर स्वारीला आणून बसवीन, तरच नांवाची !"

ताराजी मनांतल्या मनांत याप्रमाणें मनोराज्य करीत आहेत–त्याच वेळीं आमचे रंगेल माधवराव त्या मनमोहिनी तन्वंगीचें सुरुचिर सौंदर्य अतृप्त नयनांनीं प्राशन करीत मनांतल्या मनांत ह्मणूं लागले "अहाहा ! काय आश्चर्य ! हें चंद्रासहि लाजविणारें मनोहर मुखकमल जितकें पुनःपुनः पहावें, तितकेंतितकें त्यावर नूतननूतन सौंदर्य दृग्गोचर होत आहे ! हें एवढें नूतननूतन सौंदर्य येतेंतरी कुठून ?

---

## प्रकरण पंचविसावें.

### मनोरमेचें पतिसौख्य.

तारार्जीच्या नादानें माधवराव दिवसेंदिवस अधिकाधिकच भ्रमिष्ट बनत चालले. सारा दिवस तिचाच ध्यास व तिकडेच पडलेले. कामधंद्याकडेहि त्यांचें आतां लक्ष्य राहिलें नाहीं. अर्थात्, कामकाजाचा सर्व भार त्यांचे मेहुणे सदूभाऊ यांच्या गळ्यांत पडला. सदूभाऊ जीव तोडून काम करीत खरे, परंतु त्यांनां अद्यापि धंद्याची बरोबरशी माहिती झाली नव्हती, यामुळें जो तो त्यांच्या भोळेपणाचा लाभ घेऊं लागला. कंत्राटाचें काम ह्मणजे हलक्या प्रतीच्या लोकांशीं रात्रंदिवस प्रसंग. त्यांच्यावांचून पदोपदीं अडावयाचें. त्यांनां खुष ठेवून, उलटेंसुलटें समजावून, त्यांजपासून यथास्थित काम घेतलें पाहिजे. अशा कामास चलाखच मनुष्य लागतो. बिचाऱ्या साध्याभोळ्या सदूभाऊंनां हें काय होय! उठलासुटला त्यांनां फसवूं लागला. कांहीं दिवस कामधंदा सुरळीतपणें चालला होता, परंतु लवकरच त्याला उतरती कळा लागली. इकडे माधवरावतर तारार्जीच्या नादांत गुंग. तिच्यापुढें त्यांनां स्वर्गहि तुच्छ. धंदा सुचतो कशाला? हळुहळू व्यवसाय संपुष्टांत येत चालला. परंतु इकडे स्वारीचा खर्च मात्र चौपट वाढला होता. धंद्यांत प्राप्ति नाहीं, खर्च अतोनात वाढलेला, तेव्हां याचा परिणाम काय व्हावयाचा, तें स्पष्ट समजण्याजोगेंच आहे.

पापकर्में कांहीं फार दिवस झांकलीं जात नसतात. कधीं ना कधीं तीं उघडकीस यावयाचींच. माधवरावांचे हे विचित्र ढंग रामचंद्रपंतांच्या कानीं गेले. चिरंजीव वेश्यासक्त झाल्याबद्दल त्यांनां एवढेंसें वाईट वाटलें नाहीं; परंतु कामकाजाकडे त्यांचें अगदींच दुर्लक्ष्य, धंदा तर साफ बसत आला, हें पाहून ह्मताऱ्यास परमावधीचें दुःख झालें. मुलाला शासन करण्याचेंहि आतां त्यांचें वय राहिलें नव्हतें. रामचंद्रपंतांस पोराच्या या चाळ्यांनीं हृद्रोग लागला. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें पटकीच्या भयंकर वाऱ्याचे तावडींत सांपडून एक दिवस ह्मातारा ऐहिक दुःखांपासून मुक्त झाला. आणि या आकस्मिक घटनेनें, बहकून गेलेल्या माधवरावांचा मार्ग तर अगदींच निष्कण्टक झाला.

शास्त्रविधींप्रमाणें रामचंद्रपंतांचीं सर्व और्ध्वदेहिक कर्में यथासांग घडलीं. क्रियाकर्माला कांहीं थोडाथोडका खर्च झाला नाहीं. रामचंद्रपंत सहस्रबुद्धे यांच्या मानसंभ्रमाला शोभेल अशाच रीतीनें चिरंजीवांनीं त्यांचें क्रियाकर्मांतर

केलें. श्राद्धप्रसंगीं हतभागिनी लक्ष्मीबाईहि माहेराहून मुद्दाम आल्या होत्या. परंतु त्या कांहीं फार दिवस सासरीं राहूं शकल्या नाहींत. त्यांच्या वैधव्य-व्रतांत आणि नेमधर्मपालनांत येथें अनिवार्य अशीं नाना विघ्नें येऊं लागलीं. शिवाय त्यांच्या दोन्ही नणंदा—नव्हे पूर्व जन्मींच्या वैरिणी—त्यांची यत्किंचितहि विचारपूस न करितां उलट पदोपदीं त्यांचा छल करूं लागल्या. आधींच दुःसह वैधव्यदुःखांत होरपळून गेलेल्या बिचाऱ्या त्या दीन अबलेला मानसिक यातनांच्या भरीला आणखी ही नणंदांची जाचणूक कशी बरें सहन व्हावी! सासऱ्याचे दिवस होतांच एका आठवड्याच्या आंतच त्या माहेरीं चालत्या झाल्या.

आमचे विनोबा—नव्हे विनायकराव—सुद्धां आपल्या वहिनींच्या वडिलांच्या श्राद्धाला मुद्दाम आले होते. विनायकराव आतां पूर्वीचे विनोबा राहिले नव्हते; सर्वच पालट झाला होता. तीनचार दिवस राहिल्यावर विनायकराव घरीं जावयास निघाले. आपल्याबरोबर घरीं येण्याविषयीं दादांनांहि त्यांनीं पराकाष्ठेचा आग्रह केला; वहिनींला आणि आपल्या त्या दोघांहि लाडक्या पुतण्यांनां बरोबर घेऊन जाण्याविषयींतर त्यांनीं पराकाष्ठा केली; परंतु एकट्या वहिनींची या गोष्टीला अनुमति न मिळाल्यामुळें कोणालाहि जातां आलें नाहीं! जगू आणि दामू यांनीं काकांबरोबर जाण्यासाठीं अगदीं रडूनरडून आक्रोश केला; परंतु पार्वतीबाईंनीं त्यांचें कांहींएक चालूं दिलें नाहीं.

रामचंद्रपंतांच्या तेराव्याला आणखीहि बरीच आप्तस्वकीय मंडळी आली होती. परंतु चारदोन दिवसांच्या वरती ह्मणून कांहीं कोणाला तेथें रहातां आलें नाहीं. आमच्या पार्वतीबाई आणि त्यांच्या ज्येष्ठ भगिनी गंगाबाई या दोघींनीं एकंदर मंडळीची ताबडतोब बोळवणी केली. वडिलांच्या आकस्मिक निधनानें सर्वांपेक्षां विधवा गंगाबाईंनांच अधिक कष्ट झाले. आह्मीं पूर्वी सांगून चुकलोंच आहों, कीं, शैशवावस्थेपासून वडिलांचा गंगूवर अत्यंत लोभ असे. गंगाबाईंनां जो कांहीं गर्व, जो कांहीं दर्प, अहंकार होता, त्या सगळ्यांचें मूळ वडिलांकडून होत असलेला त्यांचा फाजील आदर, फाजील लाड होय. तेव्हां पितृवियोगजनित दुःख सर्वांपेक्षां गंगाबाईंनांच विशेष जाणवलें, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. गंगाबाईंनीं आपल्या स्वभावानुसार पितृनिधनाचा आणि बिचाऱ्या त्या निरपराध बालिका मनोरमेचा अगदीं निकटसंबंध लावून दिला. मनांतल्या मनांत त्यांनीं ठरवून टाकिलें, कीं, ही पांढऱ्या पायाची भिकारड्याची पोर घरांत शिरल्यामुळें या अवदसेच्या पायगुणानेंच वडिलांचा असा अकालीं अंत झाला. चांडाळ गंगाबाई पदोपदीं

# मनोरमेचें पतिसौख्य.

मनोरमेच्या काळजाचे लचके तोडूं लागल्या. हाय ! बिचाऱ्या कोमल बालिकेच्या असह्य छळाचें वर्णन करण्यास आमची लेखणी धजत नाहीं.

वडिलांच्या मृत्यूस दोन आठवडे लोटले असतील नसतील, तोंच माधवरावांनीं आपला पूर्वक्रम आरंभिला. आतांतर त्यांनीं रात्रीं घरीं येण्याचें अगदींच वर्ज्य केलें होतें. दिवसाचा बहुतेक वेळहि ताराजींकडेच खलास होत असे. ताराजी मदिरादेवीच्या निस्सीम भक्त होत्या—माधवरावहि हळुहळू पूर्ण सुराभक्त बनले. लवकरच त्यांच्यासारखा अट्टल दारूबाज साऱ्या गांवांत आढळेनासा झाला ! आजवर आमच्या कंत्राटदार माधवरावजींचे हे चाळे गांवांत फारसे कोणाला ठाऊक नव्हते. परंतु आतां जलावरील तैलबिंदूप्रमाणें ही हकीगत सगळ्या गांवभर पसरली. त्यांच्या हितचिंतकांनीं आणि आप्तस्वकीयांनीं हे ढंग सोडून देण्याविषयीं त्यांची नाना प्रकारें कानउघाडणी करण्याच्या कामीं आपापली शर्थ केली. परंतु माधवराव या मंडळीशीं बुद्धिवाद करूं लागले, कीं, या कामीं आपला कांहींएक दोष नाहीं; सर्व दोषांची अधिकारी ती लाजाळू, भित्री, मनोरमा आहे! माधवरावांसारख्या सुशिक्षित, विद्वान् तरुणाच्या विद्याबुद्धिवैभवाचा यापरता अधिक परिचय काय द्यावयाचा !

बंधूच्या या दुर्वर्तनाबद्दल गंगाबाई आणि पार्वतीबाई यादोघीहि नणंदा बिचाऱ्या निरपराध मनोरमेला रात्रंदिवस ताडन करून कठोर शब्दांनीं छळूं लागल्या. तरीहि एकंदरींत बंधूच्या या वर्तनानें गंगाबाईला मनांतून बरें वाटलें. पार्वतीबाईला मात्र अत्यंत दुःख होत असे. गंगाबाईंनां आनंद होण्याचें कारण हें,-कीं, आतां मनोरमेला सुखाचा दिवस लाभणें नाहीं. तिचें सर्व सुख, सौभाग्य पार विलयाला गेलें. गंगाबाईसारख्या नणंदेला आणखी काय पाहिजे होतें ? बंधूचें वेश्यासेवन गंगाबाईला सहन होत असे, परंतु त्यानें आपल्या पत्नीशीं प्रेमानें वागून तिला सुख द्यावें, हें मात्र त्यांनां बिलकूल सहन होत नव्हतें ! बालिका मनोरमेनें म्हणजे गंगाबाईचा कांहीं अपराध केला होता, असें मुळींच नाहीं. परंतु ती तिची भावजय झाली, हा काय थोडा अपराध होता ? आणि याच भयंकर अपराधामुळें गंगाबाई मनोरमेची आजन्म वैरीण बनली होती.

माधवराव जसजसे बेफाम होऊन ज्ञानशून्य बनत चालले, तसतशी बालिका मनोरमेची अवस्थाहि अधिकाधिक शोचनीय होत चालली. घरांत कितीतरी चाकरनोकर राबत असत, तरीहि संसाराचे सगळे काबाडकष्ट रात्रंदिवस

बिचाऱ्या त्या दुर्दैवी बालिकेलाच करावे लागत. आणखी तशांत बापडीला खावयाला पोटभर अन्नसुद्धां मिळत नसे. दोन्ही नणंदांच्या जाचानें आणि असह्य छळणुकीनें रडूनरडून ती बिचारी अश्रूंनीं पोट भरीत होती. अन्य आहाराचें तिला प्रयोजनच नव्हतें. बालिकेचें तें क्रंदन कोणाला ऐकूं येत नसे व कळतहि पण नसे. आणि ते ऐकूं येण्याला किंवा कळण्याला कांहीं मार्गहि नव्हता. कारण तिचें क्रंदन शब्दहीन, अश्रुहीन होतें. शब्दहीन क्रंदन पुष्कळांनीं पाहिलें असेल; परंतु अश्रुहीन क्रंदन केवळ मनोरमेच्या अभ्यासाचेंच फळ होतें.

या सर्वांपेक्षां कष्टतर यातना ह्मटली ह्मणजे पतीकडून होत असलेला अनादर, कारण मनोरमा आतां कांहीं बालिकाच राहिली नव्हती. तिनें यौवनावस्थेंत प्रवेश केला असून आपली स्थिति आतां तिला स्पष्ट समजूं लागली होती. यौवनचिन्हांनीं तिच्या बाह्य देहाला जशी रमणीय शोभा आली होती, तद्वत्च अंतरंगांत हिताहितज्ञानहि विकसित झालें होतें. त्या गंभीर निशासमयीं, आपल्याला अकारण पदाघात करून पति जे कोठें बाहेर निघून गेले, त्यास आपणाकडून असा अपराधतरी काय घडला, हें मनोरमा आजदिवसपर्यंत स्थिर करूं शकली नाहीं. पतीला त्याचें कारण विचारावें, त्याची क्षमा मागावी, ह्मणून मनोरमा आतां अगदीं आकुल होऊन राहिली होती; परंतु तिच्या दुर्भाग्यक्रमानें कांहीं केल्या तसा सुयोग येईना. त्या रात्रीपासून माधवराव मनोरमेला आपल्याजवळ येऊंच देत नसत. यदाकदाचित् अवचितपणें ती सन्निध आलीच, तर ते तत्क्षणीं तेथून उठून चालते होत. बालिकाच ती, बापडी काय करील ? तिचा आणखी काय उपाय होता ? जवळपास कोणी नसलें ह्मणजे ती घरांतील देवांपुढें डोकें आपटी आणि हात जोडून मनांतल्यामनांत त्यांची पुढीलप्रमाणें करुणा भाकी, कीं "आई जगदंबे ! हे भक्तवत्सल प्रभो ! मी आणखी कशाचीहि अपेक्षा करीत नाहीं. मला मृत्यु दे. जेणेंकरून माझा त्वरित अंत होईल असें कर. हे करुणाकर दीनदयाळा ! हे माते जगज्जननी ! तूं मजवर प्रसन्न होऊन माझी एवढी आस पुरीव, ह्मणजे मी या सर्व यातनांपासून मुक्त होईन."

नणंदांकडून होणारा छल अगदींच असह्य झाला ह्मणजे मनोरमा आत्महत्या करून घेण्यासदेखील उद्युक्त होई. परंतु आत्महत्या कशी करावी हें कांहीं त्या कोमल बालिकेला सुचत नसे आणि ह्मणूनच ती पदोपदीं देवतांजवळ मृत्युवरदान मागे.

---

गार्डनपार्टी.

## प्रकरण सव्विसावें.

### गार्डनपार्टी.

रामचंद्रपंतांपाशीं बरीच रोकड होती. सहजच ती आतां माधवरावजींच्या हातीं आली. या समयीं एवढी मोठी रक्कम माधवरावांच्या हातीं न येती, तर खचित त्यांचा एवढा नाश झाला नसता. हा अर्थच सकल अनिष्टांचें मूळ आहे. माधवरावजींचें जीवनचरित्र हा त्याचा एक उज्ज्वल दृष्टांतच होय. आतांतर माधवराव उघडउघडपणें पापकर्मांत रत होऊं लागले. लोकनिंदेचें भय आतां त्यांनां मुळींच राहिलें नाहीं. अनेक परवंचक, स्वहितसाधक, व्यसनासक्त, तोंडपुज्या व हांजीहांजी करणाऱ्या नीच लोकांची त्यांच्याभोंवतीं गर्दी जमूं लागली आणि हे नराधम माधवरावांच्या सर्वनाशाचा मार्ग सुलभ करूं लागले.

माधवरावांकडे आज गार्डनपार्टी होती. मित्रमंडळीनें माधवरावांचें उद्यानगृह आज अगदीं गजबजून गेलें होतें. कित्येक दिवसांपासून या गार्डनपार्टीची जंगी तयारी चालली होती. कोणी गायकनर्तक गणिकांचा बंदोबस्त करण्यांत, कोणी नानाविध मद्यार्कांचा संग्रह करण्यांत, तर कोणी मांसपाकप्रभृति पक्वान्नांची तयारी करण्यांत अगदीं चूर होऊन गेले होते. जो पहावा तो उद्योगांत! हांहां ह्मणतां सकाळ संपून प्रहर दिवस झाला. गोविंदराव, रामराव, विष्णुपंत, नरहरपंत, अमरसी, सुलेमान मीया, नौरोजीशेट, जान डिसोजाप्रभृति एकएक दोस्तमंडळी हळुहळू एकत्र होऊं लागली. ताराजी, सुंद्राजी, चंद्राजीप्रभृति खाशी मंडळीच कायती अद्यापि यावयाची होती. सर्वजण मोठ्या उत्कंठेनें त्यांची मार्गप्रतीक्षा करूं लागले. इतक्यांत बरोबर साडे नवांच्या ठोक्याला घोड्यांच्या चार गाड्या उद्यानांत शिरल्या. अश्वचक्रांचा ध्वनि कर्णरंध्रांत प्रविष्ट होतांच मंडळीचा उल्हास काय विचारावा! समस्तांचीं मुखकमलें प्रफुल्ल झालीं. सुलेमानशेट तर धावतच सामोरे गेले आणि गाडींतून येणाऱ्या मंडळीचें उत्तम प्रकारें स्वागत करून त्यांस दिवाणखान्यांत घेऊन आले.

मदोन्मत्त हत्तीप्रमाणें डुलतडुलत आणि नूपुरांच्या रुमझुमरुमझुम रवानें चाऱ्ही दिशा कंपायमान करीतकरीत जेव्हां या वारयुवती उद्यानस्थ विलास-मंदिरांत शिरल्या, तेव्हां मंडळीची जी कांहीं धांदल उडाली, विचारूं नका! आनंदातिशयानें, हर्षोर्मींनीं समस्तांचीं अंतःकरणें उचंबळूं लागलीं. सर्व मंडळीनें उठून त्यांनां खडी ताजीम दिली. अल्पकाळांतच पुनः जिकडेतिकडे शांतता झाली. नौरोजी शेटजींनीं हस्तद्वय जोडून, मस्तक नत करून त्या रमणीगणास विनंति केली

"बिबीसाहेब! शुभकृत्य सुरू करण्याला आतां विलंब कां? आपण सुकर्णधार होऊन या पतितांनां भवनदीपार करा."

बिबीसाहेब मुरके मारीत, नेत्रकटाक्ष फेंकीत, मधुरस्मित करून ह्मणाल्या " खाविंद! आज इथं इतकी मंडळी असतांना आह्मीं कसं बरं हें एवढ्या जोखमाचं काम करावं?"

सुलेमानमियांनीं तत्काल प्रत्युत्तर दिलें "वाः! तुमची आमची फार दिवसांची जानपछान. तुमच्यावर आमचा पूर्ण भरंवसा, सारी भिस्त. हें अत्यंत नाजूक काम आपल्याकडे न देतां दुसऱ्यावर सोंपविलें तर आह्मांला पैलतीर कसें लाभेल? मधल्यामधेंच आह्मीं बुडून मरावें कीं काय?"

माधवरावजींनींहि आग्रह केला " ताराजी! बस्स, आज आपणच आमचे क्यान्टीनसार्जंट! आपल्याच हातून आज प्रसाद मिळाला पाहिजे."

एवढें झाल्यावर ताराजींनीं पुनः द्विरुक्ति केली नाहीं. मधुरस्मित करीतकरीत बाटली आणि ग्लास हातांत धारण केलें. कांहीं काल जिकडेतिकडे निःस्तब्ध झालें. केवळ मधूनमधून ग्लासें आणि बाटल्या यांचाच काय तो ठण्ठण् शब्द होत होता. लवकरच पंधरा वीस ग्लासें भरून तयार झालीं. " आप लीजिये, नहींनहीं आप लीजिये," च्या आग्रहांत सर्व ग्लासें ठणठणीत कोरडीं झालीं. पहिली आवृत्ति खलास होतांच लगेच दुसरी आवृत्ति निघाली. तीहि क्षणार्धांत पार उडून गेली. लगेच तिसरी चौथी–याप्रमाणें हां हां ह्मणतां कितीतरी आवृत्त्यांवर आवृत्त्या निघाल्या. रमणीगणामध्यें पहिल्यानें चारपांचजणी सुरापानास असंमति दर्शवीत होत्या. परंतु माधवरावजींनीं स्वतः उठून स्वहस्तानें पात्रें भरून त्या इष्टदेवतांच्या मुखकमलांसंनिध धरिलीं. भक्ताची एवढी श्रद्धा पाहतांच देवी तुष्ट होऊन त्यांची मनोवांच्छा पूर्ण करण्यास सज्ज झाल्या. मदिरापानास कोणाचीहि मग हरकत राहिली नाहीं.

प्रथमांक समाप्त होतांच द्वितीयांकास—गायनास प्रारंभ झाला. नौरोजी शेट स्वतः ह्मार्मोनियमवर बसले. रामरावांनीं तबला हातांत घेतला. सुंदरी मधुर कर्णरवानें गान करूं लागल्या—

" प्याला मुझे भरे दे: "

अहा! त्या वेळच्या अप्रतिम महदानंदाचें वर्णन कोणीं करावें! चाऱ्ही दिशा आनंदानें खवळून गेल्या होत्या. " ओहो! क्या बात-क्या बात! जीते रहो—

जीते रहो!" इत्यादि शब्दांनीं उद्यानभूमिका कंपित होऊन नभोमंडळहि दुमदुमून गेलें. मधूनमधून ग्लासांचे ठणूठणू आवाज होतच असत, युवयुवतींचें ओष्ठमीलनहि धडाक्यानें चाललेंच होतें. याखालींच दोन वाजून गेले. पक्कान्नें थंडगार होत चालल्यामुळें चाकरमाणसें अगदीं त्रासून गेलीं. शेवटीं हुसेनभट मोठा धीर करून स्वतः पुढें येऊन ह्मणाले "अन्न निवून गार होत आहे."

त्याबरोबर सुलेमानमियांची मिजास एकदम बिघडली. ते त्या ब्राह्मणावर धावून येऊन कांपतकांपत ह्मणाले "हरामजादा! गद्धेके अवलाद! आमच्या रंगाचा तूं भंग करतोस? पहात नाहींस तूं, इथें हीं सत्तर सत्तर राजांच्या संपत्तीच्या मोलाचें एकेक, अशीं बारा रत्नें प्रकाशत आहेत तीं? यांच्यापुढें काफर, त्या तुझ्या चॉप आणि कटलेटची काय पर्वा आहे? हें संपेल तेव्हां मग तिकडे पाहतां येईल. चल निघ इथून!"

इतर मंडळीहि दारूच्या निशेंत तर्र होऊन सुलेमानमियांनां "क्या बात है —क्या बात है!" करूं लागली. तें पाहून माधवराव ह्मणाले "अरे हुसेन! जा, तुझी तयारी असेल तर इथेंच सर्व घेऊन ये कसा."

"जो हुकुम खुदावंत," ह्मणत सलाम करीतकरीत हुसेनभट खाना आणण्यास गेले. लवकरच खाना येऊन पोहोंचला. परंतु मंडळींतील बहुतेक जण या वेळीं ' घालीन लोटांगण ' करीत होते. उठून बसण्याचेंहि कोणाच्या अंगीं त्राण राहिलें नव्हतें. अर्थात् महत्प्रयासानें आणि पुष्कळ द्रव्य खर्चून मुद्दाम तयार केलेल्या या खान्याचा आस्वाद घेण्यास ते बिचारे असमर्थ होते. सुंदराजी, ताराजीप्रभृति मंडळीपैकीं मात्र कोणाएकीलाहि इतकी निशा चढली नव्हती. कारण अशा समयीं या धूर्त विश्वयोषिता विशेष सावधपणानें मदिरापान करीत असतात. या रंगेल मंडळीला धुंद करण्याचाच त्यांचा प्रधान हेतु असतो. त्यांच्यापैकीं कोणींएकीनेंहि त्या म्लेंच्छानें विटाळलेल्या अन्नास स्पर्श केला नाहीं. कायते माधवराव आणि दुसऱ्या एकदोघांनीं त्याचा थोडाबहुत समाचार घेतला. शेवटीं सर्व अन्नसामुग्री कुत्र्यांच्या सेवेला अर्पण झाली! याप्रमाणें गार्डनपार्टीच्या द्वितीयांकाची समाप्ति झाली.

संध्याकाळीं तृतीयांकाला प्रारंभ झाला. यजमानांची—माधवरावाचा—स्वारी शय्यात्याग करून बाहेर येऊन बसली होती. अर्थात् इतर मंडळी जरी डुलक्या खात होती, तरी त्यांनांहि मोठ्या शिकस्तीनें उठून बसावें लागलें. निशासमय प्राप्त होण्याचाच अवकाश, चोहोंकडे दीपमाला प्रज्वलित होऊन जिकडेतिकडे

लखलखाट उडाला. माळी लोकांनीं जाई, जुई, मल्लिका, चमेली, मोगरा, निशिगंध, मदनबाणप्रभृति नानाविध सुगंधित पुष्पांचे मनोहर गुच्छ आणि रमणीय हार सिद्ध करून ठेविले होते, त्यांवर मंडळीचा हल्ला झाला. हांहां ह्मणतां ते गुच्छ आणि हार कोणाच्या हातांत, कोणाच्या गळ्यांत, कोणाच्या मस्तकावर तर कोणाच्या केशपाशांत शोभायमान झाले! पुनः सुरापानास सुरुवात झाली—सुधापानालाहि प्रारंभ झाला. तबलासारंगीप्रभृति वाद्यांच्या सुमधुर स्वरांचें संमीलन होऊं लागलें. त्या स्वरांबरोबरच तेथें जमलेल्या रंगेल युवयुवतींच्या मनोवृत्तींचेंहि संमीलन झालें.

अल्पकाळांतच सारंगी मधुरालाप करूं लागली. 'धिक् तान्—धिक् तान्!' तबल्यांतून ध्वनि उठूं लागला. हारमोनियम मोठमोठ्यानें सप्तसुरांत ओरडूं लागला. नर्तकीगणानें नृत्यारंभ केला. सुरांत सूर मिळून गेले—गुरफटून गेले. त्या वेळीं त्या रमणीगणाच्या पदसंचालनाबरोबर त्यांच्या नूपुरांचा होणारा मधुर झणत्कारहि या सौभाग्यशाली सुराबरोबरच मिळत होता. मग काय विचारतां, आनंदाचे फवारेच उडूं लागले! मंडळीचा कामाग्नि धडाडूं लागला. याप्रमाणें जवळजवळ दीड तास नृत्य चाललें. तदनंतर गायनास प्रारंभ झाला. मगतर जणों चोंहींकडे अग्निप्रळयच होऊन गेला!

समस्त मंडळी सुखसागरांत तरंगूं लागली. प्रत्येकाला वाटूं लागलें, आज आपण माधवरावांच्या उद्यानांत नसून इंद्राच्या नंदनवनांतच वास करीत आहों! दुपारीं कोणाचेंहि जेवण झालें नसल्यामुळें या वेळीं पोटांत भुकेनें अगदीं काहूर उठविलें होतें, तरीदेखील सुरादेवीच्या प्रसादानें हा कालपर्यंत मंडळीचा उत्साह कांहीं कमी झाला नव्हता; परंतु हा उत्साह टिकणारतरी कोठवर? रिकाम्या पोटीं मद्याची निशा चतुर्गुण वाढूं लागली. सर्वांना पूर्ण स्मृतिभ्रंश झाला. आस्तेआस्ते ग्लासें फुटूं लागलीं. त्या कांचांनीं अनेकांचे हात कापून त्यांतून रुधिरस्राव होऊं लागला. नंतरनंतर गायनवादनहि गोड लागेनासें झालें. सगळेच धुंद होऊन धांगडधिंगा घालूं लागले. कोणी कोणाचें ऐकेना—कोणी कोणाचें मानीना. सर्वच पूर्ण छाकटे बनलेले. शेंवटीं मारामारीवर वेळ आली. चाकरनोकरसुद्धां छाकटे झालेले—ती मारामारी सोडवावीतरी कोणीं?

क्रमाक्रमानें खुर्च्या टेबलें एकमेकांवर चढूं लागलीं. चित्रें, तसबिरा, आरसे फुटूं लागले. कोणाचा हात दुखावला, कोणाचा पाय चेंगरला, कोणाचें डोकेंच फुटलें, तथापि कोणाएकालाहि चैतन्य ह्मणून नाहीं. वारयोषितांबरोबर आलेले

त्यांचे साथीदार वस्तादजी होतेच. त्यांनीं ही महत्पर्वणी साधून या उन्मत्त झालेल्या संभावित मंडळीचीं घड्याळें, सोन्यारुप्याच्या सांखळ्या, आंगठ्या, खिशांतील पाकिटें वगैरेवगैरे ज्याच्या जें कांहीं तावडींत सांपडलें, त्यावर हात मारून त्या रमणींनां घेऊन तेथून पलायन केलें. इकडे रक्तबंबाळ होऊन ही शोकीन मंडळी भूमीवर गडबडां लोटांगण घालीत राहिली.

---

## प्रकरण सत्ताविसावें.

### आत्महत्येचा प्रयत्न.

प्रातःकाळीं एक नोकर येऊन माधवरावांनां जागृत करून घाबऱ्याघाबऱ्या सांगूं लागला " चला चला लौकर ! वहिनीबाईनीं कसलंसं एका बाटलींतलं औषध खाल्लं, अन् आतां डोळे फिरवीत बेशुद्ध पडल्या आहेत. आपल्याला लवकर बोलावलं आहे. "

वहिनीबाई दुसरी कोण असणार ? हतभागिनी मनोरमाच ! गेल्या रात्रीं झालेल्या धुमाकुळीनें माधवराव फार श्रमित होऊन गेले होते. तरीहि असली भयंकर बातमी ऐकतांच ते एकदम चरकले व त्या रंगेल मंडळीस तेथेंच सोडून तडक घरीं आले. आल्यावरोबर त्यांच्या दृष्टीस जो विलक्षण देखावा दिसला त्यानेंतर ते स्तंभितच होऊन गेले. त्यांनीं पाहिलें, मनोरमा आसन्नमरणावस्थेंत असून तिची मुखश्री विकट झाली आहे, दृष्टि ऊर्ध्व झाली आहे, डोळे ताठरले आहेत, शुद्धि मुळींच राहिलेली नाहीं. त्यांनीं आणखीहि पाहिलें, बिचारीच्या तोंडांत एक पाण्याचा थेंबसुद्धां कोणी घालीत नाहीं, कीं तिला सावध करण्याचाहि उपचार करीत नाहीं. उलट आपली ज्येष्ठ भगिनी गंगाबाई अद्यापिहि मोठमोठ्यानें गर्जना करीत तिला मर्मभेदक वाक्प्रहार करीत आहे. " × × कपाळकरंटी, अवदसा ! काम करायला नको, सारा दिवस निजायला पाहिजे ह्मणून हीं सारीं ढोंग बरं ! भाताचे गोळे गिळतांना नाहीं कांहीं वाटत ! खादाड राक्षसीण कुठली.—अग तुला कुठलं यायला मरण इतक्या लवकर ? तूं मेलीस ह्मणजे मग आमचीं हाडं रात्रंदिवस कोण खिळखिळीं करील ? तुला मरणाचीचं इतकी हौस असली तर मर बाई-खुषाल मर हो, मी माझ्या भाऊचं दुसरें लगीन करीन नी सुटेन तुझ्या हातून एकदांची ! "

वरील हृदयद्रावक देखावा प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहातांच आणि त्याच्या जोडीला आपल्या बहिणीची ती मर्मभेदक भर्त्सना कानांनीं ऐकतांच माधवरावांनां पत्नीची

एकदम करुणा आली. त्यांचें अंतःकरण गहिंवरलें. असा देखावा डोळ्यांनीं पाहिल्यावर कोणाचें बरें अंतःकरण द्रवणार नाहीं? या करुणावेगाबरोबरच माधवरावांना आपल्या बहिणीचा पराकाष्ठेचा रागहि आला. ते संतप्त होऊन म्हणाले "ताई, दयामाया राहिली, पण तुला कांहींतरी अक्कल, लोकलज्जातरी आहे काय? पाषाणापेक्षांहि का तूं पाषाण आहेस? दुष्टे, तुझें हृदय जर पाषाणाचें नसतें तर मनुष्याचा प्राण चालला आहे हें तूं आपल्या डोळ्यांनीं पहात असतां त्याला वांचविण्याचा यत्न करणें बाजूला ठेवून उलट त्या मेलेल्या मढ्यावर असे शस्त्राचे घाव तुझ्यानें घालवले नसते! चांडाळणी! खचीत खचीत तुझ्या असह्य छळणुकीनेंच ही विष खाऊन मरत आहे. तूंचतर हिच्या मृत्यूला कारण आहेस. चल नीघ इथून, तोंड दाखवूं नकोस."

भावाकडून—भावाकडूनच कां, कोणाकडूनहि आजन्मांत चकारशब्द ऐकून न घेतलेल्या गंगाबाईंना आज सर्वांसमक्ष झालेला आपला हा अपमान किती असहनीय झाला, त्याचें वर्णन करणें दुःसाध्य आहे. गंगाबाई क्रोधानें ज्ञानशून्य होऊन चीत्कार करूं लागल्या "तूं मेल्या आज दारूबिरू पिऊन मस्त झाला आहेस वाटतं? वायकोचा कैवार घेऊन भांडायला तुला कांहीं लाजलज्जा आहे रे! इतका पैसा खर्चून तुला जें लिहिणंवाचणं शिकविलं, लहानाचा मोठा केला, त्याचे मेल्या हे असे उपकार फेडतोस होय? आग लागो त्या तुझ्या शिकण्याला नी—"

माधवराव या वेळीं बहिणीच्या रागाची यत्किंचितहि पर्वा न करितां किंवा तिच्या बडबडीकडे तादृश लक्ष्य न देतां मोठ्या तांतडीनें मनोरमेला सावध करण्याच्या उद्योगास लागले. आपल्या हातांनीं तिच्या डोळ्यांवर आणि तोंडावर पाणी शिंपडून पंख्यानें तिला वारा घालूं लागले. इतक्यांत सदूभाऊहि डॉक्टरला घेऊन आले. मनोरमेची नाडी पहातांच आणि तिनें प्राशन केलेल्या औषधाच्या बाटलीचा वास घेतांच डाक्टरचें तोंड उतरलें. बरोबर तयार करून आणलेलें औषध त्यांनीं तत्क्षणींच मोठ्या कष्टानें मनोरमेच्या तोंडांत घातलें आणि जातेवेळीं सांगून गेले "मला फार उशिरां बोलाविलें. यांतून ही निभावण्याचा संशयच दिसत आहे. पाव तासाच्या आंत या दिलेल्या औषधानें जर का वांति झाली तर यदाकदाचित् ही वांचली तर वांचेल. हिला आतां उठवून बसवा. बिलकूल निजूं देऊं नका व पाव तासानें प्रकृतिमान कसें काय आहे तें मला कळवा."

डाक्टरचें याप्रमाणें भाषण ऐकून सर्वांनां अत्यंत दुःख झालें. परंतु गंगाबाईच्या आनंदाला मात्र पारावार राहिला नाहीं. मनोरमा मरावी म्हणून तिनें मनांतल्या मनांत जोखाई, अंबाईला नवसदेखील केला आणि ती तेथून दुसरीकडे निघून गेली. परंतु पार्वतीबाईनीं पुढें होऊन मनोरमेला उठवून बसविलें, इतकेंच नव्हे, या वेळीं त्यांच्या डोळ्यांत दोनचार आंसवेंसुद्धां आलेलीं दिसलीं. सदूभाऊंचाच हा उपदेश अवश्य असला पाहिजे. मनोरमेसाठीं आज माधवरावांचें हृदय अगदीं पहिल्यानें व्यथित झालें. आतां अर्थात् दुसरीं सगळींहि मनोरमेची शुश्रूषा करूं लागलीं. सुदैवानें अल्पकाळांतच मनोरमेला वांति झाली. ही वांति जरी अगदींच अल्प होती, तरीहि तीमुळें कितीतरी आशा वाटूं लागली.

मनोरमेसाठीं सर्वांपेक्षां सदूभाऊ फार दुःखित झाले. कारण तिला रात्रंदिवस कसा दुःसह छळ सोसावा लागत होता, हें त्यांनां पूर्णपणें माहीत होतें. परंतु त्या बाबतींत अवाक्षरहि उच्चारण्याची त्यांची प्राज्ञा नव्हती. तरी आपली पत्नी पार्वतीबाई हिचा मात्र ते अनेकवार तिरस्कार करीत. आणि म्हणूनच निदान बाह्यवर्तांतरी पार्वतीबाई मनोरमेचा फारसा छळ करीत नसत. मनोरमेसाठीं आज सदूभाऊंचा जीव अगदीं कासावीस होऊं लागला. या हृदयद्रावक प्रसंगाची बातमी पहिल्यानें त्यांनांच लागली. त्याबरोबर माधवरावांला ती हकीगत कळविण्याकरितां त्यांच्याकडे एका गड्याला पिटाळून आपण धावतच डाक्टरच्या घरीं गेले. सदूभाऊंच्या कानांवर जर का ही गोष्ट आली नसती, तर बिचाऱ्या मनोरमेची चिकित्सादेखील होतीना; ती निःसंशय देहमुक्तच झाली असती.

अल्पकालानें पुनः अधिक परिमाणानें दुसरी एक वांति झाली. वांतीबरोबर विषाचा बहुतेक भागहि बाहेर पडला. मनोरमेला किंचित् चैतन्य झालें. पुनः डॉक्टरला बोलावणें पाठविलें. रोग्याच्या नाडीचें वगैरे पुनः परीक्षण करून डॉक्टर म्हणाले "आतां विशेष धास्ती राहिली नाहीं. तरीदेखील मोठ्या सावधपणानें हें औषध बरोबर एकेक तासाच्या अंतरानें इच्या पोटांत गेलें पाहिजे."

काळाच्या दाढेंतून रोगी वांचण्याची आशा आतां खरोखरच वाटूं लागली. मनोरमा आपले विशाल नेत्र उन्मीलित करून अनेक क्षण चोहींकडे विस्मित दृष्टीनें पहात राहिली. या वेळीं जणों ती मनोरमा नव्हतीच! तिला आतां कसलीहि लाजलज्जा म्हणून राहिली नव्हती. इतक्यांत सदूभाऊ औषध पाजण्यास गेले. परंतु मनोरमा कांहीं केल्या औषध घेईना. सदूभाऊ म्हणाले "यमू! कां बरें तूं असा हट्ट करतेस? घे हें औषध. औषध घेतल्याविना आराम कसा बरें वाटेल?"

डोळे टवकारून मनोरमा अनेक क्षण सदूभाऊंच्या तोंडाकडे पहात राहिली. तिच्या त्या शुष्क ओष्ठावर स्मित दिसूं लागलें. तें स्मित पाहून समस्त विस्मितच झाले. सर्व मंडळी अचलदृष्टीनें मनोरमेच्या मुखाकडे पहात आहे, इतक्यांत तोच ओष्ठ पुनः हालला; परंतु आतां तें हास्य राहिलें नव्हतें. बालिका मृदु मंदस्वरानें ह्मणाली "मला औषध नको, मी बरी व्हायची नाहीं; मला जगण्याची इच्छा नाहीं."

सदूभाऊ ह्मणाले "छे छे, वेडी कुठली! असें भलतेंच काय बरें बोलतेस?"

"दादा! मजसारख्या हतभागिनीला मरणच चांगलं. मी—"

बालिका आणखी कांहीं बोलूं इच्छीत होती, परंतु तिच्यानें पुढें बोलवेना. नेत्रावाटे अविरल अश्रुधारा वाहूं लागल्या. गळा दाटून आला. सदूभाऊंनीं आपल्या वस्त्राच्या पदरानें तिचे अश्रु पुसून काढिले. मनोरमा गहिंवरून ह्मणाली "दादा बघ, मी तुझ्या पायां पडल्यें, माझ्या मरणाआड तूं येऊं नकोस."

पुनः तिचें शांतवन करून सदूभाऊ ह्मणाले "या एवढ्या वयांत तूं मरणाची इच्छा कां करतेस यमू! तुझा हा सोन्यासारखा संसार असतांना तूं काय ह्मणून मरण इच्छितेस?"

बालिकेच्या शोकसमुद्राला जणों एकदम भरती आली. दुःसह यातनांचें स्मरण होऊन ती अगदींच अस्थिर झाली. मुखावाटे शब्द निघेना. दोन्ही गालांवरून अजस्र अश्रुधारांचा पूर वाहूं लागला. तिच्यानें का या वेळीं सदूभाऊंच्या वरील प्रश्नाचें उत्तर देववणार? आपला कृश हस्त तिनें आस्तेआस्ते वर नेऊन कपाळावर ठेविला व आकाशाकडे दृष्टि केली आणि यानेंच त्या प्रश्नाचें उत्तर देऊन टाकिलें. हाय! त्या उत्तरानें समस्तांचे प्राण व्याकुळ करून सोडिले. सदूभाऊंनांतर रडूंच कोसळलें. रडतरडतच ते माधवरावांस ह्मणाले "माधवराव! तुह्मीच–तुह्मीच हो या सर्वनाशाचें कारण. आजदिवसपावेतों तुमच्या बहिणींकडून होत असलेला असह्य छल, अत्याचार बापडी निमूटपणें सहन करीत आली. कधींहि हूं कीं चूं करतांना तिला कोणीं पाहिलें नाहीं. परंतु माधवराव, आपल्याकडून होत असलेला तिरस्कार मात्र तिला सहन करतां आला नाहीं. या प्रसंगीं तुह्मी जर तिला आग्रह करणार नाहीं, तर ती कोणाच्याहि सांगण्यानें औषध घेणार नाहीं. समोर स्त्रीहत्या घडत आहे. याउपर तुमच्या मर्जीस येईल तें करा." असें ह्मणून सदूभाऊ किंचित् दूर सरले.

## आत्महत्येचा प्रयत्न.

माधवरावांचें हृदय कांहीं पाषाणनिर्मित नव्हतें. त्यांचा कंठ सद्गदित झाला. विषण्णवदनानें त्यांनीं प्रश्न केला "मनोरमे ! खरेंच, माझ्या अवहेलनेमुळेंच का तुला जिवाचा कंटाळा आला ?"

मनोरमा आतां अज्ञान बालिका नव्हती. एवढ्या मंडळीसमक्षदेखील तिला आतां बोलण्याला धीर आला होता. पदरानें अश्रु पुसून ती ह्मणाली "मला होत असलेल्या यातनांची आपल्याला कल्पनाहि नाहीं, ह्मणून तर आजवर मला मरतां आलें नाहीं. विष खाण्यापूर्वी केवळ हीच दुःसह गोष्ट अनेकवार माझ्या मनांत येत होती. स्त्रियांनां यापरतं अधिक दुःख तें काय आहे ? ही गोष्ट आपल्याला समजावतां येईल, मला होत असलेल्या भयंकर दुःखाचा एक शतांशहि जर का आपल्याला समजावतां येईल, तर मग या पृथ्वींतील दुसऱ्या कोणत्याहि सुखाची मी पर्वा करणार नाहीं. आजच्या या माझ्या मृत्यूनं जर तें कार्य होईल, तर माझ्या सुखाला सीमा रहाणार नाहीं !"

ही बालिका एवढ्या गोष्टी शिकली कोठून ? समस्त मंडळी स्तब्ध, विस्मित होऊन गेली. माधवरावांनां स्वप्नांतसुद्धां कधीं याची कल्पना झाली नव्हती. परंतु पत्नीच्या तोंडून या वेळीं हें सगळें ऐकून त्यांनां आनंद झाला नाहीं. हा वेळपर्यंतहि त्यांनां वाटत होतें, कीं, केवळ मनोरमेच्याच दोषानें आपल्या विमल चरित्रास आपण काळिमा लाविला ! कसेंहि असो, ते ह्मणाले "दैवांत होतें तें होऊन गेलें, आतां तूं हें औषध घे."

असें ह्मणून माधवरावांनीं औषधाचें पात्र मनोरमेच्या मुखाजवळ नेलें. मनोरमा कंपित स्वरानें ह्मणाली "आपल्याला एकवार पाहिल्यावर आतां का मला मरावंसं वाटेल ? आपण पति, मला साक्षात् देवता, आपलं सांगणं का माझ्यानं अमान्य करवेल ?" असें ह्मणून तिनें तें औषध प्राशन केलें.

इतक्यांत माधवराव ह्मणाले "आत्महत्या करणें हें महत्पाप आहे. आत्महत्या करणारा खरोखरच नरकांत पड—"

मनोरमेला आज अकस्मात् वाचा फुटली होती. आजवर तिला इतकी बोलतांना कोणींहि पाहिलें नव्हतें. ती मध्येंच ह्मणाली "परंतु जी पापिणी पतिसुखाला वंचित झाली, तिच्या पातकाला आत्महत्या हेंच योग्य प्रायश्चित्त नाहीं काय ?"

मनोरमेच्या तोंडासमोर उभें रहाण्याची आज कोणाची प्राज्ञा होती ! आतल्याआंत एकसारखें जळूनजळून बालिकेचें हृदय दग्ध झालें होतें. तिच्या

दग्ध हृदयावर आज बिंदुमात्र जलाचें सेचन झालें. हृदयाचा स्रोत-प्रवाह इतके दिवस बद्ध झाला होता, तो आज बांध फोडून एकदम बाहेर पडला. फवाऱ्याचें तोंड बहुकाल बंद होतें, आज अकस्मात् तें कोणींतरी मोकळें केलें. मनोरमेच्या जीवनरूपी नाटकांतील आज एका नवीन अंकाला आरंभ झाला. तिनें आज आपल्या मनांतील अनेक गोष्टी अगदीं उघडपणें पतीपाशीं प्रगट केल्या. माधवरावांची पक्की खात्री होऊन चुकली, कीं, बिचाऱ्या मनोरमेचा कांहींएक दोष नाहीं. सर्व दोषांचें मूळ, सर्व दोषांची खाण, आपली ती सर्वगुणालंकृता भगिनी गंगाबाईच होय.

मनोरमेचा अपमृत्यु तर टळलाच. परंतु गंगाबाईकडून होणारी तिची जाचणूक मात्र अद्यापिहि कमी झाली नव्हती. मनोरमेचा गुप्त रीतीनें छल करण्याकरितां गंगाबाई नानातऱ्हेच्या नूतन नूतन उपायांचें अवलंबन करीत; परंतु असहायांचें साहाय्य, दुर्बलांचें बल, अनाथांचा नाथ जो सर्व विपद्भयभंजन भगवान्, त्याची हल्लीं मनोरमेवर पूर्ण कृपादृष्टि झाली असल्यामुळें आतां कांहींच गुप्त ह्मणून रहात नसे; सगळ्या गोष्टी उघडकीस येत. कारण, आतां पार्वतीबाईपर्यंत सर्व मंडळी मनोरमेच्या पक्षाची झाली होती. प्रायः प्रतिदिनीं घडणारी लहानमोठी प्रत्येक गोष्ट माधवरावांच्या कानांवर जाई. परंतु या गोष्टीबद्दल गंगाबाईंना ते अवाक्षर सुद्धां बोलत नसत. गंगाबाई मात्र आपल्या स्वभावानुसार भावाला परोक्ष दुर्वाक्यें बोलत असत. शेवटीं एक दिवस अगदींच विरक्त होऊन माधवरावांनीं मनोरमेला तिच्या माहेरीं पाठविण्याचा विचार केला व त्याच दिवशीं तो तिच्या कानांवर घातला.

माधवरावांचा चरित्रदोष अद्यापि गेला नव्हता. या दोषानें एकदां का मनुष्यचरित्राला स्पर्श केला ह्मणजे अशा एकाद्याच गोष्टीनें का तो जावयाचा आहे? चांगलेच डोळे उघडले पाहिजेत. परंतु माधवराव जरी आतांहि सगळ्या रात्रभर घरीं नसत, तरीहि मनोरमेशीं एकांतामध्यें त्यांची वारंवार भेट होई आणि त्या प्रसंगीं ते तिच्याशीं फार प्रेमानें वागत. आणि तेवढ्यांतच मनोरमा अपार आनंद मानी. आजहि अशीच गांठ पडली होती. जवळ दुसरें कोणीहि नाहीं, असें पाहून माधवरावांनीं आपल्या मनांतील विचार पत्नीला कळविला. मनोरमा नम्र वाणीनें ह्मणाली "माझ्यासाठीं मोठ्या वन्संजवळ कां बरें धुसफुस करायची? त्यांच्या बोलण्याचं मला कांहींएक वाटत नाहीं. दिवसांतून एकदांच जरी आपल्या पायांचं मला दर्शन होईल, तर याहूनहि खाष्ट अशा शंभर नणंदांची बडबड

नि टोमणे सोसूनहि मी सुखानं राहूं शकेन. नाहीं गडे मी बाबांकडे जायची आपल्याला सोडून!"

पत्नीचें हें अत्यंत सरल, प्रेमदर्शक भाषण ऐकून माधवराव खिन्नस्वरानें ह्मणाले "हाय हाय मनोरमे! तुझ्या या गंभीर प्रणयकथा त्या वेळीं कुठें बरें गेल्या होत्या? तुझ्या मुखांतून एकतरी प्रेमाचा शब्द यावा ह्मणून त्या वेळीं मीं किती धडफड केली? आतां वेळ निघून गेल्यानंतर या दुर्बल, कलंकित हृदयामध्यें तुझा हा प्रबल प्रणयावेग मला कसा धारण करतां यावा? तुजवर प्रेम करण्यासाठीं मी केवढा प्रयत्न करीत आहें–नव्हे तुजवर प्रेमहि करीत आहें, तरीहि ह्या वेळपावेतों सर्वस्वीं तुझाच असा कांहीं मी होऊं शकलों नाहीं. जितकाजितका मी प्रयत्न करितों, तितकातितका तो विफल होतो. तूं तुझ्या बापाच्या घरीं गेलीस ह्मणजे मागाहून मीहि तिकडेच येतों. या लोभाला गुंतून इथेंच राहीन तर यांतून सुटण्याची मुळींच आशा नाहीं. तुला माहेरीं पाठविण्याचें खरें कारण ह्मणशील तर हेंच."

बालिकेच्या कोमल गालांवरून आनंदाश्रु वाहूं लागले. तिच्या दैवीं इतकें का सुख होतें? तिच्या मनांत एकदम एका सुखद कल्पनेचा उदय झाला. मनोरमेनें कंपित हृदयानें, करुणस्वरानें विनंति केली "मग गडे, मला बरोबरच घेऊन चलायचं. जिथं आपण तिथंच स्वर्ग."

माधवराव उच्चस्वरानें ह्मणाले "काय? जिथें मी तिथें स्वर्ग! अगदींच खोटें. उलट जिथें मी, तिथें भयानक रौरव नरकच असेल! मीतर नरकांतील एक कीटक आहें. या जगांत माझ्यासारखा अधमाधम कोण आहे?"

"माझीतर पक्की खात्री आहे, कीं, पतिविना स्त्रीला अन्य स्वर्ग असूं शकणार नाहीं. स्वर्ग कसा असावा याची कांहीं मला कल्पना नाहीं. परंतु तो आपुणाव्यतिरिक्त असेल, तर मी स्पष्ट सांगत्यें, कीं, तो स्वर्ग कांहीं मला नको आहे, मला आपला आपल्याबरोबर नरकच पुरवला."

माधवराव स्तंभितच झाले. हीच काय त्यांची ती पूर्वीची मनोरमा! बराच वेळ स्तब्ध राहून नंतर ते ह्मणाले "मनोरमे! हें तूं काय बोलत आहेस? तुला ठाऊक नाहीं काय? मी घोर पातकी आहें; माझी मला स्वतःलाच लज्जा वाटते. अशा पापी, नीच, अधमाधम पतीचा तूं तिरस्कार करीत नाहींस?"

"ज्या दिवशीं आपला तिरस्कार करण्याची मला बुद्धि होईल—देव करो नि तत्पूर्वीच माझा अंत होवो. आपल्या जरी शेंकडो दासी असल्या, तरीदिखील

मी एक त्यांतलीच आहें, असं आपण मानून घेतलं ह्मणजे मला पुरे आहे. मी आपले चरित्रदोष पाहूं इच्छीत नाहीं आणि मला ते कुणीं दाखवूंहि नयेत. ज्या दिवशीं आपले दोष पहाण्याची मला इच्छा होईल—ईश्वर करो आणि तत्पूर्वी माझी दृष्टि अंध होवो. आपण मजवर सांप्रत जें प्रेम करीत आहां, त्याहून अधिक मी कशाचीहि आशा करीत नाहीं. मजबरोबर आपणहि या, अशी मी जी आपल्याला विनंति करीत आहें, त्याचं कारण एवढंच, कीं, माझ्या आईला नि बाबांला आपल्या भेटीचा अगदीं ध्यास लागला आहे. तीं बिचारीं गरीब माणसं, आपल्याला घेऊन जाण्याचं त्यांनां कांहीं सामर्थ्य नाहीं; तेव्हां माझ्याबरोबरच जर इकडूनहि यायचं झालं, तर त्यांनां किती बरं आनंद होईल?"

"स्त्रियांचें प्रेम इतकें निःस्वार्थ असूं शकेल, असा माझा कांहीं विश्वास नव्हता. मनोरमे ! तूं सध्यां जा, तूं बिलकूल चिंता करूं नकोस. तुझ्या मागोमाग सात-आठ दिवसांच्या आंतच मी तिकडे येतों. सध्यां इकडे कामाची अगदीं गर्दी उडून गेली आहे, गेल्यासारखें चार दिवस राहिलेंतर पाहिजे; मग इकडचें काम असेंच अर्ध्यावर टाकून कसें बरें येतां येईल ?"

मनोरमे, सावध रहा बरें ! दैवबलानें पुनरपि लाधलेला हा ठेवा, पुनः दृष्टीआड करूं नकोस बरें ! परंतु हाय, मनोरमा आतां कोठली ऐकायला ? ती ह्मणाली "आपल्याला जें बरं दिसेल तेंच करावं. मी केवळ पोर, अज्ञान आहें, मला काय सगळ्या गोष्टी आपल्यासारख्या समजायच्या आहेत ?"

सरलहृदया बालिका, सरल मनानें सरल गोष्टच बोलली. पतीची अनुमति मिळतांच प्रफुल्ल चित्तानें ती माहेरीं निघून गेली. कोणालातरी त्या वेळीं वाटलें होतें काय, कीं, याच गोष्टीमुळें पुढें मोठा अनर्थ ओढवणार आहे ह्मणून ?

---

## प्रकरण अठ्ठाविसावें.

### गंगाबाईचें उग्र स्वरूप.

मनोरमा माहेरीं निघून गेल्यावर गंगाबाईच्या क्रोधाला सीमाच राहिली नाहीं. मनोरमेच्या पाठवणीसंबंधीं तिला कोणींहि एका शब्दानेंसुद्धां विचारलें नव्हतें. अशा प्रकारची अवहेलना गंगाबाईनीं आजन्मांत कधींहि अनुभविली नव्हती. त्यांचें तें अखंड प्रभुत्व इतक्या दिवसांनीं आज भंग पावलें. त्यांच्या त्या असाधारण गर्वाचें इतक्या दिवसांनीं आज पाणीपाणी झालें. हा सर्व प्रकार त्यांनां अगदींच असह्नीय झाला. मनोरमेनें विषप्राशन केल्या दिवसापासून गंगाबाईच्या

## गंगाबाईचें उग्र स्वरूप.

हृदयामध्यें याप्रमाणें जरी प्रचंड वादळ उद्भवलें होतें, तथापि बाहेर या भयंकर तुफानाचें कांहींएक चिन्ह दृग्गोचर होत नव्हतें. गंगाबाई आंतून जरी अत्यंत क्रुद्ध झाल्या होत्या, तरीहि महाप्रलय होण्यापूर्वी प्रकृति ज्याप्रमाणें शांतभाव धारण करिते, त्याचप्रमाणें कित्येक दिवसांपासून गंगाबाईनीं बाह्यवर्ती तसाच शांतभाव धारण केला होता.

मनोरमा माहेरीं निघून गेल्या दिवसापासूनच गंगाबाईची वृत्ति एकदम बदलली. पहिल्यानें त्यांचा पितृशोक अनावर होऊन उठला. पित्यासाठीं त्यांनीं अनेकक्षण उच्चस्वरानें क्रंदन केलें. परंतु अरेरे ! पूर्वीप्रमाणें कोणीएकसुद्धां त्यांचें शांतवन करण्यास आलें नाहीं. नाहीं ह्मणावयाला धाकटी बहीण पार्वतीबाई यांनीं मात्र एकदोन शब्दांनीं त्यांचें समाधान करण्याचा किंचित् प्रयत्न केला. असा प्रकार असल्यामुळें बिचाऱ्या रडणारतरी कोठवर ! शेवटीं आपल्याआपणच गप राहिल्या. तदनंतर त्यांनीं आपलें पूर्वस्वरूप धारण केलें. कोणापाशीं कांहींएक न बोलतां गंगाबाई घरांतील वस्तूंवरच आपला सर्व राग काढूं लागल्या. भांडींकुडीं ताटेंवाट्यांची आदळआपट करण्यास आणि डाळतांदूळ, तेलतूप यांची नासधूस करून तीं फेंकून देण्यास त्वारीनें प्रारंभ केला. याप्रमाणें गंगाबाई नाना प्रकारें अत्याचार करूं लागल्या. बरेच दिवसपावेतों माधवरावांनीं हें सर्व निमूटपणें सहन केलें; परंतु बहिणीचे हे चाळे त्यांनां आतां अगदींच असह्य झाले. यापुढें आपण स्वस्थ राहिलों तर संसाराची धडगत नाहीं, असें पाहून एक दिवस माधवराव गंगाबाईनां ह्मणाले "ऐकलेंस, तुझे हे ढंग याउपर आपल्याच्यानें कांहीं सहन होत नाहींत."

गंगाबाई वाघिणीसारख्या चवताळून उच्चस्वरानें ह्मणाल्या "खरंच रे बाबा, तुलातरी मी आतां कशी दृष्टीसमूर हवीशी वाटेन ? तूं आतां पक्का बायकोच्या आधीन होऊन बसला आहेस. तो तुझा भिकारडा काळतोंडा सासरा, नी ती अवदसा सासू, यांनीं मेल्यांनीं तुला खरोखरच कांहींतरी जादुटोणा केला आहे. मेल्यांचा सत्यनाश—कुळक्षय होओ ! माझ्या तावडींत सांपडूं दे मेल्यांनां, केरसुणींनं डोचकींच फोडून टाकलें !"

माधवराव अत्यंत संतप्त होऊन ह्मणाले "तुला मी एकदां सांगून ठेवतों, कीं, तूं मला वाटेल तेवढ्या शिव्या दे; माझ्या बायकोचाहि पाहिजेतर हवातसा उद्धार कर, मी त्याबद्दल तुला कांहींएक बोलणार नाहीं; परंतु त्या बिचाऱ्या वृद्धांनां नाहक शिवीगाळ करूं नकोस. त्यांनां अपशब्द बोललीस तर खचीत तुझें कधींहि चांगलें होणार नाहीं."

"काळतोंड्या! बाइलबुद्ध्या! मेल्या तुला कांहीं लाजलज्जा आहे कीं नाहीं? सासूसासऱ्यांचा पक्ष घेऊन मेल्या माझ्याशीं भांडण करायला आलास, त्या तुला कांहीं शरमतरी? थूः तुझ्या तोंडावर! मेल्या नरकांत पडशील नरकांत! त्या डाकिणींनीं तुला भुरळ घातली होय? गळफांस घेऊन जीव दे मेल्या!"

"हल्लींच्या स्थितींत खरोखर गळफांस घेऊन मरावें, हेंच उचित आहे. परंतु चांडाळणी! त्याच्या आधीं तुझें काळें तोंड या जगांतून नाहींसें होणें हें अत्यंत आवश्यक आहे. दुष्टे! तूंचतर माझा सर्वस्वीं नाश करण्याला कारण झालीस. तुझ्यामुळेंच मी धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांनां अंतरलों. संसार बुडाला, सुखाला आंचवलों, सर्वांनां मुकलों. तूंच-तूंच आधीं मरावेंस हेंच—"

"मेल्या, माझ्या जिवावर उठलास होय? तुझा कुळक्षय होवो मेल्या! जळलं मेल्याचं तोंड! बरं आहे, ही पहा तुझ्या संसाराला आग लावून मी चालल्यें. पाहीन आतां मी मेल्यावर मेल्या तुला केवढं सुख मिळतं तें."

ती मूर्तिमंत चांडाळीण उग्र स्वरूप धारण करून क्रोधानें थरथर कांपतकांपत आपलें किडूकमिडूक आणि चिरगुटपांघरूण गुंडाळून घेऊन आणि जें जें कांहीं समोर दिसेल त्याचा विध्वंस करून तत्क्षणीं घरांतून बाहेर पडली. सर्व मंडळी अगदीं नष्टबुद्धच झाली. गंगाबाईचें कोणींहि निवारण केलें नाहीं. त्या सर्वप्रलय-कारिणी मूर्तिसन्मुख जाण्याचें कोणाला साहसच झालें नाहीं.

त्या दिवशीं गंगाबाईचा कांहींएक तपास लागला नाहीं. दुसऱ्या दिवशीं बातमी लागली, कीं, गंगाबाईनीं आपल्या मावशीच्या घरीं वास्तव्य केलें आहे. या एकंदर प्रकारानें माधवरावांचें मन अत्यंत खिन्न झालें आणि त्या खिन्न मनास प्रफुल्ल करण्यास्तव ते पुनः ताराजींनां अनन्यभावेंकरून शरण गेले. पुनश्च सुरापान सुरू झालें, मित्रगण गोळा झाले, आणि पुनः बिचाऱ्या मनोरमेचें कपाळ फुटलें! एक आठवड्यानें माधवराव श्वशुरगृहीं जावयाचे होते, त्या एका आठवड्याच्या जागीं चार आठवडे लोटले, तरी माधवरावांनां कांहीं आपल्या वचनाचें स्मरण झालें नाहीं. मधूनमधून त्यांनां जेव्हां आपल्या सरलहृदयी निर्दोष पत्नीची आठवण होई, तेव्हां मात्र तिच्यासाठीं त्यांचा प्राण व्याकुळ होत असे. परंतु ही स्थिति अगदीं क्षणिक असे. क्रमाक्रमानें त्यांनां मनोरमेचें अज्जीच विस्मरण झालें. याप्रमाणें सहा महिने केव्हांच संपून गेले. माधवरावजींचें नंतर कांहीं श्वशुरालयीं जाणें झालें नाहीं.

---

## प्रकरण एकोणतिसावें.

### दहा हजारांचा चेक.

क्रमाक्रमानें पितृधन संपुष्टांत येत चाललें. धंदाहि बरोबर चालत नव्हता. खर्च मात्र दांडगा. अर्थात् पैशाची मोठीच टंचाई पडूं लागली. पैसा नाहीं, व्यसनतर चाललें पाहिजे, तेव्हां धर्माधर्माचें भय न धरितां वित्तार्जन करण्याला माधवराव प्रवृत्त होऊं लागले. कोणाचाहि दाब राहिला नाहीं ह्मणजे चंचलवृत्ति मनुष्यांनां धर्माधर्माची आणि पापपुण्याची चाड कसची रहाते? बऱ्यावाईट कोणत्याहि का मार्गानें होईना, द्रव्यलाभ झाला ह्मणजे माधवरावांनां संतोष होई; आणि या पैशावरच त्यांचीं व्यसनें चालत. त्यांच्या मानसिक स्थितींत जें कांहीं थोडेंबहुत परिवर्तन झालें होतें, त्या वेळींच जर का ते पत्नीबरोबर आपल्या श्वशुरालयीं गेले असते, तर क्रमाक्रमानें त्यांची कुसंगापासून मुक्तता होऊन ते पुनः सत्पथाला येऊन मिळाले असते. परंतु दैवयोग कांहीं निराळाच होता. कर्मानुसार बुद्धि झाली, हेंच खरें.

अशाखालींच सरासरी एक वर्ष खलास झालें. होतांहोतां माधवरावांच्या पापकर्मांचा कडेलोट झाला. आतां त्यांनां कसलाच विधिनिषेध राहिला नाहीं. 'बुडत्याचा पाय खोलांत' तशी त्यांची अवस्था झाली. एकाहून एक भयंकर पापकर्में त्यांच्या हातून घडूं लागलीं. अशा स्थितींत एके दिवशीं सकाळींच माधवरावांच्या वाड्याला चाऱ्ही बाजूंनीं अकस्मात् पोलिसाचा गराडा पडला. एक पोलिसइन्स्पेक्टर आणि गुप्त पोलिसांतले एकदोन कामदार एकाएकीं वाड्यांत घुसले. या वेळीं माधवराव आणि सदूभाऊ उभयतांहि दिवाणखान्यांत बसले होते. बाहेर गडबड होतांच सदूभाऊ खडबडून उठले व काय प्रकार आहे याचा तपास करण्याकरितां बाहेर आले. इकडे माधवराव पळून जाण्याला मार्ग पहात होते; परंतु त्यांच्या या चेष्टा व्यर्थ झाल्या. पोलिसचे कामदार दिवाणखान्याच्या दारांत येऊन थडकले आणि कर्कश स्वरानें दरडावून विचारूं लागले "माधव रामचंद्र सहस्रबुद्धे आणि सदाशिव जनार्दन दीक्षित, कोणाचीं नांवें?"

बिचाऱ्या सदोबांच्या मनांत कसलेंच पाप नव्हतें. त्यांनीं मुळींच न भितां उत्तर दिलें "माझेंच नांव सदाशिव दीक्षित आणि हे माधवराव सहस्रबुद्धे!"

इन्स्पेक्टरनें तावडतोब खिशांतून दोन कागद काढिले आणि ह्मणाले "तुह्मां दोघांनां कैद करण्याकरितां हीं वारंटें निघालीं आहेत."

सदूभाऊ विस्मित होऊन विचारूं लागले "आमच्यावर वारंट! तें काय ह्मणून? अपराधतरी आह्मीं कसला केला? फिर्याद कोणीं कैली आहे?"

इन्स्पेक्टर कठोर शब्दानें ह्मणाले "फिर्यादी सरकार आणि आरोप बनावट दस्तऐवज केल्याचा. तुह्मीं आग्रा ब्यांकच्या एक हजार रुपयांच्या चेकावर दहा हजार रुपयांचा बनावट आंकडा घालून ब्यांकेला ठकविलें."

इतका वेळ माधवरावांच्या तोंडून अवाक्षरहि निघालें नव्हतें. ते एकदम ह्मणाले "खोटी गोष्ट. तो चेक दहा हजारांचाच होता."

इन्स्पेक्टर भिंवया चढवून क्रुद्ध मुद्रेनें ह्मणाले "खोटें किंवा खरें तें कोर्टांत सांगा. सध्यां तुह्मी आमच्या ताब्यांत आहां, तुह्मांला कैद केलें आहे."

सदूभाऊ चपापले. माधवरावांची मुद्रा पहातांच तर त्यांनां जबरदस्त संशय येऊं लागला. एकच आठवडा झाला, माधवरावांच्या नांवाचा एक दहा हजारांचा चेक त्यांनींच पावती देऊन ब्यांकेंतून वटावून आणिला होता. हा चेक बनावट असेल अशी त्या वेळीं त्यांनां शंकासुद्धां आली नाहीं. आतां पुढें काय करावें त्यांनां कांहींएक सुचेना, माधवरावांच्या एकंदर मित्रगणाला ही बातमी तावडतोब पोहोंचली; परंतु नवलाची गोष्ट, त्या दिवशीं कोणीसुद्धां नुसतें डुंकून पहाण्यासहि आलें नाहीं. आज माधवरावांनां आपल्या मित्रांची खरी किंमत समजली—पण ती फार उशिरां—वेळ निघून गेल्यानंतर!

वारंट घेऊन आलेले कामदार मुंबई पोलिसांतले होते. अर्थात् त्यांनीं या उभयतांनां पकडून मुंबईस नेलें. या आकस्मिक संकटाची बातमी लागतांच पार्वतीबाईनीं तर रडूनरडून आकांत केला. जगू आणि दामू यांनां आतां थोडथोडें कळूं लागलें होतें. आपले वडील आणि मामा यांची ही विपन्नदशा स्वनेत्रांनीं पहातांच रडतरडत तेहि त्यांच्याबरोबर जाऊं लागले. परंतु एका चाकरानें त्यांस धरून बळजबरीनें घरीं आणिलें. माधवरावांनीं जातांजातां त्या चाकरास मोठ्यानें सांगितलें "माझी सुटका करण्यासाठीं तुह्मीं कांहींएक यत्न करूं नका; परंतु माझें जें कांहीं आहे नाहीं तें सर्व विकून टाकून सदूभाऊंनां मात्र सोडविण्याची खटपट करा."

हांहां ह्मणतां ही बातमी सर्व गांवभर पसरली.

---

## प्रकरण तिसावें.

### निर्व्याज प्रेम.

मनुष्याचा ऊर्जितकाळ आला ह्मणजे चोहोंकडून त्याची भरभराटच होत असते व विपरीत गोष्टीहि हितप्रद होतात; परंतु एकदां का पडता काळ आला, ह्मणजे मित्रसुद्धां शत्रु बनतात. एवंच, हें सारें काळाचें ह्मणा, नशिबाचें ह्मणा अथवा दुसऱ्या कशाचें तरी ह्मणा, परंतु माहात्म्य आहे खास. आपण अमुक-अमुक तऱ्हेनें वागलों ह्मणजे असेंअसें खात्रीनें घडणार, असें कोणालाहि निश्चयात्मक सांगतां येणार नाहीं. सर्व कांहीं ईश्वरी सूत्राप्रमाणेंच घडत असतें.

आमच्या धाकट्या सूनबाईनीं जें गेल्या सालीं धान्य वगैरे खरेदी करून ठेविलें होतें, त्याला, या वर्षी मेघराजाची अवकृपा झाल्याकारणानें दुप्पट दर आला. या धान्यांत आणि घरींच शेती केली होती त्यांत मिळून एकंदर निव्वळ दोन अडीच हजारांची किफाइत झाली. अर्थात्च दीक्षितांच्या कुटुंबाची ओढाताण आतां राहिली नाहीं. संसाराचा गाडा सुरळीत चालून दोन पैसे मागें पडूं लागले. शिल्लक राहिलेला पैसा दरसाल व्यापारांत गुंतूं लागला व आमच्या लक्ष्मीबाईच्या धूर्ततेमुळें आणि ईश्वराचा त्यांच्यावर वरदहस्त असल्यामुळें एकसारखें त्यांनां यशच येत चाललें. त्यांची स्थिति सुधारत चालली. वृथा जनलज्जेला भीक न घालतां प्रामाणिकपणें सतत उद्योग करणारावर ईश्वराचा नेहमीं वरदहस्त असतो व प्रत्येक धंद्यांत त्याला नेहमीं यशच येतें, ही गोष्ट अनुभवसिद्धच आहे.

आमचे विनायकरावजीहि आतां पूर्ण संसारदक्ष बनले होते. तथापिहि परोपकारार्थ काया झिजविण्याची महत्पर्वणी आली आणि आमच्या विनोबांनीं ती फुकट दवडली, असें झाल्याचें निदान आमच्यातरी ऐकिवांत नाहीं. दुसऱ्याच्या उपयोगीं पडण्याचें त्यांनां बाळकडूच मिळालें होतें. विनोबांनीं गांजाच्या चिलमीचा केव्हांच निरोप घेतला होता. हल्लीं त्यांनां व्यसन ह्मणून कसलेंच राहिलें नव्हतें. चार सभ्य लोकांत जाऊन मिळण्यामिसळण्याला हलुहळू त्यांनां भय वाटेनासें झालें. इतकेंच नव्हे, आतांआतांतर विनायकराव दीक्षितांची गांवांतील प्रमुख संभावितांत गणना होऊं लागली. आमच्या धाकट्या सूनबाई आंतूनआंतून कितीतरी व्यवसाय करीत. या साऱ्या व्यवसायांचा त्याचप्रमाणें संसारसंबंधीं हरएक जमाखर्चाचा हिशोब त्या स्वहस्तें राखीत. परंतु पतीला कमी-पणा येईल ह्मणून हें कोणाच्याहि दृष्टोत्पत्तीस त्या येऊं देत नसत. आणि विनायकरा-वांनांहि अभिमान ह्मणून मुळींच कसा तो नव्हता. ते आपले स्मितवदनानें पत्नीजवळ

सर्व कामें शिकत व पत्नीच्या सल्लामसलतीशिवाय कोणतीच गोष्ट करीत नसत. सासूबाईंची मर्जी कशी राखावी आणि त्यांनां तुष्ट कशा ठेवाव्या, हें आमच्या सूनबाईंनां दुसऱ्या कोणीं शिकविण्याची मुळींच जरूर नव्हती. सासूसुनांमध्यें एकदिवसदेखील कसा तो मतभेद झाला नाहीं, मग कमजास्त भाषणाची गोष्ट दूरच. सासूचीच गोष्ट कशाला, शेजारीपाजारी आणि गांवांतील इतर आबालवृद्धांबरोबरहि कसें वागावें हें लक्ष्मीबाईंनां उत्तम प्रकारें अवगत होतें. त्यांच्यावर कधीं कोणी नाखूप ह्मणून झालेंच नाहीं. आणि याच कारणानें आमच्या धाकट्या सूनबाईंची गांवांत जिकडेतिकडे प्रशंसा होत होती.

एके दिवशीं तिसरे प्रहरीं विनायकराव आपल्या पत्नीला ह्मणाले "तुझे जे सगळे दागिने मोडावे लागले, ते आतां पुनः करून घ्यावे, असें मला वाटतें."

पतीचें हें सरळ भाषण ऐकतांच किंचित् स्मित करून लक्ष्मीबाई ह्मणाल्या "कां बरं? आज आपल्याला दागिन्यांचीशी आठवण झाली ? दागिने अंगावर घातल्याविना मी आपल्याला आतां बरी दिसत नाहीं वाटतं? माझं रूप आतांसं आपल्याला आवडेनासं झालं होय? नी ह्मणूनच कीं काय मला दागिने चढवून रूपांत भर पाडायला सांगणं होत आहे ?"

"छे छे, भलतंच कांहींतरी ! ही गोष्ट माझ्या ध्यानींमनींदेखील नाहीं. तुझं रूप जें आहे, तेंच उत्तम आहे. त्याहून अधिकाची मला मुळींच अपेक्षा नाहीं. परंतु तुझे दागिने आमच्याकरितां मोडावे लागले, ह्मणून ह्मणतों."

"माझं रूप आपल्याला आवडतं ना? त्यांत भर पाडायची जर आपल्याला अपेक्षा नाहीं, तर मग मला त्या दागिन्यांनां घेऊन काय करायचं आहे ? दागिने अंगावर नसले तरीदिखील आपण मजवर प्रेम कराल ना?"

"तुजसारख्या सद्गुणी पत्नीवर प्रेम करायचें नाहीं, तर तें करायचेंतरी कुणावर? तूंतर माझ्या सर्व सुखाचें मूळ आहेस. तूं माझी पत्नीच नव्हेस तर तूं माझी गृहलक्ष्मी–तूं माझी अन्नदात्री–तूं माझी शिक्षयित्री–तूं माझा मंत्री–मित्र –गुरु आहेस–तुजवर जर मी प्रेम करणार नाहीं तर—"

अहाहा ! पतीच्या तोंडांतून निघालेले हे प्रेमळ उद्गार ऐकून कोणत्या साध्वीला आनंदाचें भरतें येणार नाहीं? कोणत्या साध्वीला अभिमान वाटणार नाहीं ? आमच्या लक्ष्मीबाई सलज्ज स्मित करून ह्मणाल्या "भलतंच कांहींतरी ह्मणायचं झालं. मी किनई आपली आणखी कुणीहि नाहीं—केवळ आपली दासी आहें. तरी पण सखू मोलकरणीसारखी दासी मी नव्हे बरं ! आपणा उभयतांचं

सुखदुःख, बरंवाईट हीं एका रज्जूनं बांधलेलीं आहेत; मग सर्व बाबतींत आपलं जर ऐक्य नसेल, तर संसारशकट सुयंत्रित चालावा कसा ? मी जर खालीं असेन तर हात देऊन आपण मला वर उचलून घेतलं पाहिजे. आपण प्रसंग-विशेषीं खालीं घसरलां, तर मीं हात देऊन आपल्यास सांवरून धरलं पाहिजे; आणि असं झालं ह्मणजेच आपलं ऐक्य होणार आहे. आपण नि मी एकतर खरींच, तथापिहि आपण पति–मी पत्नी, आपण श्रेष्ठ–मी कनिष्ठ, आपण ज्ञानी–मी अज्ञ, आपण धनी–मी दासीच !"

विनायकरावांच्या आनंदाला पारावार नाहींसा झाला. सौख्यसमुद्रामध्यें ते पोहूं लागले. साश्रुनयनांनीं पत्नीला गाढालिंगन देऊन ते ह्मणाले "लाडके ! तूं काय पाहिजे तें ह्मण, परंतु तुझे मजवर जे अनंत उपकार झाले आहेत ते विसरण्याइतका मी कधींतरी कृतघ्न होईन ?"

आमच्या धाकट्या सूनबाईच्या अधरप्रांतीं चंद्ररेखेप्रमाणें स्मित विलसूं लागलें; परंतु तें स्मित अर्थविहीन नव्हतें. कारण तत्क्षणीं त्यांनीं खिन्नवदनानें विचारिलें "तर मग माझे आपल्यावर कांहीं उपकार झाले आहेत असं आपल्याला वाटत असल्यामुळंच आपण मजवर प्रेम करितां ? पत्नी ह्मणून कांहीं मजवर आपलं प्रेम नाहीं !"

"छी छी ! ही कल्पनाहि तूं मनांत आणूं नकोस. पूर्वीं पूर्वीं तुजवर माझें प्रेम नव्हतें खरें, उलट मला तुझें मोठें भय वाटत असे. तुझें नांव ऐकतांच माझी छाती धडधडूं लागे, जीव अगदीं घाबरून जाई. परंतु तूं जेव्हां इकडे आलीस, तेव्हांपासून ती भीति पार नष्ट झाली–इतकेंच केवळ नव्हे, तर तुझ्याबरोबर बोलण्याचीहि मला इच्छा होऊं लागली. तुझ्यापाशीं अशी काय मोहिनीशक्ति आहे परमेश्वराला ठाऊक!–हल्लींतर तुझ्याशिवाय मी कांहींच नाहीं, असेंच मला वाटूं लागलें आहे. तुझ्यावांचून मला एक घटकासुद्धां करमत नाहीं."

"ईश्वर करो आणि जन्मोजन्मीं आपली ताटातूट न होवो."

---

## प्रकरण एकतिसावें.

### पति ह्मणजे देवता नव्हे काय ?

पतिपत्नींचा याप्रमाणें प्रणयसंवाद चालला आहे, इतक्यांत बाहेरून "विनायकराव, अहो विनायकराव ! विनायकराव आहेत का घरीं ?" अशा कोणी हांका मारूं लागलें. विनायकरावांची स्वारी बाहेर पडते न पडते तोंच राधाबाई आणि

मनोरमा खोलींत शिरल्या. मनोरमेचें माहेर विनायकरावांच्या गांवींच होतें, हें आह्मीं पूर्वीं सांगितल्याचें वाचकांनां स्मरतच असेल.

आंत येतांच राधाबाईनीं सुरुवात केली "कळलं का तुला मुली! त्या आपल्या यशोदाबाईची सून पहांटे बाळंत होऊन तिला मुलगा झाला. मुलगा पण कसा रत्नासारखा आहे ह्मणून सांगूं! देवानं तुझ्याहि पोटीं असंच एक लेंकरूं द्यावं, असा माझा हेतु आहे. आई जगदंबा माझा हेतु कधीं पूर्ण करील–तुझ्या कडेवर गोजिरवाणं लेंकरूं खेळतांना पहावं नि मग मला मरण यावं असा माझा मोठा हेतु आहे."

"कां बरं असं वाईट वाटून घ्यायचं? मला मुलं नाहींत का?"

"तुझं आपलं हें असंच कांहीं तरी! कुठं आहेत तीं सांग पाहूं?"

"कां बरं? जगू नि दामू कुणाचे?"

हें अनपेक्षित उत्तर ऐकतांच ह्मातारी किंचित् गोंधळल्यासारखी झाली. तिचे उभय नेत्र भरून आले. सद्गदित स्वरानें ती ह्मणाली "मुली! ईश्वर त्यांनां उदंड आयुष्य देवो! तीं तुझीं लेंकरं तर खरींच, परंतु तीं कांहीं तुला 'आई' ह्मणून हांक मारणार नाहींत!"

"आई ह्मणूनच हांक मारायला हवी तर आजपासून मी बाळकृष्णाला सांगत्यें तसं. तो मला आई ह्मणत जाईल, मग झालंना?"

सूनबाईचें भाषण—विशेषतः हे शेवटले शब्द ऐकून राधाबाईला जो कांहीं आनंद झाला, सांगतां येत नाहीं. "मी आतां बाळकृष्णाला जाऊन सांगत्यें हें—" असें म्हणून ह्मातारी तेथून चालती झाली. बाळकृष्ण ह्मणजे ह्मातारीचा जीव कीं प्राण! राधाबाई आतां पूर्वींच्या राधाबाई राहिल्या नव्हत्या. त्यांच्या नेत्रांतील जलवर्षाव अनेक दिवस बंद झाला होता. त्यांच्या जिव्हेचें यंत्र पूर्वीप्रमाणें आतां दिवारात्र चालत नव्हतें; इतकेंच नाहीं, तर ह्मातारीच्या तोंडावर आतां थोडासा तजेलाहि आला होता. ह्मातारी हल्लीं आनंदी दिसत असे.

सासूबाई बाहेर जातांच धाकट्या सूनबाई मनोरमेला उद्देशून ह्मणाल्या "कां यमूताई! आज आपण अशा खिन्न कां?"

माहेरीं आल्यापासून मनोरमा बहुतकरून आमच्या धाकट्या सूनबाईजवळच सारा दिवस असे. मनांतील सर्व गोष्टी, सर्व दुःखें ती लक्ष्मीबाईनां मोकळेपणें सांगे व लक्ष्मीबाईहि नानाप्रकारें हितवचनांनीं उपदेश करून मनोरमेच्या दुःखाचें निरसन करीत व तिला धीर देत; आणि यामुळेंच बिचाऱ्या मनोरमेला एकप्रकारें किंचित्

सुख वाटे. लक्ष्मीबाईंचा कळवळ्याचा प्रश्न ऐकतांच मनोरमा एक दीर्घ निःश्वास टाकून ह्मणाली "आज काय बाई झालं आहे कुणाला ठाऊक. सकाळपासून माझ्या जिवाला कशी आपली एकसारखी हुरहुर लागली आहे. कुठंच मन लागत नाहीं. आजपर्यंत कधीं असं झाल्याचं मला स्मरत नाहीं. कां बरं ताई मला आजच असं होत आहे ?"

मनोरमेचे डोळे भरून आले. एकामागून एक भरभर अश्रुबिंदू गळूं लागले. बालिकेनें आपलें खिन्न मुख दुसरीकडे फिरविलें. हा देखावा पहातांच आमच्या लक्ष्मीबाईंचें कोमल अंतःकरण व्यथित झालें. तरीहि तें मनोरमेच्या ध्यानांत येऊं न देतां त्या हंसतहंसत ह्मणाल्या "यजमान अद्याप येत नाहींत, ह्मणूनच मला वाटतं तुह्मांला असं होत आहे ! पण का हो यमूताई ! तुह्मीतर पतीला देवताच समजून मनांतल्या मनांत त्यांची पूजा करीत असतां; मग ते नाहीं आले तर तुह्मी मनांतल्या मनांत त्यांचं तसंच ध्यान कां धरीत नाहीं ? देवता का आपल्याला पापचक्षूंनीं दिसायच्या आहेत !"

"तें खरं ग ताई! पण पति ह्मणजे देवता नव्हे कीं काय ?"

"बाई ग ! पति ह्मणजे देवता खरीच, परंतु या देवतेचं, केवळ मनांतल्या मनांत पूजन करून किंवा ध्यान करून तृप्ति होत नाहीं. या देवतेचा आणि आपला साक्षात् समागमच झाला पाहिजे. त्याचप्रमाणं या देवतेला अनेक समयीं अगदीं देव्हाऱ्यांतील देवता करून ठेवावी लागते; परंतु पहावं तर तुझं कांहीं तिकडे लक्ष्यच नाहीं. या देवतेच्या चरित्रावर बारीक नजर ठेविली नाहीं तर अनेक प्रसंगीं ती स्थानभ्रष्ट होते; तिचं दर्शनदिखील होत नाहीं आणि मग मात्र जीव कसासाच होतो."

"पण ताई ! आपल्याला या गोष्टीकडे लक्ष्य देण्याची काय बरं जरूर ?"

"देवतेचं दर्शन घडावं अशी इच्छा असेल तर या गोष्टीकडे लक्ष्य पुरविणं जरूर आहे. नाहीं तर मग कशाची ग जरूर आहे बाई ? यमू, खरंच सांग मला, माधवरावांच्या भेटीसाठीं तुझा जीव अगदीं खालींवर होत आहे कीं नाहीं?"

शिशिरसिक्त प्रभातकमलाप्रमाणें बालिकेचे उभय नेत्र पुनः अश्रुभाराक्रांत झाले. अल्पकाळांतच एकदोन मौक्तिकाबिंदुहि गालांवर चमकूं लागले. या पवित्र शोकाश्रूंनींच लक्ष्मीबाईंच्या प्रश्नास उत्तर दिलें. मनोरमेला आणखी निराळें उत्तर देण्याची आवश्यकता राहिली नाहीं. लक्ष्मीबाईंनीं आपल्या पदरानें ते अश्रु पुसून

काढिल्यावर मनोरमाहि किंचित्कालानें स्थिर होऊन ह्मणाली "प्राण दिला तरी-दिखील नाहीं का त्यांची आतां एकवार भेट व्हायची ताई ?"

बोलतांबोलतां बालिकेला अनावर हुंदका आला. ती उच्चस्वरानें रुदन करूं लागली. लक्ष्मीबाई तिला पोटाशीं धरून तिचें शांतवन करून ममतेनें ह्मणाल्या "यमूताई! नको ग तूं अशी दुःख करूं ! तुझ्यासारख्या साध्वीला ईश्वर कधींहि कष्ट द्यायचा नाहीं बरं. तुजसारखी पतिभक्तिपरायण साध्वी कुठंहि आढळायची नाहीं. तुझा पति वेश्यासक्त, व्यसनी असूनहि तुला त्याबद्दल कांहीं एक कष्ट होत नाहींत, घोरतर पापपंकामधें तो रुतला असतांहि जेव्हां तूं देवाप्रमाणें त्याची पूजा करीत आहेस, तेव्हां तुझ्या पतिभक्तीला आणखी सीमा काय राहिली ! ज्या साध्वीची अशी अकृत्रिम पतिभक्ति आहे, तिला देव पतिसुखाला खचित विमुख करणार नाहीं. बाई ग, तूं मनामध्यें पक्की खात्री बाळग, कीं, दोन दिवसांनीं ह्मण, अथवा दोन महिन्यांनीं ह्मण, तुझा पति सर्वस्वीं तुझ्याच आधीन होईल. सांप्रत दुर्दैवानं हा जो भोग आला आहे तो कांहीं दिवस भोगलाच पाहिजे. देवादिकां-नांहि या भोगाच्या तडाक्यांतून सुटतां आलं नाहीं, मग तुह्मी आह्मी तर माणसंच आहों."

धाकट्या सूनबाईच्या या ममतेच्या भाषणानें मनोरमेचें बरेंच समाधान झालें. इतक्यांत विनायकराव हातांत एक पत्र घेऊन म्लानवदनानें तेथें आले. पतीची ती खिन्न मुद्रा पहातांच लक्ष्मीबाईनीं घाईघाईनें विचारलें "तोंड एवढं उतरल्या-सारखंसं झालं आहे ? कांहीं जास्तकमी तर नाहींना ?"

पत्नीच्या प्रश्नाला कांहींएक उत्तर न देतां विनायकरावांनीं केवळ तें पत्रच लक्ष्मीबाईच्या हातीं दिलें, आणि एक दीर्घ निःश्वास टाकून ते तेथेंच उभे राहिले. लक्ष्मीबाई कंपित हृदयानें मनांतल्या मनांत पुढील पत्र वाचूं लागल्या.

"श्रीजगदीश प्रसन्न.

तीर्थस्वरूप राजमान्य राजश्री विनायकराव काकासाहेब मु॰—

वडिलांचे सेवेशीं—

अपत्यें बालकें जगन्नाथ सदाशिव दीक्षित मु॰—यानें त्रिकाल चरणीं मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना वि॰—

यानंतर इकडील मजकूर, आह्मी इकडे मोठ्या विपत्तींत पडलों आहों. आज सकाळीं पोलिसच्या लोकांनीं वाड्याला गराडा घालून तीर्थरूप बाबा आणि तीर्थस्वरूप माधवराव मामा या उभयतांना कैद करून नेलें. कांहीं बनावट

कागद केल्याचा त्यांच्यावर आरोप आहे, असें ऐकितों. कोणीं दुष्टानें अदावतीनें त्यांच्यावर ही तोहमत आणिली आहे कळत नाहीं. या ठिकाणीं आह्मांला कोणाचें साहाय्य नाहीं, कीं धीर द्यावयालाहि कोणी नाहीं. या संकटांत आह्मां समस्तांचा भरंवसा सर्वस्वीं आपल्यावरच आहे; आणि ह्मणूनच हें सविस्तर वर्तमान आपणांस विदित करीत आहें. वडिलांनां योग्य दिसेल ती व्यवस्था व्हावी. सेवेशीं श्रुत होय, हे विज्ञापना,

आपला नम्र बालक,

**जगन्नाथ सदाशिव दीक्षित.**

ता० क०—ती. सौ. मातुश्री मामी यांनांहि ही हकीगत कळवावी आणि त्यांच्या वडिलांनां इकडे पाठविण्याची कृपा व्हावी, हे विज्ञप्ति.

आपला

**जगन्नाथ.''**

पत्र वाचून लक्ष्मीबाई स्तंभितच झाल्या. परंतु भयाचें यत्किंचित्‌हि चिह्न न दाखवितां स्थिर चित्तानें त्या ह्मणाल्या ''खरोखरच कोणी दुष्टानं हें कुभांड रचिलं आहे! शेवटीं सत्याचा जय होईल. आपल्या वतीनं खटला चांगला चालविण्याची आतांपासूनच तरतूद केली ह्मणजे कोर्टांत सर्व गोष्टी बाहेर येतील. हातपाय गाळून काळजी करीत राहिल्यानं फायदा न होतां अनिष्ट मात्र होईल. हा कागद घेऊन आलेल्या गड्याला जरा आंत येऊंद्या बरं. एकवार सगळी हकीगत नीटपणं ऐकून तर घेऊं.''

विनायकरावांनीं गड्यास आंत बोलाविलें. हा काळपर्यंत मनोरमा स्तब्ध राहून सर्व गोष्टी ऐकत होती. आतांपर्यंत तिला समजलेंच नव्हतें, कीं, तिचें सर्वस्व-धन या वेळीं पोलिसानें कैद करून नेलें आहे. कोणावर कांहींतरी भयंकर प्रसंग आला आहे, एवढेंच कायतें मनोरमेला आतांपर्यंत कळलें होतें; परंतु गड्याला पहातांच तिच्या काळजांत धस्स झालें. गडीहि मनोरमेला पहातांच मोठमोठ्यानें स्फुंदूं लागला आणि रडतरडत त्यानें घडलेली सर्व हकीगत इत्थंभूत सांगितली.

मनोरमेनें पहिल्यापहिल्यानें स्थिर चित्तानें सर्व वृत्तांत ऐकून घेतला. मुखा-वाटे शब्द नाहीं—एकादा अल्प निःश्वासहि नाहीं! परंतु नंतर—पहातांपहातां ती एकदम मूर्च्छित होऊन भूमीवर पडली.

---

## प्रकरण बत्तिसावें.

### पश्चात्ताप आणि प्रायश्चित्त.

अनेक यत्नांनीं मनोरमेची मूर्च्छा भंग होऊन ती किंचित् शुद्धीवर आली. आमच्या लक्ष्मीबाई नाना प्रकारें तिचें शांतवन करूं लागल्या. त्या ह्मणाल्या "यमूताई, तुझा पति खरोखर निरपराधी असेल, तर भीति बाळगण्याचं कांहींच कारण नाहीं. सत्याचा वाली परमेश्वर आहे! शिवाय खटला मुंबईस चालायचा आहे, हें ऐकूनहि मला बराच धीर आला आहे. त्यांच्या मुक्ततेसाठीं मी जिवापलीकडे खटपट करीन. आणि तूं कांहीं पाहिजे तें ह्मण, परंतु मलातर नक्कीनक्की वाटत आहे, या कामांत आपण यशस्वी होणारच!"

सर्व मंडळी चकित होऊन लक्ष्मीबाईच्या तोंडाकडे टकमक पहात राहिली. विनायकराव शेवटीं एक दीर्घ निःश्वास टाकून ह्मणाले "किती झालें तरी तूं बायको मनुष्य. तुझ्या हातून या कामांत खटपट ती कसली होणार?"

आमच्या धाकट्या सूनबाईनीं तत्काळ उत्तर दिलें "कां बरं! आह्मी बायका असलों ह्मणून आमच्या हातून एवढंसुद्धां का व्हायचं नाहीं? पुरुषांपेक्षां अनेक बाबतींत आह्मी दुर्बळ तर खऱ्याच, परंतु असं जरी असलं तरीहि आणीबाणीच्या प्रसंगीं संकटांतून मुक्त होण्यास आमच्या हातून कांहींच व्हायचं नाहीं कीं काय?"

पत्नीच्या या निश्चयदर्शक शब्दांनीं विनायकराव किंचित् गोंधळल्यासारखे झाले. ते ह्मणाले "तुला वाईट वाटूं देऊं नको. तुझी बुद्धि, तुझें सामर्थ्य, तुझी कर्तृत्वशक्ति हीं सर्व मी जाणून आहें. परंतु या संकटांत तुझ्याकडून कसें साहाय्य होईल, हें कांहीं माझ्या ध्यानांत येत नाहीं."

"संकट आलं ह्मणून गांगरून जाऊन सर्व विसरून गेल्यासारखं काय करायचं हें असं? माझे मामा मुंबईत नांवाजलेले वकील आहेत, हें आपल्या ध्यानांतच नाहीं वाटतं? त्यांच्याच मदतीनं मी या संकटांतून मुक्त होण्याची खटपट करीन. उद्यां पहाटेसच आपण मुंबईला जाण्यास निघालेलं बरं, असं मला वाटतं."

इतक्यांत राधाबाई तेथें आल्या. पुत्रावर आलेल्या संकटाची बातमी कळतांच म्हातारीचें अंतःकरण व्याकुळ झालें. ती उच्चस्वरानें क्रंदन करूं लागली. बऱ्याच दिवसांत म्हातारीला रडतांना कोणीं पाहिलें नव्हतें.

नानाप्रकारच्या धीराच्या शब्दांनीं लक्ष्मीबाई सासूचें शांतवन करूं लागल्या शेवटीं जेव्हां राधाबाईनां समजलें, कीं, मुलाला सोडविण्याची खटपट करण्याकरितां आपली सून स्वतः मुंबईस जात आहे, तेव्हां त्यांनां कितीतरी धीर

आला. ह्मातारीला वाटूं लागलें, आतां आपला मुलगा खास संकटांतून मुक्त होणार. ज्या गोष्टीचा विनोबांनां विश्वास वाटत नव्हता, त्याच गोष्टीचा राधाबाईनां पूर्ण विश्वास वाटला ! बिचाऱ्या हतभागिनी मनोरमेचें नानाप्रकारें शांतवन करून तिला घरीं पोंचती केली.

दुसऱ्या दिवशीं मोठ्या पहांटेस निघून योग्य वेळीं विनायकराव आपल्या पत्नीसहवर्तमान मुंबईस येऊन दाखल झाले. आमच्या सूनबाईचे मामा गिरगांवांत रहात असत. आपली भाची आणि जामात यांच्या आकस्मिक आगमनानें लक्ष्मीबाईच्या मामांला आणि मामींला फारच आनंद झाला. मामांनां पहातांच लक्ष्मीबाईनीं रडतरडत त्यांचे पाय धरिले आणि ह्मणाल्या "मामा, आमच्यावर गुजरलेल्या या भयंकर प्रसंगांतून वांचविण्याला तुमच्यावांचून दुसरं कुणीच नाहीं !"

मामांनां हें कांहींच कळेना. ते अगदीं बुचकळ्यांत पडल्यासारखे झाले. हें पाहून विनायकरावांनीं त्यांनां समस्त वृत्तांत निवेदन केला. सुशीला ह्मणजे मामांची फारच आवडती. तिचें शांतवन करून ते ह्मणाले "सुशीले, अग यासाठीं तूं मजजवळ इतकी गयावया कां करितेस ? वेडी पोर कुठली ! ऊठ. माझ्या लाडक्या सुशीलेवर आलेलें संकट माझ्यावरच आलें आहे, असें मी समजतों. तूं अगदीं घाबरूं नको. विनायकराव ! तुह्मी अगदीं स्वस्थ रहा, त्यांनां सोडविण्यासाठीं मजकडून होईल तेवढी खटपट मी करीन."

लक्ष्मीबाईचे मामा श्रीधरपंत, मुंबईतील एक नामांकित वकील होते. कोर्टांत त्यांचें चांगलेंच वजन असे. श्रीधरपंतांनीं वकीलपत्र घेतलें आणि त्यांत जय आला नाहीं, असें बहुधा झालेंच नाहीं ! असो. घाईघाईनें भोजन उरकून श्रीधरपंत तत्काळ पोलिसकोर्टांत गेले आणि खटल्याची सर्व हकीगत त्यांनीं समजावून घेऊन चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटपुढें आरोपींनां जामिनावर सोडण्याविषयीं ताबडतोब अर्ज केला. परंतु त्यांची ही खटपट व्यर्थ गेली. श्रीधरपंत स्वतः जामीन रहाण्यास तयार झाले होते, परंतु मॅजिस्ट्रेटसाहेब ह्मणाले "कायद्याप्रमाणें आपली विनंती मला मान्य करतां येत नाहीं. याबद्दल मी फार दिलगीर आहें. तरी खटला चांगला तयार करितां यावा ह्मणून मी तुह्मांला योग्य तेवढी मुदत मोठ्या आनंदानें देतों."

योग्य वेळीं खटला सुरू झाला. बँकेंतील दोनतीन कामगारांची आणि ज्या इसमानें तो चेक दिला होता, त्याची प्रथम जबानी झाली. त्या एकंदर

पुराव्यावरून मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं खटला सेशनांत पाठविण्याचा अभिप्राय प्रदर्शित केला. खटल्याचें एकंदर स्वरूप पाहून श्रीधरपंतहि त्याला कबूल झाले. सेशन भरण्याला आतां कायतो दोनच दिवसांचा अवकाश होता. तेव्हां आरोपींनां तुरुंगामध्यें कांहीं फार वेळ कुचंबत रहावें लागलें नाहीं.

सेशनांत त्या सगळ्या साक्षीदारांची पुनः जबानी झाली. श्रीधरपंतांनीं या वेळीं मुंबईंत प्रख्यात बॅरिस्टर मि. ओम्यानी यांजकडून अशी कांहीं शिताफीनें उलट तपासणी करविली, कीं, त्या सगळ्या साक्षीदारांचा घोटाळाच उडून गेला. त्यांच्या जबानींतील असंबद्धता जज्जसाहेबांच्या आणि जूरीच्या पुढें स्पष्टपणें ठेवून आरोपींच्या निरपराधीपणाबद्दल बॅरिस्टरसाहेबांनीं त्यांची अगदीं खात्री करून दिली. आरोपीतर्फेच्या एकंदर मंडळीचीं मनें प्रफुल्ल झालीं.

'निर्दोषी' ह्मणून एकमतानें निकाल देण्याचा जूरीचा विचार चालला आहे– इतक्यांत माधवराव जज्जसाहेबांनां उद्देशून इंग्रजींत अस्खलित वाणीनें ह्मणाले "मान्यवर न्यायमूर्ति, आणि जूरींतील सद्गृहस्थ हो! मला कांहीं सांगावयाचें आहे. महाराज! आपल्या दृष्टीनें जरी मी निर्दोषी ठरलों, तरी ईश्वरासमोर मी पूर्ण दोषी आहें. माझ्या तर्फेच्या विद्वान् बॅरिस्टरसाहेबांनीं अपूर्व कौशल्यानें आपल्या डोळ्यांत धूळ टाकिली आहे; परंतु ईश्वराच्या डोळ्यांत त्यांनां धूळ टाकितां यावयाची नाहीं. मी मोकळ्या मनानें कबूल करितों, कीं, हा अपराध मीं केला आहे. मजबरोबर पिंजऱ्यांत उभे असलेले माझे मेहुणे सदाशिवराव यांनां मात्र मजबरोबर निष्कारण कष्ट भोगावे लागत आहेत. मीं स्वतःच तो चेक वटविण्या करितां यांच्याजवळ दिला होता. यांनीं तो वटावून सगळे रुपये मजजवळ आणून दिले. यापलीकडे या चेकबद्दल यांनां कांहींएक माहिती नाहीं. तरी महाराज, याबद्दल जी कांहीं शिक्षा द्यावयाची असेल ती संपूर्ण मलाच द्यावी, एवढीच कोर्टाजवळ माझी विनंति आहे."

माधवरावांच्या तोंडचे शब्द ऐकतांच कोर्टांत असलेली सारी मंडळी स्तंभित झाली. बॅरिस्टरसाहेबांच्या मस्तकावर तर जणों वज्राघातच झाला! माधवरावांनीं चूप रहावें ह्मणून दोनतीनदां त्यांनीं मध्येंच अडथळा आणण्याचाहि प्रयत्न केला, परंतु माधवरावांनीं त्यांनां मुळींच जुमानिलें नाहीं. शेवटीं बॅरिस्टर-साहेबांच्यानें कांहीं रहावेना. त्यांनीं उठून कोर्टाला पुढीलप्रमाणें विनंती केलीः–

"आरोपीचें डोकें फिरल्यासारखें झालें आहे. तो भ्रमिष्टासारखें कांहींतरी बरळत आहे. आपण अपराध केल्याचें तो जें कबूल करीत आहे, तें कधींहि

ग्राह्य धरितां येणार नाहीं. सन्मान्य न्यायाधीश, आणि जूरींतील सद्गृहस्थ हो, पोलिसाकडून अन्यायानें असा असहनीय अपमान झाला असतां कोणाहि सभ्य गृहस्थाचें डोकें ठिकाणावर रहाणें शक्य नाहीं, हें आपल्यास कळतच असेल. माझी पक्की खात्री आहे, कीं, निकाल देतांना आमचे दयाळू न्यायाधीश महाराज आरोपीच्या या असंबद्ध प्रलापांकडे बिलकूल लक्ष्य पुरविणार नाहींत !"

परंतु काय उपभोग ! बॅरिस्टरसाहेब खालीं बसतात न बसतात तोंच माधवरावांनीं पुनः सुरुवात केली "बॅरिस्टरसाहेबांचें ह्मणणें अगदीं चुकीचें आहे. माझ्या डोक्यांत कांहींएक फरक झालेला नाहीं. मला मुक्त करण्यासाठीं त्यांनीं जे परिश्रम घेतले आहेत आणि जें चातुर्य दाखविलें आहे, त्याबद्दल मी त्यांचा यावज्जन्म कृतज्ञ राहीन; परंतु त्यांच्या त्या परिश्रमाचें किंवा त्यांच्या चातुर्याचें फळ मी कोर्टाजवळ प्रार्थू इच्छीत नाहीं. महाराज, या महान् पातक्यानें केवळ हाच अपराध केला आहे असें नाहीं. नानाप्रकारच्या पातकांनीं या अधमानें आपल्या चरित्राला काळिमा लाविला आहे. कांहींतरी खडतर प्रायश्चित्त भोगल्याशिवाय चरित्रसंशोधन करण्याची सुबुद्धि मला होणार नाहीं, आणि केवळ याच कारणासाठीं न्यायाधीश महाराजांच्या डोळ्यांत धूळ फेंकून हें पापमय आयुष्य कंठण्याची मला मुळींच इच्छा नाहीं." नंतर विनायकरावांकडे तोंड करून ते ह्मणाले "विनायकराव, तुमच्या दादांनां घेऊन तुह्मी घरीं जा. पातकी मनुष्याच्या संसर्गांत राहिल्यामुळेंच त्यांनां हा अपमान सहन करावा लागला. तुमचे आणि तुमच्या मामांचे उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं."

निर्वात, निष्कंप, दीपज्योतीप्रमाणें, प्रशांतसमयीं दिसणाऱ्या गंभीर समुद्राप्रमाणें, प्रबल झंझावात सुटण्याच्या पूर्वील निस्तब्ध निसर्गदेवतेप्रमाणें, कोर्ट कांहीं काळ जिकडेतिकडे अगदीं शांत आणि निस्तब्ध होऊन राहिलं होतें. कोणाच्याहि मुखावाटे चकारशब्द निघाला नाहीं. सगळे तटस्थ ! शेवटीं जूरीचें मत बदललें. "आरोपी माधवराव दोषी आहे, परंतु कोर्टानें त्याजवर दया करावी," अशी जूरीनें न्यायाधीशांजवळ शिफारस केली. न्यायाधीशांनींहि जूरीच्या शिफारशीकडे पूर्ण लक्ष्य देऊन रहीमदिलानें आरोपी नंबर १ माधवराव यांस एक वर्ष सक्तमजूरीची शिक्षा दिली व सदाशिवराव यांनां निर्दोषी ठरवून सोडून दिलें.

---

## प्रकरण तेहतिसावें.

### मनोरमा आणि लक्ष्मीबाई.

कोर्टाच्या पिंजऱ्यांतून बाहेर पडतांच सदूभाऊंनीं स्फुंदतस्फुंदत आपल्या कनिष्ठ बंधूला आलिंगन दिलें. मुखावाटे शब्दहि बाहेर येईना, इतका त्यांनां गहिंवर आला होता. उभयतां बंधूंनां हें आलिंगन परम सुखकर झालें. आमच्या विनायकरावांचेंतर अश्रुपुरानें वक्षःस्थल भिजून गेलें किंचित्कालानें परस्परांनीं परस्परांचे आनंदाश्रु पुसून काढिले आणि सर्व मंडळी एकत्र जमून लक्ष्मीबाईंच्या मामांच्या घरीं आली. आपल्या वडील बंधूची सुटका झाली ह्मणून विनायकरावांनां जितका आनंद झाला, त्यापेक्षांहि माधवरावांची मुक्तता करतां आली नाहीं ह्मणून त्यांनां अधिक दुःख झालें. घराची पायरी चढतात न चढतात तोंच लक्ष्मीबाईनीं "काय झालं ?" ह्मणून मोठ्या उत्सुकतेनें विचारिलें. विनोबा कचरतकचरत ह्मणाले "अर्धें काम फत्ते झालें. दादा निर्दोषी ठरून मुक्त झाले; परंतु बिचाऱ्या माधवरावांनां एक वर्ष कारागृहवासाची शिक्षा—"

लक्ष्मीबाई व्यथितांतःकरणानें ह्मणाल्या "माधवरावांसाठीं मामा इतके झटले नाहींत वाटतं ?"

विनायकरावांनीं सविस्तर वृत्तांत स्पष्टपणें पत्नीला समजावून सांगितला; आणि ते ह्मणाले "मामांनीं दोघांसाठींहि सारखीच जिवापाड खटपट केली; परंतु माधवराव आपण होऊन तुरुंगांत गेले."

अत्यंत चिंतातुर मुद्रेनें लक्ष्मीबाई ह्मणाल्या "यमूची समजूत आतां मी कशी करूं ? त्या बिचारीची कधींहि समजूत पडणार नाहीं, कीं, माधवरावांनां आतां खराखरा पश्चात्ताप झाला आहे—आपण होऊनच कृतकर्माबद्दल प्रायश्चित्त भोगाण्यास त्यांनीं आतां प्रारंभ केला आहे. तें कसंहि असो, परंतु झाली ही गोष्ट यमूला अंतीं शुभप्रदच होईल."

विनायकराव विस्मित होऊन विचारूं लागले "यमूचा या गोष्टीनें कसा बरें फायदा होईल ?"

"तो परम दयाळू परमेश्वर जें जें कांहीं करितो, तें तें सर्व आपल्या बऱ्यासाठींच असतें. यमूची सध्यां जी वृत्ति आहे, त्या वृत्तीमुळं तिच्या हातून कांहीं तिच्या पतीच्या वर्तनाला आळा घालण्याचं कधींहि होणार नाहीं. पति कुमार्गाला प्रवृत्त झाला असतां युक्तीनं त्याला सन्मार्गाला आणण्याकरितां पत्नीनं झटलं पाहिजे, ही गोष्ट यमूच्या मनांतदिखील येत नाहीं. तिच्याच तोंडून मीं जो वृत्तांत ऐकिला

आहे, त्यावरूनच मी ह्मणत्यें, कीं, ती माहेरीं येण्यापूर्वी माधवरावांच्या वृत्तींत जो फरक झाला होता, त्याच वेळीं जर तिनं त्यांनां थोडी मदत केली असती, तर माधवराव आजला खरोखर पुनः सन्मार्गवर्ती होऊन राहिले असते. परंतु तिनं तसं कांहीं केलं नाहीं; ती आपली निघून इकडे आली, आणि माधवराव पुनः अधःपतनाच्या मार्गाला प्रवृत्त झाले. परंतु यमूबाईसारखी सती साध्वी स्त्री का नेहमीं पतिसुखाला अंतरेल ? आणि यासाठींचतर माधवरावांनां सांप्रत कारागृहवास प्राप्त झाला आहे. आतां यमूकडून कोणत्याहि प्रकारं साहाय्य झाल्याशिवाय माधवरावांचं चरित्रसंशोधन ज्या मार्गानं खास होईल त्याच मार्गाला ते लागले आहेत. अग्नींत तावूनसुलाखून निघाल्याविना का सोनं कसास चढत असतं ?"

"खरोखरच ही सर्व कांहीं त्याचीच इच्छा आहे. तो जगच्चालक प्रभु, कोणत्या उद्देशानें कोणती गोष्ट घडवून आणितो हें आह्मां अल्पबुद्धि मानवांनां समजावयाचें नाहीं ! बरं. पण आतां इथें दिवस गमावण्यांत हांशील काय ? आई तिकडे अगदीं चिंता करीत असेल."

परंतु श्रीधरपंतांनीं त्या दिवशीं कांहीं मंडळीला जाऊं दिलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळच्या गाडीनें मुंबई सोडून मंडळी परत आपल्या गांवीं आली. सदूभाऊंनां पहातांच राधाबाईच्या आनंदाला पारावार नाहींसा झाला. सदाशिवराव सजल नेत्रांनीं आईच्या चरणांवर मस्तक ठेवून तिची क्षमा मागूं लागले. ह्मातारीनें मुलाच्या डोळ्यांतील अश्रु पुसून त्याचें शांतवन केलें. ही मंडळी आल्याची बातमी लागतांच मनोरमा धावतच आमच्या धाकट्या सूनबाईजवळ आली मनोरमेला पहातांच लक्ष्मीबाईचा प्राण व्याकुळ झाला. "ताई ! काय ग झालं?' ह्मणून चिंतातुर वदनानें तिनें येतांक्षणींच प्रश्न केला.

हा प्रश्न करतांना मनोरमेनें अशा कांहीं हृदयभेदक करुणदृष्टीनें लक्ष्मीबाईकडे पाहिलें, कीं, तिला खरी गोष्ट सांगण्याचें कांहीं केल्या त्यांनां साहसच होईना आणि शिवाय मनोरमेपासून माधवरावांसंबंधीं खरी हकीगत अगदीं गुप्त ठेवावयाची, असें एकंदर मंडळीनें ठरविलें होतें. लक्ष्मीबाई स्थिर चित्तानें आणि गंभीरतेनें ह्मणाल्या"यमूताई, सगळं कांहीं ठीक झालं. हातीं घेतलेल्या कामीं ईश्वरकृपेनं आह्मांला यशच आलं बरं. परंतु तुझे पतिराज कांहींकेल्या आमच्या. बरोबर इकडे येण्यास कबूल होईनात. बाई ग, त्यांनां किनई आतां खराखरा पश्चात्ताप झाला आहे. एक वर्ष अज्ञातवासांत घालवून आपल्या पातकांबद्दल प्रायश्चित्त भोगल्यानंतर ते इकडे येणार आहेत. एवढं हें वर्ष लोटल्यानंतर जेव्हां

ते तुझ्याकडे येतील तेव्हां तुझ्या त्या सर्वस्वधनावर सर्वस्वीं केवळ तुझीच सत्ता राहील बरं यमूताई ! तूं आतां अगदीं काळजी करूं नको."

मनोरमेचें खिन्नवदन किंचित् प्रफुल्ल झालें. ती तत्क्षणीं ह्मणाली "ताई, त्यांची या भयंकर संकटांतून मुक्तता झाली, हेंच कितीतरी झालं ! त्यांनां जिथं सुख होईल तिथं त्यांनीं खुषाल रहावं. परंतु ताई, त्यांच्या हातून कांहीं पापकर्म घडलं असेल, असं मला कांहीं वाई वाटत नाहीं. उगीच त्यांच्यावर हा आळ आला असावा. माझी पक्की खात्री आहे, कीं, ते अगदीं निष्पाप आहेत. त्यांच्या चरित्राला कलंक ह्मणून कधींच लागायाचा नाहीं. त्यांनां हे जे कष्ट भोगावे लागले, ते केवळ या पापिणीच्या अदृष्टदोषामुळंच."

ह्या वेळपर्यंत लक्ष्मीबाईंच्या मनाची कोणत्याहि प्रकारें चलबिचल झाल्याचें दिसून आलें नाहीं; परंतु मनोरमेची सरल प्रकृति आणि सरल प्रेमाच्या गंभीरतेच्या गोष्टी मनांत येतांच आमच्या धाकट्या सूनबाईंचे उभय नेत्र पाण्यानें भरून आले. तरीहि तत्काल ते अश्रू पुसून काढून त्या ह्मणाल्या "यमूताई, तुझ्यासारखं अंतःकरण या पृथ्वींत अति दुर्लभ आहे. तें पाहिलं ह्मणजे मलादिखील तुझा हेवा करावासा वाटतो. बाई ग, तूं पक्की खात्री बाळग, तुझ्या अशा या गुणांनींच तूं सुखी होशील !"

मनोरमेला पक्का विश्वास, कीं, ताईचें बोलणें कधीं असत्य व्हावयाचेंच नाहीं ! आणि शिवाय ताईवर ह्मणजे मनोरमेचें प्राणांपेक्षांहि अधिक प्रेम. तेव्हां लक्ष्मीबाईंच्या या भाषणानें तिचें सहजच समाधान झालें. बालिका एक वर्ष कधीं भरेल ह्मणून दिवस मोजूं लागली. नेहमीं लक्ष्मीबाईंच्या सहवासांत वेळ घालविण्याची तिला फार आवड असे. आमच्या सूनबाई फुरसत मिळाली पुरे, 'रामायण' 'महाभारत' इत्यादि ग्रंथांतील नानाविध उपदेशपूर्ण गोष्टी तिला ऐकवीत असत.

---

## प्रकरण चवतिसावें.

### थोरल्या सूनबाईंचें आगमन.

आतां वडील जाऊ आणि जगू, दामू यांनां इकडे आणण्याविषयीं लक्ष्मीबाईंनीं सदूभाऊंच्यामागें सारखा तगादा लाविला. सदूभाऊंनां घरीं आल्याला एक आठवडा झाला होता. इकडे आल्यापासून त्यांच्या आनंदाला सीमाच राहिली नव्हती. वाडी, घर, बाग, विहीर यांची सुव्यवस्था आणि उन्नति पाहूनच ते विस्मित होऊन गेले होते. सर्वांच्या तोंडून आमच्या धाकट्या सूनबाईंची प्रशंसा ऐकून

आणि सांसारिक व दुसऱ्या एकंदर देवघेवींसंबंधीं त्यांचा बंदोबस्त, दक्षता, स्वनेत्रांनीं पाहून तर ते मोहितच होऊन गेले होते; विशेषतः तिच्या संसर्गानें आपल्या भावाच्या वृत्तींत झालेलें आश्चर्यकारक स्थित्यंतर डोळ्यांनीं पाहून आमच्या धाकट्या सूनबाईवर देवीप्रमाणें मनांतल्या मनांत ते भक्ति करूं लागले. संसार ह्मणजे हल्लीं त्यांनां स्वर्गवत् भासत होता. याच वेळीं लक्ष्मीबाईची जाऊ-बाईनां आणण्याविषयींची विनंति त्यांच्या कानावर आली. सदूभाऊ मनांतल्या-मनांत ह्मणूं लागले "लक्ष्मी, या स्वर्गधामांत वास्तव्य करण्यास तुझी जाऊबाई कांहीं पात्र नाहीं. तिला इथें आणिल्यास हें नंदनवन पुनः स्मशानवत् होईल."

सदूभाऊंनीं उघडपणें भावजयीला सांगितलें "तिला इथें आणण्याचें कांहींएक प्रयोजन नाहीं. जगू आणि दामू यांनां आणण्याकरितां मात्र मी आज जरूर मनुष्य पाठवितों."

लक्ष्मीबाईनां कांहीं हें बरें वाटलें नाहीं. राधाबाई आणि विनायकरावसुद्धां सदूभाऊंच्या पाठीस लागलीं. तेव्हां नाइलाजास्तव त्यांनां कबूल व्हावें लागलें. शुभ दिवस पाहून बाळकृष्ण आणि सखू मोलकरीण यांनां पार्वतीबाईच्या माहेरीं पाठविण्यांत आलें. जातांजातां बाळकृष्ण लक्ष्मीबाईजवळ येऊन नमस्कार करून ह्मणाला "वहिनी, जगूला नि दामूला आणायाला मी जात आहें खरा, परंतु तेथें जी दुसरी वहिनी आहे, ती कांहीं तुमच्यासारखी खास नाहीं. आपण कांहीं तिला वहिनी ह्मणून मुळींच हांक मारणार नाहीं. याला जर तुह्मी कबूल असाल तर मी त्यांनां आणीन."

लक्ष्मीबाई हंसतहंसत ह्मणाल्या "चल, वात्रट कुठला! अरे तीं मजपेक्षां वडील आहे. तीतर माझ्यापेक्षांहि चांगली असणार."

"त्या गोष्टी सोडून द्या बरें वहिनी तुह्मी! आतांच पाहीन ना पण मी तुह्मी दोघीहि एका ठिकाणीं जमलां ह्मणजे काय तें तेव्हांच कळून येईल. घोडें मैदान जवळच आलें आहे! बाकी माझीतर पक्की खात्री आहे, कीं, माझ्या वहिनी-सारखी वहिनी सगळ्या पृथ्वींत दुसरी मिळायची नाहीं!"

असें ह्मणून बाळकृष्ण हंसतहंसतच बाहेर पडला. सखू मोलकरीण अद्यापि येथेंच होती. पार्वतीबाईला माहेरीं पोहोंचवून आल्या दिवसापासून बिचारीच्या मनाला ती गोष्ट अगदीं लागून राहिली होती. आज पार्वतीबाईला परत आण-ण्याची कामगिरी तिलाच मिळाली, तेव्हां तिचा आनंद कांहीं पोटांत मावेना. "बाय, अवो बाय!" ह्मणून ओरडतच ती घरांत राधाबाईजवळ आली आणि

आनंदानें अगदीं बेहोष होऊन ह्मणाली "बाय, अवो अजूनवर मी चीप राहलय, त्यामंदीं बोलायचां काय हाय ह्मना! पर बाय, थोराह्मोव्यान्ची ल्येक, आन् असां खोटाच्या खोटांच बोलायचां! माज्या घरीं येऊनशी मला सांगला का 'बाबा लय बेजार हायत ह्मनूनशी उच्याउच्या जाऊनशी येतय, तवा चल माज्या संग.' हकड घेऊनशी येतय अदुगर, आनी मग ह्यां संमदां खरां खोटां करून घेन. बाय, काय वो सांगूं! तुमच्यापायांच्यान् ते रोजापुन माज्या—"बोलतांबोलतां सखूनें रडण्याचाहि उपक्रम केला; परंतु राधाबाईंनीं कशीबशी तिची समजूत घालून तिला वाटेस लाविली.

आतां मात्र सासरीं येण्याला पार्वतीबाईंनीं कांहींएक हरकत घेतली नाहीं. कारण खटल्याचा निकाल काय झाला होता तें त्यांनां अगोदरच कळलें होतें. सदाशिवराव इकडे न येतां मुंबईहून परस्परच घरीं निघून गेले, याचें त्यांनां फार दुःख झालें; परंतु त्या दुःखाबरोबर पूर्वीप्रमाणें त्यांचा अभिमान कांहीं प्रज्वलित झाला नाहीं. बाळकृष्ण आणि सखू मोलकरीण यांच्याबरोबर त्या लागलीच सासरीं निघून आल्या.

जगू आणि दामू येतांच राधाबाई आनंदानें अधीर होऊन गेल्या. गाडींतून उतरतांच दोघेहि आजीला बिलगूं लागले; कोणाला पहिल्यानें जवळ घ्यावा या विचारानें ह्मातारीहि अगदीं अस्थिर झाली. इतक्यांत आमच्या धाकट्या सूनबाईंनीं लहानग्या दामूला उचलून कडेवर घेतलें आणि जगू आजीला बिलगून राहिला. ह्मातारीनें त्यालाहि उचलून कडेवर घेतलें. जगू मनांतल्या मनांत ह्मणूं लागला "आपल्यालाच आजीनें पहिल्यानें घेतलें, तेव्हां आपणच जिंकलों, दामू हरला." या विचारानें जगूचें मुखकमल प्रफुल्लित दिसूं लागलें.

लक्ष्मीबाईंनीं पार्वतीबाईंनां प्रणाम केला आणि मोठ्या प्रेमानें त्यांचा हात धरून त्यांनां घरांत घेऊन आल्या. पार्वतीबाईंनीं सासूबाईंनां नमस्कार करितांच ह्मातारीनेंहि सुनेला अनेक आशीर्वाद दिले. वडील सुनेचे सर्व अपराध राधाबाई आतां विसरून गेल्या होत्या. आज जगू आणि दामू यांनां घेऊन मोठ्या आनंदानें त्यांच्या खाण्यापिण्याच्या गडबडींतच त्या गर्क होऊन गेल्या. आमच्या धाकट्या सूनबाई जेव्हां आपल्या बापाच्या घरून सासरीं आल्या होत्या, तेव्हां जसा सगळा गांव मोठ्या आल्हादानें त्यांनां भेटण्याकरितां लोटला होता, तसा आज थोरल्या सूनबाईच्या आगमनानें कांहीं कोणालाहि आल्हाद झाला नाहीं आणि कोणी त्यांनां भेटावयाला येण्याच्या भानगडींतहि पडलें नाहीं.

जाऊबाईनां घरांत आणून बसविल्यावर लक्ष्मीबाईनीं अगदीं नम्रपणें विचारलें "जाऊबाई, मजसारख्या अजाण मुलीवर संसाराचा सर्व भार टाकून आपल्या-च्यानं आजवर निश्चिंत बसवलंतरी कसं ?"

"काय बाई करावं! सासूबाईनां कांहीं मी डोळ्यांसमूर नको आहें; मला पाहिलं, कीं, त्यांच्या कपाळाची शीर उठते. मग माझंतरी एवढं काय अडलं आहे ?"

"सासूबाईचं का आतां मनावर घ्यायचं जाऊबाई? अहो त्या आतां वृद्ध झाल्या आहेत. त्यांच्या बोलण्याचा का आतां राग मानायचा ?"

"मला नाहीं बाई खपत उगीच्या उगीच एकाद्यानं आपल्याला अद्वातद्वा बोललेलं ! विनाकारण कोण हें असलं सोसून घेणार आहे ? तुमचं बाई ठीक आहे हो ! सासूबाईची आहे तुमच्यावर मर्जी. तुह्मांला कांहीं त्या अवाक्षरसुद्धां बोलत नाहींत. माझ्यासारखं जर का तुमच्यावरहि तोंड घेत्या तर मग तुह्मीतरी इथं राहिलां असतां ?"

"जाऊबाई, आपण दोघीहि जर त्यांच्या मनाप्रमाणंच वागूं लागलों, तर त्यातरी कां बरं आपल्यावर तोंड टाकतील ? त्यांतूनहि सासूबाई कधींकाळीं दोन शब्द बोलल्याच, तर बोलतनाका ? आपण हो कशाला त्यांच्या तोंडाशीं तोंड द्यावं ? बरं चला, राहूंद्या त्या गोष्टी आतां. पहिल्यानं हातपाय धुऊन थोडा फराळ नाहीं का करायचा ? केव्हांची मेली भूक लागली असेल ती."

असें ह्मणून लक्ष्मीबाईनीं तत्काळ जाऊबाईच्या फराळाची व्यवस्था करून दिली. पार्वतीबाईनीं पाहिलें, आतां कांहीं संसाराची ओढाताण दिसत नाहीं, दारिद्र्याचें चिह्नदेखील आतां दृग्गोचर होत नाहीं—जिकडे पहावें तिकडे अगदीं लखलखचक दिसत आहे. परंतु काय चमत्कार! पार्वतीबाईचें अंतःकरण कांहीं हा प्रकार पाहून तुष्ट झालें नाहीं. उलट ईर्ष्यानलानें तें जळूं मात्र लागलें !

---

## प्रकरण पस्तिसावें.

### विषवृक्षाचें बीजारोपण.

जसजशी संधी मिळत गेली तसतशी शेतकी आणि व्यापारधंद्याची सर्व व्यवस्था आमच्या धाकट्या सूनबाईनीं आतां सदाशिवरावांच्या स्वाधीन केली; विनायकरावजी अर्थात् त्यांचे मदतनीस बनले. लक्ष्मीबाईनीं आपलें संपूर्ण लक्ष्य आतां सांसारिक कार्यांत घातलें होतें. घरांत कांहीं आहे नाहीं पहाणें, स्वयंपाक करणें, वाढणेंसवरणें वगैरे सर्व कामांचा भार आतां आमच्या धाकट्या सूनबाईनीं

उचलला. तरीहि पार्वतीबाई ह्मणजे अगदीं कांहींच काम करीत नसत, असें मात्र आमचें मुळींच ह्मणणें नाहीं. धाकट्या सूनबाई संसाराचीं सर्व कामें करीत— थोरल्या सूनबाईहि संसाराचींच कामें करीत. परंतु तीं आपण, आपला पति आणि आपलीं मुलें यांच्या जेवणाखाण्याचा चांगला बंदोबस्त रहावा, एवढ्याचसंबंधाचीं! लक्ष्मीबाई फुरसद मिळाली असतां 'रामायण,' 'महाभारत' 'श्रीमद्भागवत' इत्यादि बोधप्रद ग्रंथ शेजारपाजारच्या स्त्रियांनां ऐकवीत—पार्वतीबाईहि नानाप्रकारचीं अभद्र नाटकें, कादंबऱ्या, गाण्यांचीं पुस्तकें, वगैरे वाचून आळींतील इतर स्त्रियांनां आपल्या शिक्षणाचा परिचय देत. लक्ष्मीबाई जगूला आणि दामूला लिहिण्यावाचण्याला शिकवीत—पार्वतीबाईहि त्या वेळीं स्वतः चित्रें काढण्याचा उद्योग करीत! लक्ष्मीबाई सुईसूत घेऊन मुलांचे कपडे, सदरे बंड्या वगैरे शिवण्यास बसत—आमच्या पार्वतीबाईहि लोंकरीच्या कांहींतरी सर्वथैव निरुपयोगी वस्तू विणीत बसत. असें असतां राधाबाई आपल्या थोरल्या सुनेला आळशी, कामचुकारू वगैरे विशेषणें देण्यास कशा धजत असत, आह्मांला कांहीं त्याचें बरोबरसें कारण समजत नाहीं!

आणखी खरीच गोष्ट सांगावयाची तर या कामांशिवाय पार्वतीबाईनां दुसरें कांहीं काम सांगितलें असतां त्या तिकडे लक्ष्य देत नसत—हेंसुद्धां कबूल करण्याला आह्मी तयार नाहीं. कारण पार्वतीबाईनां कोणीं जर प्यालाभर पाणी आणण्यास सांगितलें, तर तत्क्षणीं त्या तें आणून देत. आतां इतकेंच, कीं, प्यालाभर पाणी आणतांना निदान एकादी कळशीभर तरी पाणी सहज जमिनीवर सांडत असे. बरें एकादे दिवशीं स्वयंपाक करण्यास मदतीस बोलाविलेंच, तर पार्वतीबाई कधींहि नाहीं ह्मणत नसत. इतकें मात्र होई, कीं, त्या दिवशीं जेवणाचा प्रत्येक पदार्थ करपून जळून खाक होई आणि स्वयंपाक बहुतेक पुनः करावा लागे! सारांश, आमच्या धाकट्या सूनबाई जें कांहीं जोडीत तें थोरल्या सूनबाई मोडीत! तेव्हां असें असतांना राधाबाईबरोबर आह्मीं कसें बरें ह्मणावें कीं, पार्वतीबाई आळशी, पार्वतीबाई काम ह्मणून कांहींएक करीतच नसत!

जाऊंद्या, तें कसेंका असेना, यामुळें गृहकार्यांत कांहीं मोठासा घोटाळा झाला नाहीं. कारण धाकट्या सूनबाई सगळीकडे नजर ठेवून सांभाळून घेत. इतकेंच नव्हे, पार्वतीबाईच्या हातून जरी कांहीं अपराध झाला तर तोहि लक्ष्मीबाई आपल्याच अंगावर घेत आणि यामुळें राधाबाईनां आपल्या थोरल्या सुनेला कांहींएक बोलतां येत नसे.

## विषवृक्षाचें बीजारोपण.

यानप्रमाणें सहा महिने लोटले. एक दिवससुद्धां कोणाचा तंटा की भांडण झालें नाहीं. सदाशिवराव प्रमुख चालक होऊन मोठ्या मानसंभ्रमानें घरांत बसल्या बसल्या संसार चालवूं लागले. इतक्यांत एके दिवशीं तिसऱ्या प्रहरीं पार्वतीबाईच्या अक्का गंगाबाई यांचा ' फेरा ' तेथें आला. गंगाबाईच्या आगमनानें पार्वतीबाईसुद्धां एकंदर मंडळी विस्मित झाली. आमच्या धाकट्या सूनबाईनीं त्यांचें योग्य प्रकारें आदरातिथ्य केलें. बहिणीची झालेली दुर्दशा पाहून पार्वतीबाईला फारच कष्ट झाले. त्यांनींहि गंगाबाईची मोठ्या कळकळीनें विचारपूस केली.

भोजनादि आटोपल्यानंतर पार्वतीबाईनीं बहिणीला आपल्या खोलींत नेऊन विचारलें " ताई, मावशीच्या घरची सगळी मंडळी खुशाल आहे ना ? "

गंगाबाईनीं उत्तर दिलें " आग लागो ग तुझ्या त्या मावशीच्या तोंडाला ! मेली मरेना का एकदांची ! अग, असली मावशी बरी असणार नाहीं, तर मग बरं असणार तरी कोण ? तिला ग कसली धाड भरते आहे ! "

" मावशींबरोबर कांहीं भांडणबिंडण झालं वाटतं ? कां बरं ताई, भांडण व्हायला काय झालं ? "

" सगळं सांगूं लागल्यास तो एक मोठा ग्रंथच होईल. तिच्या मुलाचा आणि सुनेचा तंटा झाला—तोहि माझाच दोष ! जणों कळ लावल्यावांचून मला दुसरा कांहीं धंदाच नाहीं ! बरं तें राहो, पण तिच्या त्या मेल्या मस्त कारट्याची करणी तर पहा !"असें ह्मणून गंगाबाईनीं पाठीवरचा पदर बाजूला करून जागोजाग उठलेले वळ दाखविले. ते वळ पहातांच पार्वतीबाईच्या अंगावरतर कांटाच उभा राहिला ! त्यांनीं अगदीं हळूच गंगाबाईला सांगितलें "ताई, ऐकलंस, इथं ही गोष्ट अगदीं उघडकीस येऊं देऊं नकोस बरं ? नाहींतर मग तोंड काढायलाहि जागा रहायची नाहीं !"

बहिणीची ही दुर्दशा पाहून पार्वतीबाईचें हृदय अगदीं व्यथित झालें. जिला कोणाचें नुसतें बोलणेंदेखील सहन होत नसे, तीच गंगाबाई लोकांच्या हातचा असा भयंकर मार खाऊन तेथून बहिष्कृत होऊन आज आपल्या घरीं आश्रयास आली असतां तिची विशेष काळजी घेतल्यावांचूच का पार्वतीबाईच्यानें रहावणार आहे !

सरासरी एक महिना मोठ्या आनंदांत गेला. सगळीं माणसें गंगाबाईबद्दल विशेष कळकळ दाखवूं लागलीं. परंतु गंगाबाईचा 'फेरा' आल्यापासून बिचाऱ्या मनोरमेच्या दुःखाला सीमाच नाहींशी झाली. गंगाबाईला पहातांच बालिकेच्या

शरीरांतील रक्त सुकत चाललें. त्या दिवसापासून मनोरमेनें घाबरून दीक्षितांचें घरच प्रायः वर्ज्य केलें. कधींकाळीं ती बिचारी आलीच तर अगदीं गुपचूप भीत भीत येऊन केवळ लक्ष्मीबाईनांच भेटून जात असे. गंगाबाईच्या पाठीवरील वळ जेव्हां संपूर्ण बसले आणि पार्वतीबाई आपल्या पूर्ण कह्यांत आल्याचें जेव्हां त्यांनां वाटलें तेव्हां गंगाबाईनीं पुनश्च आपलें खरें स्वरूप धारण केलें. एके दिवशीं दोघी वहिणी बोलत बसल्या असतां गंगाबाईनीं उपक्रम केला "काय ग गोदे, तुझी धाकटी जाऊ ह्मणजे तुझी सासू वाटतं ? ती करील ती पूर्वदिशा. तुझ्याकडे तर कुणी ढुंकूनसुद्धां पहात नाहीं."

"तें तसंच आहे ग ताई. तिचं मोठं प्रस्थच माजून राहिलं आहे."

"अग, तें का तूं मला सांगायला पाहिजे ? मीं तें सगळं डोळ्यांनीं पहात आहें."

"काय बाई करावं ! आमच्या इथला स्वभावतर तुला ठाऊकच आहे. त्यांच्यापुढं का माझं चालतं आहे ?"

"आपल्या बायकोपोरांनां देशोधडीला लावून भावालाच घेऊन बसणार कीं काय ते ?"

"मी काय सांगूं ताई ! त्यांचा स्वभाव असा आहे, कीं, मला एक अक्षरसुद्धां बोलवत नाहीं. आपलं मनांतलं दुःख मनांतच ठेवावं लागतं."

"आजपर्यंत माझा समज होता, कीं, सदाशिवरावांच्या अंगांत कांहीं पाणी असेल. काय बाई चमत्कारतरी ! हा चांगला शिकलेलासवरलेला—याला आपलं स्वतांचं हिताहितदिखील का मेलं कळूं नये ?"

"ताई, हे सगळे देवाचे खेळ आहेत बरं ! हेंच पहाना, लक्ष्मीची ख्याति सगळ्या गांवभर होऊन राहिली आहे; परंतु जळलीं मेल्यांचीं तोंडं तीं, मी काय मेल्यांचीं जशीं बोडींच मारलीं आहेत—माझं नांव ऐकलं, कीं, मेल्यांच्या अंगाला जणूं आगच लागते !"

"हं, आतां आलं माझ्या ध्यानांत. हें पहा गोदे, ही तुझी जाऊ तुझा संसार बुडवायला बसली आहे. तुझ्या आजवर हें लक्ष्यांतच आलं नाहीं वाटतं ! अग, तिला कांहीं मुलंबाळं नाहींत, तेव्हां मारे सत्यनारायणाच्या पूजा कर, ब्राह्मण-भोजन घाल, अतिथि, भिकारी कोणी कां येईना, त्याला यथेच्छ खायला घाल, असे हवेतसे पैसे ती उधळीत आहे ! देवाच्या दयेनं तुला दोन सोन्यासारखीं

लेंकरं आहेत, दोन पैसे राहिले तर ते त्यांनांच मिळतील. पण हें कुठून तिच्या जिवाला सोसायचं आहे ? अग ह्मणूनच तर ती हवा तसा पैसा उधळते आहे."

"खरंच ग ताई, तूं ह्मणत्येस तेंच खरं ! ते दिवशींच तूं नाहीं का मला सांगितलंस—'ज्याच्या हातांत ससा तो पारधी.' आतां मला तुझ्या त्या बोलण्याचं इंगित समजलं. बरं, पण याला कांहीं उपाय नाहीं का ?"

"अग उपायाला काय कमी ! एक सोडून हजार उपाय आहेत. तूं आपली वेगळी हो कशी ! हें पहा, तुझा नवरा विद्वान्, शहाणासुरता आहे; आणि तिचा तर अगदीं मूर्ख, अक्कलशून्य ! एकत्र राहिल्यानं तुझंच नुकसान. तिचं काय आहे?"

"तें सगळं मला समजतं, पण उपयोग काय ? ते कबूल झाले पाहिजेत ना ? ताई, तूं त्यांनां विद्वान्, शहाणे समजतेस, परंतु मला तर वाटतं-ते आपले पढतमूर्ख आहेत झालं."

"मी तुला सांगत्यें एक नामी युक्ति. तूं सासू आणि जाऊ यांच्याशीं भांडायला सुरुवात कर पाहूं कशी, ह्मणजे बघ वेगळं व्हायची आपोआप संधी येते कीं नाहीं. अग वेडे, असं हंसण्याखेळण्यावारी दिवस घालवून का कुठं कामं होत असतात ?"

यानंतर दोघी बहिणींचें कांहीं गुप्त खलबत झालें. सुपीक जमिनींत बीं पेरण्याचाच अवकाश-तत्क्षणीं मोड फुटलेच ! दुसऱ्याच दिवसापासून कलहप्रिय गंगाबाईनीं रोविलेल्या विषवृक्षाचीं कडू फळें, आजवर सुखासमाधानांत नांदणाऱ्या दीक्षितांच्या घरांत दृग्गोचर होऊं लागलीं. राधाबाई आणि त्यांची थोरली सून यांचीं भांडणांवर भांडणें होऊं लागलीं. आमच्या धाकट्या सूनबाईनीं हे तंटे मिटविण्याकरितां आपली शिकस्त करावी, परंतु व्यर्थ ! उलट पार्वतीबाई आणि गंगाबाई यांच्या तोंडचे अनेक कर्णकटु शब्द मात्र त्यांनां ऐकून घ्यावे लागत. परंतु लक्ष्मीबाईनीं तिकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. दररोज याप्रमाणें सासूसुनांचा कलह होऊं लागला. धाकट्या सूनबाईनां या भांडणांच्या कचाटांत ओढून घेण्याला त्या दोघी बहिणी अगदीं जिवापाड यत्न करीत; परंतु त्यांत कांहीं त्यांनां यश येईना. बिचारे सदूभाऊ मोठ्या विपत्तींत पडले. त्यांच्या अंगचा मोठा दोष ह्मणजे हाच, कीं, आपल्या त्या कजाग पत्नीच्या समोर आले, कीं, ते अगदींच मेषपात्र होऊन जात, त्यांचें तोंडच बंद होई. एके दिवशीं भांडूनभांडून अगदीं थकून जाऊन पार्वतीबाई आपल्या पतीला ह्मणाल्या "आपल्याच्यानं हें कांहीं आतां सहन करवत नाहीं; तुह्मीं याचा कायतो एकदा सोक्षमोक्ष केलाच पाहिजे. आपला

शहाणा मुलगा आणि शहाणी सून घेऊन यांनां खुशाल राहूंद्या, आपण आपलं वेगळं करूं. आपलं इथं कांहीं आतां मुळींच जमायचं नाहीं.'

पत्नीची ही अतर्क्य कल्पना ऐकतांच सदाशिवरावांचे डोळे उघडले. आजपर्यंत चाललेल्या तंट्याबखेड्यांचें मूळ ताबडतोब त्यांच्या लक्ष्यांत आलें. हे तंटे ह्मणजे या थरावर जातील, ही कल्पनाहि पहिल्यानें त्यांच्या मनांत आली नव्हती. आपल्या कजाग पत्नीच्या तोंडून अकस्मात् हें असें विलक्षण भाषण ऐकतांच सदूभाऊंनां अत्यंत राग आला. त्या रागाच्या आवेशांत ते ह्मणाले "हीं भांडणें आणि हे तंटे करण्याचा तुझा उद्देश इतक्या दिवसांनीं आज मला समजला. मी तुला अगदीं स्पष्ट सांगतों, प्रसंग पडला तर मी तुलासुद्धां टाकून देईन, पण आईला ह्मणून कधींहि अंतर देणार नाहीं! आणखी एक तुला सांगतों, माझें इथें आहे काय? जें कांहीं थोडेंबहुत आहे तें सगळें विनूचें. कारण त्याच्या बायकोमुळेंच हें सगळें झालें आहे. आपला सध्यां चरितार्थ त्यांच्याच अन्नावर चालला आहे. असें असून तुला एवढा अभिमान तरी कसला चढला आहे आणि तूं वेगळीतरी होणार कशाच्या जोरावर?"

पार्वतीबाई निरुत्तर झाल्या. काय बोलावें हेंच त्यांनां सुचेना. क्षणार्धांत पराकाष्ठेच्या क्रुद्ध होऊन रागारागानें त्या ह्मणाल्या "काय! काय ह्मटलंत? भावासाठीं तुह्मी मला टाकून द्याल? ठीक आहे, खुशाल टाका. काय मेली मजा पहाना! आपण एकाद्यासाठीं रात्रंदिवस मरमर मरावं आणि त्याच्या मात्र तें खिसगणतींतसुद्धां नाहीं! मग मलातरी एवढी पोटदुखी कशाला पाहिजे? गांवांतील मेले सारे लोक तुमच्या भावजयीच्याच पक्षाचे झाले आहेत, तेव्हां तुह्मीहि त्यांनांच जाऊन मिळाल्याखेरीज कसे रहाल?"

सदूभाऊ अगदीं स्तब्ध. शांतपणानें ते पत्नीचे कठोर शब्द ऐकत होते. त्या भयंकर मूर्तीसमक्ष त्यांनीं आपल्या रागाचा बिलकूल परिचय दिला नाहीं. धीरवृत्तीनें ते ह्मणाले "चार संभावित लोक ज्या पक्षाला मिळतात, तो पक्ष कोण स्वीकारणार नाहीं? आजवर तुझ्या तोंडून मीं असे शब्द ऐकले नाहींत आजवर आईबरोबर तुझा कोणत्याहि प्रकारें वादविवाद झाला नाहीं. मी पक्कें समजून चुकलों आहें—या सगळ्याचें मूळ तुझी ती बहीणच आहे. ती आल्या दिवसापासूनच तुझ्या मनानें उलट खाल्ली आहे. सर्व अनर्थाचें मूळ तुझी ती बहीण गंगाबाईच आहे, समजलीस?"

इतक्यांत पश्चाद्भागांतून अकस्मात् शब्द झाला "काय ! तुमच्या या सर्व अनर्थाला मूळ मी ?"

सदूभाऊंनीं मागें वळून पाहिलें—गंगाबाई !

अन्यप्रसंगीं काय झालें असतें कोणाला ठाऊक, परंतु पत्नीच्या अन्यायाच्या भाषणानें सदूभाऊंचें डोकें आज अगदीं भणाणून गेलें होतें. त्यांनां आज भाडभीड राहिली नव्हती आणि ती निर्जीवताहि पण राहिली नव्हती. त्यांनीं पुनः बोलण्याचें साहस केलें "हो हो ! तूंच तूंच !"

आतां मात्र गंगाबाई किंचित् नरम झाल्या. त्या ह्मणाल्या "आणि जी तुमचा पैसा पाण्यासारखा उडवीत आहे, दानधर्म करून जी आपलं नांव सारा गांवभर गाजवीत आहे, तुमच्या मुलांलेंकरांचा जी सर्वस्वीं नाश करीत आहे. तुह्माला रस्त्यावरील भणंगभिकारी करून टाकण्याचा जिचा यत्न चालू आहे—"

सदूभाऊ त्वेषानें मध्येंच ह्मणाले "हें तूं कुणाविषयीं बरळत आहेस ?"

"दुसरी कोण-ती तुमची भावजयच—"

दुःशीला गंगाबाईच्या तोंडून सुशीला लक्ष्मीबाईची निंदा ऐकून सदूभाऊंचा क्रोधाग्नि अधिकच प्रज्वलित झाला. पापाच्या समोर पुण्याची अवमानना, अपवित्रतेसमोर पवित्रतेचा अनादर पाहून त्यांच्या अंतःकरणाला डागण्या लागल्या. क्रोधानें कांपतकांपत ते ह्मणाले "पापिणी ! तूं तिच्या गोष्टी तोंडानें उच्चारूंहि नकोस !"

कां ? कां बरं—"

"कां ? तुला लज्जा वाटत नाहीं ? ती स्वर्ग-तूं नरक, ती धर्म-तूं अधर्म, ती लक्ष्मी-तूं अवदसा ! तुझ्या तोंडांत का तिचें नांव शोभतें ?"

बंद केलेल्या भांड्यांत नुकताच पकडून ठेविलेला सर्प जसा फोंफावत असतो, अगदीं तशाच गंगाबाई सदूभाऊंचे हे शब्द ऐकून फोंफावूं लागल्या. गंगाबाईच्या अंगांत जर कांहीं सामर्थ्य असतें; तर आज त्यांनीं काय केलें असतें, वाचकांनींच कल्पना करावी ! एकदोन शब्द बोलून सदूभाऊ तेथून चालते झाले. किंचित्कालानें गंगाबाईहि जरा स्थिर झाल्या; परंतु आज घडलेल्या या प्रकारानें सर्वांपेक्षां आमच्या धाकट्या सूनबाईवर त्या अत्यंत खवळल्या आणि या गोष्टीचा सूड उगविण्यासाठीं गंगाबाईची स्वारी अगदीं अस्थिर होऊन राहिली.

---

# धाकट्या सूनबाई.

## प्रकरण छत्तिसावें.

### गंगाबाईंचा सूड.

सदाशिवराव दीक्षितांच्या घरीं आज कोण आकांत उडला आहे ! त्यांचे दोन्ही मुलगे जगू आणि दामू बेशुद्ध होऊन पडले आहेत. डॉक्टरानें येऊन परीक्षा करून सांगितलें, कीं, कांहीं विषारी पदार्थ पोटांत गेल्यामुळें यांची अशी व्यवस्था झाली आहे. घरांतील सर्व मंडळी या दोघां मुलांसाठीं अगदीं हताश होऊन गेली असून या आकस्मिक भयानक प्रसंगानें सर्वांचीं अंतःकरणें खिन्न झालीं आहेत. जगूला आणि दामूला डॉक्टराचें औषध पाजण्याची विनायकरावजींची तर अगदीं गडबड उडून गेली आहे. राधाबाई देवघरांत जाऊन देवांपुढें डोकें आपटीत बसल्या आहेत. पार्वतीबाई तर रडूनरडून आकाशपाताळ एक करीत आहेत. आमच्या धाकट्या सूनबाई डॉक्टरच्या सांगण्याप्रमाणें मुलांची शुश्रूषा करीत आहेत. हा असा सर्वस्वीं नाश कोणीं केला ह्मणून गंगाबाई अजस्र गालिवर्षाव करीत आहेत. आणि आमचे सदूभाऊ एकदम हतबुद्धच होऊन वेड्यासारखे टकमक पहात आहेत.

इतक्यांत दिलेल्या औषधानें आपला प्रभाव दाखविला. मुलांनां क्रमाक्रमानें वांति होऊं लागली. सर्व मंडळीच्या मनांत पुनः आशेचा अंकुर उद्भवला; आणि पुनः जेव्हां डाक्टरानें येऊन परीक्षा करून 'आतां कांहीं भिण्याचें कारण नाहीं असें आश्वासन दिलें, तेव्हांतर ती आशा बरीच बळावली. कांहीं काळानें मुलें चांगलींच हुषार झालीं. जेवतांना कसलें विष पोटांत गेल्यामुळें तीं बेशुद्ध पडलीं, हें जाणण्याची डॉक्टरसाहेबांनां आतां अनिवार उत्सुकता झाली होती. वांतीचें ते अगदीं बारकाईनें निरीक्षण करूं लागले. सगळ्यांचीं जेवणें झालीं होतीं, असें असतां या दोघां मुलांच्याच अन्नांत हें विष कोठून आणि कसें आलें, हें जाणण्याला सर्वच उत्सुक झाले होते. डॉक्टरसाहेबांनां पहिल्यानें वाटलें होतें, कीं, कांहीं विषारी भाजीपाला खाल्यानें अगर दुसऱ्या कांहीं दैविक घटनेनें हा प्रकार झाला असावा. परंतु परीक्षणाअंतीं त्यांनां जें कांहीं दिसून आलें, त्यानें तर ते विस्मितच होऊन गेले. परीक्षेवरून असें कळून आलें, कीं, वांतीमध्यें अफू मिश्र आहे. कोणींतरी मुद्दाम घातल्याविना जेवणाच्या पदार्थांत अफू यावी कशी ? त्यांनीं उघडपणें सगळ्यांनां सांगितलें, कीं, "कोणीं दुष्टानें जेवणाच्या पदार्थांत या मुलांनां अफू घातली होती. अर्थात् यांत त्याचा उद्देश मुळींच चांगला

नव्हता. तें कसेंहि असो, भोजनोत्तर तावडतोब वांतीचें औषध पोटांत गेलें म्हणून बरें झालें; नाहींतर निःसंशय प्राणहानिच झाली असती."

ही गोष्ट ऐकून समस्त मंडळी विस्मितच झाली. हें दुष्ट कृत्य कोणाच्या हातून घडलें असावें, याच विचारानें सगळ्यांचीं मनें व्यग्र झालीं. शेजारपाजारची बरीच मंडळी आतां तेथें जमली होती. इतक्यांत डॉक्टर म्हणाले "अहो पण अफू मिळाली कुठून ? तुमच्या इथें कोणी अफू खातें कीं काय ?"

कोणीहि ही गोष्ट कबूल करीना. डॉक्टर किंचित्काळ विचार करून म्हणाले "जिनें स्वयंपाक केला किंवा जिनें मुलांनां खायाला घातलें, तिच्या हातूनच हें कृत्य झालें असलें पाहिजे. कोणीं बरें आज स्वयंपाक केला ?"

हा प्रश्न निघावयाचीच खोटी, तत्क्षणीं गंगाबाईनीं चट्दिशीं उत्तर दिलें "लक्ष्मीनं."

आमच्या धाकट्या सूनबाईनांहि ही गोष्ट नाकबूल करतां येण्यासारखी नव्हती. कारण खरोखरच आज त्यांनींच स्वयंपाक केला होता, आणि स्वयंपाक आटोपतांच त्यांनींच प्रथम आपल्या हातानें दोन्ही मुलांनां जेऊं घातलें होतें.

गोष्टीवरून गोष्ट वाढत चालली. लक्ष्मीबाई तेथेंच होत्या तरी त्यांच्या तोंडून कोणीं एक शब्ददेखील ऐकिला नाहीं. बराच वेळ सगळी मंडळी अगदीं स्तब्ध होती.

सरतेशेवटीं सदूभाऊ दीर्घ निश्वास टाकून म्हणाले "माझी पत्नी आणि तिची बहीण यांनीं लक्ष्मीचे अनेक अपराध केले असतील; परंतु मीं किंवा या माझ्या दोन्ही अर्भकांनीं तिचा कांहींएक अपराध केलेला नाहीं; असें असतां माझा असा सर्वतोपरी नाश करण्यास लक्ष्मीनें उद्युक्त व्हावें काय ?"

दिराच्या या शब्दांनीं आमच्या धाकट्या सूनबाईनां प्राणांतिक दुःख झालें यापेक्षां अकस्मात् त्यांच्या मस्तकावर वज्राघात झाला असता तरीदेखील आम्हाला वाटतें, त्यांचा प्राण इतका व्यथित झाला नसता. सदूभाऊंचें भाषण ऐकून तेथें जमलेले सर्व लोकहि विस्मित होऊन मनांतल्यामनांत 'असंभवनीय, असंभवनीय' म्हणतम्हणत तेथून चालते झाले. परंतु गंगाबाई आणि पार्वतीबाई यांनीं कांहीं हा सुयोग वायां जाऊं दिला नाहीं. कितीतरी दिवसांनीं आज त्यांची मनोवांच्छा पूर्ण झाली होती. त्यांनीं यावर नानातऱ्हेचा कोटिक्रम लढवून आमच्या धाकट्या सूनबाईवर सारखा भडिमार चालविला. आज गंगाबाईच्या

आनंदाला पारावार नाहींसा झाला. त्यांचा आनंद किंचित्कालदेखील पोटांत मावेना. आजच्या या भयंकर प्रसंगानें जरी त्या दोन्ही बालकांचें देहावसान झालें असतें, तरीदेखील गंगाबाईला त्याबद्दल फारसें वाईट वाटलें नसतें! दोघी बहिणी मिळून आतां जेणेंकरून या गोष्टीचा सगळ्या गांवभर डंका वाजेल, असा प्रयत्न करूं लागल्या. सदूभाऊ खिन्न वदनानें बाहेर ओटीवर येऊन बसले. ती गोष्ट त्यांच्या मनाला इतकी कांहीं लागली, कीं, त्या संबंध दिवसांत पुनः ह्मणून कांहीं ते घरांत गेले नाहींत. आमचे विनोबातर आज हतबुद्धच होऊन गेले होते. मधूनमधून ते आपल्या सुशील पत्नीच्या अश्रुप्लावित मुखकमलाकडे पहात आणि अधिकाधिक विस्मित होत. इतक्यांत पार्वतीबाई तडकफडक करीत तेथें आल्या व आमच्या धाकट्या सूनबाईंनां उद्देशून ह्मणाल्या "तुझी मनोवांच्छा पुरली नाहीं ह्मणून आतां इथं रडत बसली आहेस वाटतं ? तुझ्या पोटांत इतकं काळं भरलं असेल हें कुणाला बाई माहीत !"

असें ह्मणून पार्वतीबाईनीं लक्ष्मीबाईनां आपल्या मुलांजवळून उठवून लाविलें. आमच्या धाकट्या सूनबाई तेथून उठून आपल्या सासूजवळ येऊन बसल्या आणि रडतरडत ह्मणूं लागल्या "आपल्यालाहि पण ही गोष्ट खरीच वाटते ना ?"

म्हातारी पदरानें सुनेचे डोळे पुशीतपुशीत ह्मणाली "छे ग बाई ! मीं माझ्या डोळ्यांनीं जरी पाहिलं तरीदिखील मीं हें खरं मानणार नाहीं. नको ग तूं आपल्याला असं वाईट वाटून घेऊं नि रडूं ! माझी बाई ती !"

सासूचें हें प्रेमळ भाषण ऐकतांचतर लक्ष्मीबाईनां आतां मुळींच धीर धरवेना. त्या उच्चस्वरानें रुदन करीत ह्मणाल्या "माझ्यावरचा हा आळ कसा हो जाईल ? आपण तरी याला कांहीं उपाय सांगा."

म्हातारी सुनेचें शांतवन करून ह्मणाली "बाई ग ! तुझ्यासारखी बुद्धिवान् मुलगी मीं आजवर पाहिली नाहीं, आणि असं असून तूं इतकी अस्थिर कां होते आहेस बाई ? काय बरं तुला मी सांगूं मुली ! अग ही गोष्ट कधीं कुणी खरी तरी मानणार आहे ? तुला कधीं असा कलंक लागण्याचा संभव तरी आहे ? मी सगळं समजून आहें—हें कारस्थान त्या काळतोंडीचंच आहे. अवदसा माझा सोन्यासारखा संसार धुळीस मिळवायला आली आहे."

सासूच्या या शब्दांनीं आमच्या धाकट्या सूनबाईच्या जिवांत जीव आला. किंचित् स्थिर होऊन त्या तेथून उठल्या आणि पतीची गांठ घेऊन त्यांनां ह्मणाल्या "आपल्याला काय वाटतं याबद्दल ?"

विनायकरावांनीं उत्तर दिलें "माझी अगदीं पक्की खात्री आहे, कीं, हें कृत्य त्या दुष्ट गंगाबाईचेंच आहे. त्या चांडाळणीशिवाय असें राक्षसी कृत्य करण्याला धजण्याजोगी स्त्री अथवा पुरुष या पृथ्वींत निखालस नाहीं, हें मी खात्रीनें सांगतों. पण लक्ष्मी, तुझें तें धैर्य आज कुठें गेलें? अग, दादाच्या तोंडून निघालेले शब्द तापलेल्या डागणीप्रमाणें माझ्या काळजांत चरचरत गेले आहेत; तूं कां बरें इतकी अधीर होतेस ? सत्य कधींहि गुप्त राहणार नाहीं."

लक्ष्मीबाई मोठ्या आवेशानें ह्मणाल्या "सत्याचा जय होईलच होईल, याबद्दल माझी पक्की खात्री आहे !"

परंतु ही गोष्ट कांहीं सहजासहजीं दबली नाहीं. सदाशिवरावांच्या मनांतील संदेह कांहीं केल्या दूर ह्मणून होईना. कारण, मावशी प्रत्यक्ष आपल्या भाचांनां विष घालील हें शक्य नाहीं, हा त्यांचा दृढ विश्वास होता; आणि जिवापाड यत्न करून पार्वतीबाईनीं त्यांचा तो विश्वास दृढतर करून ठेविला होता. शेवटीं नीच मसलतीच्या नादीं लागून सदाशिवरावांनीं वेगळें होण्याचादेखील प्रस्ताव केला; परंतु त्यांनां वेगळें होऊं न देतां, उलट आमच्या धाकट्या सूनबाई स्वतःच यावज्जन्म माहेरीं जाऊन रहाण्यास कबूल झाल्या; पण राधाबाई कांहीं केल्या या गोष्टीस कबूल होईनात. तेव्हां लक्ष्मीबाईनींच आपल्या सासूची विनवणी केली. "आपण अनेक कष्ट सोसून जो हा संसार जमविला आहे, तो एकदा का बिघडला, ह्मणजे पुनः कांहीं जुळायचा नाहीं. सासूबाई, माझी काय योग्यता आहे ? माझ्यासाठीं कां बरं आपण या सोन्यासारख्या संसाराची फाटाफूट करतां ? इथून जायला मला आणखी कशाबद्दल वाईट वाटत नाहीं; परंतु ही अभागिनी आपल्या सेवेला मात्र आंचवली, याचंच मला अत्यंत दुःख होत आहे."

सुनेच्या भाषणानें राधाबाईला रडूंच कोसळलें. रडतरडत त्या , ह्मणाल्या "तुझी योग्यता काय! बाई ग, तूंचतर माझ्या या संसाराची लक्ष्मी आहेस. तूं गेलीस, कीं, माझा संसार आटोपलाच ! मुली, तूं गेल्यावर मलातरी हा संसार घेऊन काय करायचं आहे ? तूं मजजवळ असलीस, मग तो सगळा संसार बुडाला तरीदिखील मला त्याची पर्वा नाहीं."

ह्मातारी मोठमोठ्यानें रडूं लागली. पुढें कांहीं तिच्यानें बोलवेना. ,आईचा शोकस्वर ऐकतांच विनायकराव तेथें आले आणि ह्मणाले "आई, सत्य कधींहि लपून रहाणार नाहीं. असाच एक दिवस खात्रीनें येईल, कीं, त्या दिवशीं आज उच्चारिलेल्या शब्दांबद्दल दादाला पुरापुरा पश्चात्ताप करावा लागेल. हिनें आत

इथें रहाण्यांत कांहीं मजा दिसत नाहीं. दोन दिवसांनीं ह्मण अगर दोन महिन्यांनीं ह्मण, सत्य हें बाहेर यावयाचेंच. मग इला पुनः आणावयाला अवकाश ग कितीसा? दादापासून वेगळें होण्यापेक्षां ही माहेरीं गेलेलीच पुरवली."

नाइलाजास्तव ह्मातारी शेवटीं कवूल झाली. आमच्या धाकट्या सूनबाईनीं यावज्जन्म रहाण्याच्या उद्देशानें त्याच दिवशीं माहेरीं जाण्याचें ठरविलें. गाडींत बसण्यापूर्वी बरीच रडारड झाली. जगू दामूला एकवार जवळ घ्यावें ह्मणून लक्ष्मीबाईनीं त्यांनां जवळ बोलाविलें—त्यांच्या तोंडांवरून हात फिरवून आतां त्या त्यांचें चुंबन घेणार—इतक्यांत गंगाबाई वाघिणीसारख्या उड्या टाकीत तेथें आल्या आणि त्या दोन्ही मुलांनां ओढून घेऊन गेल्या! सजलनयनांनीं त्यांच्याकडे पहातपहात आमच्या धाकट्या सूनबाई गाडींत बसल्या. विनायकराव त्यांनां पोहोंचविण्यासाठीं बरोबर गेले, आणखी बाळकृष्णहि गेला. बाळकृष्णाचें जाण्याचें वास्तविक कांहींएक प्रयोजन नव्हतें. राधाबाईनीं, सदूभाऊंनीं आणि इतर मंडळीनेंहि त्याला नानाप्रकारें सांगितलें; परंतु त्याला धरून ठेवण्याची कोणाचीहि प्राज्ञा नव्हती. सासरच्या गांवचा आज आमच्या धाकट्या सूनबाईनीं जन्माचा निरोप घेतला. शत्रूवर उपकार करण्यासाठीं आपल्या सुखावर लाथ मारिली!

गाडी दृष्टीआड झाली. गंगाबाईनीं आनंदविव्हल होऊन पार्वतीबाईला आलिंगन दिलें.

---

## प्रकरण सदतिसावें.

### पापाचा घडा भरला.

आमच्या धाकट्या सूनबाई माहेरीं निघून गेल्यावर बापड्या राधाबाईनीं तीन दिवस तर नुसते अंथरुणावर पडून काढिले. या तीन दिवसांत ह्मातारी अन्नाला शिवलीदेखील नाहीं. नाहक भयंकर आळ येऊन सून माहेरीं निघून गेल्याबद्दल राधाबाईनां अत्यंत दुःख झालें होतें. पुढेंपुढें तर संसारसंबंधीं कोणत्याहि कृत्यांत ह्मणून त्या मन घालीनातशा झाल्या. दिवसांत केव्हांतरी एकदां कसेबसे दोन घांस पोटांत घालून त्या आपल्या कोठेंतरी जाऊन सारा दिवस अश्रु गाळीत बसत.

दीक्षितांच्या संसाराची सर्व सत्ता आतां थोरल्या सूनबाई आणि त्यांच्या ज्येष्ठ भगिनी गंगाबाई यांच्या हातांत पूर्णपणें आली. पत्नीच्याच अनुरोधानें

सदाशिवरावांनीं आतां पुनः कंत्राटाचा धंदा आरंभिला होता, त्यामुळें अर्थात् त्यांनां वारंवार बाहेरगांवीं जाण्याचा प्रसंग घेई. 'कनक आणि कांता' यांच्या अजब मोहिनीशक्तीला बळी पडून सदूभाऊ मागील सर्व गोष्टी पार विसरून गेले होते. तरीहि आपल्या मूढ बंधूच्या कमाईचा पैसा घेऊन आपण जे त्याचे ऋणी झालों आहों, त्याच्या त्या ऋणाची, आपल्या बुद्धीच्या जोरावर तो पैसा वाढवून फेड करण्याची, त्यांनां बलवत्तर इच्छा होती. आमच्या विनायकरावांनां मात्र कसलेंहि काम करण्याला आतां तो पूर्वीचा उत्साह राहिला नाहीं. तरी देखील दादांचा कोणताहि शब्द ह्मणून त्यांनीं कधीं मोडिला नाहीं. दादा केव्हांहि काय पाहिजे तें करण्यास सांगोत, विनायकराव तें करण्यास सदैव तत्पर असत. या घरीं रहाण्याची आतां विनायकरावांनां मुळींच इच्छा राहिली नसूनहि केवळ आई आणि दादा यांनां वाईट वाटेल ह्मणून ते श्वशुरगृहीं गेले नाहींत.

लोकांनीं केलेलें भविष्यच शेवटीं क्रमाक्रमानें खरें झालें. लक्ष्मीबाईबरोबरच जणों दीक्षितांची गृहलक्ष्मीहि हळुहळू अंतर्धान पावली. वर्षाच्या बारा महिन्यांत कमींतकमी तेरा वेळ तरी दीक्षितांच्या घरीं व्रतउत्साह व्हावयाचे; परंतु आतां ते सर्व बंद झाले. अतिथिअभ्यागतांचा परामर्ष आतां कोणीच घेईनासें झालें. भिक्षेकऱ्याला मूठभर तांदूळ मिळण्याचीदेखील मारामार पडूं लागली. त्या एकंदर घरादाराची ती पूर्वीची कळाच गेली. आणि याच संधीस सदाशिवरावांनां एका कंत्राटांत जबर ठोकर बसली. पदरचा पैसा भरून काम पुरें करून द्यावें लागलें आणि यामुळें मानासन्मानानें रहण्यालादेखील मोठी पंचाईत पडूं लागली.

एके दिवशीं विनायकराव कोणाजवळ एक चकारशब्दहि न काढतां जे कोठें निघून गेले त्याचा मुळींच पत्ता लागेना. सदाशिवराव मोठ्या विचारांत पडले. राधाबाईची स्थितितर वर्णन करून सांगणेंच अशक्य. शेवटीं त्यानंतर तीन दिवसांनीं माधवराव सहस्रबुद्धे यांनां बरोबर घेऊन विनायकराव परत घरीं आले. आल्याबरोबर पहिल्यानें पत्नीची—मनोरमेची भेट न घेतां माधवरावांनीं अगोदर अगदीं एकांतांत सदाशिवरावांची गांठ घेतली. त्यांनां पहातांच सदूभाऊंनीं पराकाष्ठेचा आनंद प्रदर्शित करून प्रश्नांवर प्रश्न विचारण्याची सुरुवात केली; परंतु त्यांनां मध्येंच थांबवून माधवराव ह्मणाले "सदाशिवराव, तुमच्या बंधूंच्या तोंडून जी कांहीं हकीगत मीं ऐकिली आहे, त्या बाबतींत तुह्मांला अगोदर

एकदोन प्रश्न विचारल्यावांचून माझ्यानें रहावत नाहीं. जगूला आणि दामूला ह्मणे कोणीं अफू घातली आणि त्यासंबंधीं तुह्मीं आपल्या भावजईचा संशय घेतलात?"

सदूभाऊ अगदीं स्थिरचित्तानें ह्मणाले "हो. माझ्या ऐकण्यांत जो कांहीं प्रकार आला, त्यावरून लक्ष्मीचाच संशय आल्यावांचून रहात नाहीं."

"मला मोठें आश्चर्य वाटतें सदाशिवराव, कीं, एकंदर प्रकार जाणूनसवरून देखील पूर्वीच्या गोष्टी तुह्मी अजीबात विसरून गेलां! ज्या दिवशीं आमच्या ताईसाहेबांनां तुह्मीं आपल्या घरीं आश्रय दिलात, त्याच दिवशीं आपल्या समूळ नाशाचें बीजारोपण तुह्मीं करून घेतलेंत. ती इथें असतांना ज्या अर्थीं हा प्रकार झाला, त्या अर्थीं मला तिचाच संशय येत आहे. आणि शिवाय तिचा संशय घेण्याला मला दुसरें कांहीं विशेष कारणहि आहे."

"तुमच्या ताईला मी ओळखीत नाहीं असें नाहीं; तरीदेखील या बाबतींत तिचा संशय घेण्याला मलातरी कांहींएक कारण दिसत नाहीं."

"अहो, मुलांनां दुसरेंतिसरें कांहीं दिल्याचें समजून आलें असतें, तर हा माझा केवळ संशयच आहे, इतकेंच ह्मणून मी राहिलों असतों; परंतु त्यांनां अफू दिल्याचें जेव्हां माझ्या समजण्यांत आलें, तेव्हांतर तो संशय अगदीं दूर झाला. मीं तुह्मांला खात्रीनें सांगूं शकतों, कीं, हें काम खास त्या चांडाळणीचेंच आहे. आमच्या बाबांनां अफू खाण्याचें व्यसन होतें, तें तुह्मी विसरलां वाटतें. अहो, ही चांडाळीण तेव्हांपासूनच चोरूनमारून अफू खाण्यास शिकली होती. सदाशिवराव, तुह्मीं त्या निष्कलंक साध्वीचा संशय घेण्यांत खरोखर मोठाच अन्याय केलात!"

माधवरावांच्या तोंडून ही हकीगत ऐकतांच सदूभाऊंच्या अंतःकरणांत लख्ख प्रकाश पडला. डोळ्यांवर आलेले पडदे काढून टाकिले ह्मणजे जी अवस्था होते, तीच अवस्था या वेळीं त्यांची झाली. एकंदर प्रकार आतां त्यांच्या डोळ्यांपुढें स्पष्ट उभा राहिला. त्यांचें तोंड अगदीं उतरून गेलें. इतक्यांत पुनः माधवराव ह्मणाले "तुह्मांला जर मी ह्मणतों हें पहावयाचें असेल तर अद्यापि तुह्मी तपास करा; मी खात्रीनें सांगतों, तिच्याजवळ तुह्मांला अफू सांपडेल."

सदूभाऊंच्या मनांत काय आलें कोणास ठाऊक, माधवरावांनां तेथेंच बसावयास सांगून ते तत्क्षणीं अंतर्गृहांत गेले आणि लवकरच हातांत एक डबी घेऊन बाहेर आले. ती डबी माधवरावांच्या हातांत देऊन ते ह्मणाले "पहा पहा बरें, या डबींत काय आहे तें?"

# पापाचा घडा भरला.

माधवरावांनीं ती डबी तत्काळ ओळखून ह्मटलें "तुह्मीच पहा त्यांत अफू आहे कीं नाहीं ती!"

सदूभाऊ अगदीं ओशाळल्यासारखे होऊन ह्मणाले "माधवराव, तुमचेंच ह्मणणें खरें आहे. लक्ष्मीचा अन्यायानें संशय घेऊन मीं फारच निंद्य गोष्ट केली."

माधवराव मोठ्या उत्साहानें ह्मणाले "तर मग आतांतरी लोकांनां खरी गोष्ट काय आहे ती कळविण्यास विलंब लावूं नका."

इतकें झाल्यावर माधवराव आपल्या श्वशुरगृहीं जाण्यास गेले.

शेवटीं एकदांची खरी गोष्ट कायती बाहेर पडली. आपल्या सुनेवर नाहक आलेला आळ टळला, हें राधाबाईला समजतांच त्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. आपली आवडती सून पुनः घरीं आल्याबरोबर मोठ्या थाटानें सत्यनारायणाची पूजा करण्याचा त्यांनीं मनांतल्यामनांत तत्क्षणीं निश्चयहि केला; आणि त्याचप्रमाणें त्या पुढील तयारीसदेखील लागल्या. परंतु जी गोष्ट ऐकतांच ह्मातारीचा आनंद ब्रह्मांडांत मावेनासा झाला, तीच गोष्ट पार्वतीबाईच्या कानांवर जातांच त्यांचा क्रोध ब्रह्मांड फोडून बाहेर निघतो कीं काय, अशी क्षणोक्षणीं भीति वाटूं लागली. संतापाच्या भरांत हातांतील काम तसेंच तेथल्यातेथें टाकून पार्वतीबाई गंगाबाईवर तुटून पडल्या आणि अत्यंत कठोर वाक्प्रहारांनीं त्यांचा हृदयभेद करूं लागल्या. त्या मोठ्या त्वेषानें ह्मणाल्या "जळलं मेलीचं तोंड! अग राक्षसिणी, तुझ्यासारख्या भयंकर काळसर्पिणीला दूध घालून मीं आजवर घरांत बाळगिली! तुझ्या अंतःकरणांत कांहीं दयामाया आहे कीं नाहीं? माझ्या सोन्यासारख्या लेंकरांनां विष घालतांना चांडाळणी तुझे जळले ते हात गळून कां पडले नाहींत!"

पार्वतीबाईची ती कृतांतासारखी भयंकर मूर्ति पहातांच गंगाबाई पहिल्यानें किंचित् गांगरल्या; परंतु हें सगळें निमूटपणें सहन करणें उचित नाहीं, असा मनांतल्यामनांत विचार करून त्यांनीं आपल्या वहिणीच्या या भयंकर गर्जनेवर उत्तर देण्यास मोठ्या कष्टानें जोर करून तोंड उघडलें. त्या ह्मणाल्या "कां ग ए-भारीसं तोंड सुटलं आहे! तूं हें कुणाला बोलत आहेस विसरलीस वाटतं?"

गंगाबाई तोंडानें हे शब्द बोलत होत्या, खऱ्या परंतु इकडे त्यांची छाती धड्धड उडत होती. तोंडतर काळेंठिक्कर पडलें होतें. इतक्यांत पार्वतीबाईचें तोंड पुनः सुटलें "अग चांडाळणी! तुला आणखी तोंड वर करून बोलायला शरम कशी वाटत नाहीं सांग पाहूं? तुझ्याच पेटींत ती अफूची डबी सांपडली कीं नाहीं?

अग अवदसे, तुला कांहीं धर्माधर्माचं भय? ज्याचं अन्न खाल्लंस त्याचाच समूळ नाश करायला उठलीस? तिकडे दादाच्या संसाराचे दिवे लावलेस—तिथून मावशीकडे गेलीस तिथंहि राखरांगोळी करून आलीस—अन् आतां इथं येऊन आमच्या संसाराला आग लावायला बसली आहेस होय? चांडाळणी! तुला कुणाचंच कसं बरं पहावत नाहीं? आपल्या पायांवर आपल्याच हातानं कां धोंडा पाडून घेत्येस? धुळीचे दिवे खात जाण्याचा प्रसंग आणलास कीं नाहीं आतां? तुझ्या हातपायांस किडे पडतील किडे! लोकांचीं खेटरं खाऊन तुला पोट जाळावं लागेल! कांग ए—बोल बोल, आतां कुणीं धरलं तुझं तोंड?"

यापुढें धाकट्या वहिणीच्या तोंडासमोर उभें रहाण्याची गंगाबाईच्या अंगीं शक्ति राहिली नाहीं. त्यांचे पाय लटलट कांपूं लागले. गळा अगदीं सुकून गेल्यामुळें पार्वतीबाईप्रमाणें ओरडून बोलण्याचीदेखील ताकद त्यांच्या अंगीं राहिली नाहीं. नाइलाजास्तव एकाद्या विषहीन सर्पिणीप्रमाणें त्या 'फोंफों' मात्र करूं लागल्या. तोंडावाटे शब्द निघेल तर शपथ.

इतकें झालें तरी अद्यापिहि गंगाबाई निर्लज्जपणानें फोंफावते आहे, हें पहातांचतर पार्वतीबाई अधिकच चवताळल्या. क्रोधावेशानें ज्ञानशून्य बनून त्या ह्मणाल्या "दादानं घरांतून हाकून दिली तिथून मावशीकडे गेलीस—मावशीकडून लाथा खाऊन आतां इथं आलीस, अवदसे! तुला कांहीं लाजलज्जा तरी! आतां इथंहि चांगलीं खेटरं देऊन मी हांकून देत्यें-आतां कोण तुला दाराशीं उभं करील तें सांग पाहूं काळतोंडे!"

आतां मात्र कडेलोट झाला. गंगाबाईच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. त्या स्फुंदतस्फुंदत ह्मणाल्या "माझ्या मेल्या फुटक्या नशीबाचा गुणच असा आहे! मी ज्यांचंज्यांचं ह्मणून बरं करायला जात्यें, तींच मेलीं माझ्यावर उलटून पडायला तयार होतात. मग तूंदिखोल अखेर तसंच करूं लागलीस यांत ग बाई नवल कसलं!"

परंतु पार्वतीबाई एवढ्यानेंच शांत झाल्या नाहींत. त्या रागारागानेंच पुनः ह्मणाल्या "काळतोंडे, मला समजतात हीं मानभावीपणाचीं बोलणीं बरं! मोठी आली आहे लोकांचं बरं करायला! अग चांडाळणी! माझं बरं करायला तुला आतां इथं मी राहूं देईन तेव्हां कीं नाहीं? आतांच्या आत्तां तूं आपलं तोंड काळं कर इथून—खबरदार एक क्षणभर इथं राहिलीस तर! चल—नीघ, आतां पुनः ह्मणून मी कांहीं तुझ्या रडण्याला नि रवण्याला मुळींच फसायचा नाहीं, समजलीस?"

धाकट्या बहिणीनें केलेल्या या असह्य अपमानानें गंगाबाईचें रडणें तत्काळ बंद झालें. आतां त्यांच्या मुद्रेवर क्रोधाचीं लक्षणें दिसूं लागलीं. हांहां ह्मणतां गंगाबाईनीं आपलें नृसिंहस्वरूप धारण केलें. दांतओंठ खात भयंकर कर्कश स्वरानें त्या ह्मणाल्या "तोंड काळं करूं काय ? ठीक आहे-करीन बरं करीन ! कपाळकरंटे ! पण अगोदर तुझा सत्यनाश करीन—तुझ्या संसाराची राखरांगोळी करीन-नि मग मी तोंड काळं करीन बरं ?"

पार्वतीबाईलाहि हें सहन झालें नाहीं. रागानें लाल होऊन त्या बाह्यज्ञानशून्य झाल्या, आणि अगदीं याच वेळीं विनायकराव तेथें आले नसते तर दोघी बहिणींचें खात्रीनें तुंबळ युद्ध झाल्याविना राहिलें नसतें. विनायकरावांनीं भावजयीचा हात धरून मोठ्या कष्टानें तिला दुसरीकडे नेलें.

---

## प्रकरण अडतिसावें.

### पुनर्मेलन.

इकडे माधवराव सदाशिवरावांकडून जे बाहेर पडले ते तडक आपल्या पत्नीच्या घराकडे निघाले. वाटेमध्यें पूर्वीच्या गोष्टी एकामागून एक त्यांच्या मनांत येऊं लागल्या. मनोरमेचें चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहूं लागलें. तिची ती सदासर्वदां भय आणि शंका यांनीं विव्हळ झालेली मुद्रा, लज्जेनें खालीं गेलेली दृष्टि, विनापराधें आपल्याकडून होत असलेल्या मर्मभेदक तिरस्कारानें, कठोर भर्त्सनेनें कधींहि न क्षोभणाऱ्या त्या कोमल हृदयांतील तें अगाध प्रेम, भीतीनें श्वास टाकितटाकित करुणस्वरानें तिनें उच्चारलेले तुटकतुटक शब्द, या एकंदर हृदयद्रावक गोष्टींचें चित्र क्रमाक्रमानें माधवरावांच्या दृष्टीपुढें उभें राहूं लागलें. तदनंतर आपल्या वडील बहिणीकडून मनोरमेचा होणारा असह्य छळहि त्यांच्या डोळ्यांपुढें येऊं लागला. याप्रमाणें एकेका दिवसाचें स्मरण होऊन एकेक गोष्ट जसजशी त्यांच्या डोळ्यांपुढें उभी राहूं लागली, तसतशी त्या निरपराध अज्ञान बालिकेची सहनशीलता मनांत येऊन माधवराव अधिकाधिक विस्मित होऊं लागले. आणि स्वतः माधवरावांनींतरी मनोरमेचा काय थोडा छळ केला होता ? पत्नीवर केलेल्या या अत्याचाराचें स्मरण होतांच त्यांचें हृदय भडभडून आलें. आपला आपणच ते धिक्कार करूं लागले. पश्चात्तापानें त्यांचें हृदय दग्ध होऊं लागलें. आतां पत्नीला तोंड कसें दाखवावें याचीदेखील त्यांनां लाज वाटूं लागली आणि या विचारानें त्यांचें मस्तक अगदीं जड होऊन गेलें.

यांप्रमाणें मनामध्यें अत्यंत कष्टी होऊन शेवटीं डोळ्यांतील अश्रु साफ पुसून टाकून माधवरावांनीं भीतभीत श्वशुरगृहीं प्रवेश केला. सुदैवानें पहिल्यानें मनोरमाच त्यांच्या दृष्टीस पडली. जवळपास दुसरें कोणीहि नव्हतें. माधवरावांनां पहातांच मनोरमा एकदम मूर्च्छित झाली. माधवरावांनीं धावत जाऊन तिला मोठ्या शिकस्तीनें सांवरून धरिलें आणि एका बिछान्यावर नेऊन निजविलें. पत्नीची ही स्थिति पहातांच माधवरावांच्या हृदयांत मोठाच धक्का बसला. मनोरमेला मूर्च्छा आलेली पहातांच त्यांचें हृदय शतधा विदीर्ण होऊं लागलें. एकाद्या बालकाप्रमाणें ते ओक्साबोक्शीं रडूं लागले. मोठ्या प्रयासानें शेवटीं तें रडें दाबून माधवरावांनीं अनेक उपचार करून मनोरमेला सावध केलें. मनोरमेनें हळुहळू आपले विशाल काळेभोर नेत्र उघडले. समोर पहाते तों पतीचें मुखकमल दिसत आहे! तदनंतर एकवार चोहोंकडे निरखून पाहून तिनें पुनः पतिमुखाकडे दृष्टि फिरविली. तत्काळ तिनें पुनः आपले डोळे घट्ट मिटून धरिले. या वेळीं माधवरावांच्या हृदयांत जी कालवाकालव चालली होती, त्यांनां जे हुंदक्यांवर हुंदके येत होते, त्यांचें वर्णन करणेंच अशक्य आहे. मनोरमेनें पुनः डोळे मिटून धरतांच त्यांनीं आपल्या डोळ्यांतील अश्रुधारा पुसून काढिल्या आणि सद्गदित स्वरानें हांक मारिली " मनोरमे !"

मनोरमेला जणों पहिल्यानें कांहीं ऐकूंच आलें नाहीं. ती अगदीं घाबरून गेल्यासारखी झाली. तिनें पुनः एकवार डोळे उघडून पाहिलें; परंतु पुनः हळुहळू ते मिटून धरिले. तोंडावाटे शब्दच फुटेना. शेवटीं बऱ्याच वेळानें अगदीं अस्पष्ट वाणीनें ती ह्मणाली " हें काय ! देवा हें सारं खरंच ? "

माधवरावांनां मोठा गहिंवर आला. त्यांचा गळा दाटून आला. त्यांच्याहि तोंडावाटे शब्द निघेना. डोळ्यांतून घळघळ अश्रु गाळीत ते स्तब्ध उभे होते. डोळे मिटलेलेच ठेवून या वेळीं मनोरमा करुणस्वरानें अगदीं स्पष्टपणें ह्मणाली " देवा, हें जर सारं स्वप्न असेल, तर कृपा करून मला या स्वप्नांतच चिरकाल राहूं दे !"

मिटलेल्या कमलपुष्पाप्रमाणें शोभणाऱ्या पत्नीच्या त्या मनोहर मुखाचें प्रेमभरानें चुंबन घेऊन सद्गदित कंठानें माधवराव ह्मणाले " मनोरमे ! हें स्वप्न नव्हे. डोळे उघड. हा तुझा निष्ठुर पति खरोखरच तुजपुढें उभा आहे. तूं जर या निर्दयाला क्षमा केली नाहींस तर याची धडगत दिसत नाहीं. तुझी क्षमा मागण्याकरितांच हा इथें आला आहे."

मनोरमेनें डोळे उघडून पाहिलें—चट्दिशीं उठून पतिचरणांवर मस्तक ठेविलें. फार दिवसांनीं लाभलेल्या त्या चरणांवर ती प्रेमाश्रूंचा अभिषेक करूं लागली. मनोरमा स्फुंदतस्फुंदत ह्मणाली "आज इतक्या दिवसांनीं या दीन दासीची आठवण झाली ?"

शब्दांनीं का या प्रश्नाचें उत्तर देतां येणार आहे ? माधवरावांनां अनावर गहिंवर आला होता. मनोरमातर पतिचरणांवर मस्तक ठेवून ढळढळां रडूं लागली. शेवटीं माधवरावांनीं तिला वर उचलून हृदयाशीं धरिलें. पतीच्या वक्षःस्थलावर मस्तक ठेवून मनोरमा आनंदाश्रूंनीं तें भिजवूं लागली. अहाहा ! उभयतांनां हा समय कितीतरी आनंददायक-कितीतरी सुखकारक वाटला ! या सुखाची अदलाबदल प्रत्यक्ष स्वर्गसुखाशींहि करण्यास त्या उभयतांपैकीं कोणीहि कबूल झालें नसतें ! कितीतरी वेळ कोणाच्याहि तोंडांतून शब्ददेखील आला नाहीं. कांहीं वेळानें मनोरमा मोठ्या प्रेमानें पतिमुखाकडे पाहून विनयानें ह्मणाली "इतके दिवस कां वरं येणं झालं नाहीं ?"

पत्नीच्या या प्रश्नानें माधवराव विस्मित झाले. काय उत्तर द्यावें हेंच त्यांनां सुचेना. शेवटीं मोठ्या आश्चर्यानें त्यांनीं पत्नीला उलट प्रश्न केला "मनोरमे ! तूं विसरलीस वाटतें. मी इतके दिवस माझ्या पातकांचें प्रायश्चित्त भोगीत होतों तें ?"

हें ऐकतांच मनोरमा पराकाष्ठेच्या विस्मयांत पडून माधवरावांच्या तोंडाकडे पहात राहिली. जणों, तिला याचा अर्थच बरोबरसा कळला नाहीं. माधवरावांनां मात्र तिच्या या पहाण्याचा अर्थ तत्काळ कळला. ते ह्मणाले "तुजजवळून कोणतीहि गोष्ट ह्मणून मी आतां चोरून ठेवणार नाहीं. मनोरमे ! एक वर्षभर कारागृहवास स्वीकारून मीं माझ्या घोर पातकांचें प्रायश्चित्त घेतलें. आतां पुनः ह्मणून मी कुमार्गानें जाणार नाहीं. सांग सांग, मनोरमे ! माझ्या या सांगण्याचा तुला विश्वास वाटतो ना ?"

लाजून मनोरमेनें खालीं मान घातली. ती ह्मणाली "आपल्या सांगण्याचा मी कधींतरी संशय घेईन ? तरीदिखील आपल्या हातून ह्मणजे कधीं कांहीं पाप घडलं असेल, या गोष्टीला मात्र माझ्या मनांत कधींहि जागा—'

इतक्यांत बाहेरून विनायकरावांनीं माधवरावांना हांक मारिली. मोठ्या कष्टानें डोळ्यांतील आंसवें पुशीतपुशीत, हृदयाशीं धरलेलें पत्नीचें मस्तक निरुपायास्तव दूर करून माधवराव हळुहळू बाहेर येऊं लागले. मनोरमा विस्मित होऊन एकदृष्टीनें पतीकडे पहात राहिली.

# धाकट्या सूनबाई.

माधवराव बाहेर येतांच विनायकराव ह्मणाले "माधवराव, तुमचे उपकार मी कधींहि विसरणार नाहीं. अमृतसेचन करून या मृतदेहांत आज तुह्मीं जीव आणिलात. मला पुनः संसारांत वसविल्याचें तुह्मीं श्रेय घेतलेंत. चला आतां, दादा आपली वाट पहात आहेत, एकवार तिकडेच चला."

"छे छे ! या बाबतींत मी तुह्माला एक अक्षरसुद्धां बोलूं देणार नाहीं. विनायकराव,तुमचें आजवर जें जें अनिष्ट झालें आहे,त्या सर्वांला कारण हाच नीच, पातकी माधवराव नव्हे काय ? बरें तें जाऊं द्या. तुह्मी पुढें व्हा, मी तुमच्या मागोमागच येतों."

विनायकराव निघून गेले; परंतु माधवरावांनां मात्र त्यांच्या मागून जाण्याचें प्रयोजन उरलें नाहीं; कारण स्वतः सदाशिवरावच इतक्यांत तेथें येऊन पोहोंचले. माधवरावांनां पहातांच सदाशिवराव ह्मणाले "माधवराव ! आह्मी सगळे आतां लक्ष्मीला आणण्याकरितां जातों. मीं जो अन्यायानें तिजवर निष्कारण दोषारोप केला आहे, तो, खरी गोष्ट सांगून दूर केल्याविना मला आतां एक क्षणभरदेखील चैन पडावयाचें नाहीं."

हें ऐकतांच माधवराव मोठ्या उत्सुकतेनें ह्मणाले "हो हो ! असेंच झालें पाहिजे. चला, मीहि येतों तुमच्यावरोबर. आमच्या वहिनीहि तेथेंच आहेत. त्यांचे जे मीं आजवर अपराध केले आहेत, त्यांवद्दल त्यांची मी क्षमा मागेन, आणि कसेंतरी करून त्यांनां परत घरीं घेऊन जाईन. आणि सदाशिवराव ! त्यांच्याच अनुमतीनें—अगदीं वहिनी सांगतील त्याप्रमाणें वागून आतां नव्यानें संसाराला आरंभ करावयाचा."

"चला, निघण्याच्या तयारीला लागा तरमग. आई, विनू, जगू, दामू आणि घरांतील सर्व मंडळीला मी बरोबर घेऊन जाणार. मला एकट्यालाच कांहीं तिकडे जाण्याला धीर होत नाहीं. माधवराव ! तुह्मीच सांगा, एकटा जाऊन हें तोंड आतां तिकडे कसें दाखवूं ?"

माधवराव हंसतहंसत ह्मणाले "मग मी मनोरमेलाहि बरोबर घेतों. आतां तिला दूर म्हणून करायची नाहीं."

ठरल्याप्रमाणें त्याच दिवशीं सर्व मंडळी आमच्या धाकट्या सूनबाईंनां आणण्यास निघाली. सखू मोलकरीण, एक गडी आणि गंगाबाई अशीं तिघेंच कायतीं मागें सदाशिवरावांच्या घरीं राहिलीं.

---

## प्रकरण एकोणचाळिसावें.

### पुराच सूड उगविला.

पार्वतीबाईवर गंगाबाईची जी कांहीं थोडीबहुत मर्जी वसली होती, ती या नुकत्याच घडून आलेल्या प्रकारानें पार नाहींशी झाली. आपल्या दोघां भाचांनां आपल्या हातानें विष घालून गंगाबाई आजवर खुशाल सुखसागरांत पोहत होत्या; परंतु मोठ्या दुःखाची गोष्ट, कीं, त्या सुखसागरावर आज विषारी तरंग उठला. तेव्हां हल्लीं गंगाबाईची मानसिक स्थिति कोणत्या प्रकारची झाली होती, याचें सहज अनुमान करितां येण्याजोगें आहे सूड घेण्याच्या राक्षसी हेतूनें त्यांचें अंतःकरण सारखें जळूं लागलें. त्यांच्या ध्यानीं, मनीं, स्वप्नीं सूड–सूड दिसूं लागला.

दोन प्रहर रात्र झालेली, परंतु गंगाबाईच्या डोळ्याला आज झोंप ह्मणून कशी ती माहीत नाहीं. त्या भयाण रात्रीं वेड्यासारख्या सगळ्या घरभर त्या फिरतच सुटल्या ! घरांत आज चिटपांखरूं कोणीहि नव्हतें. मनांत येईल तें आज गंगाबाईला करतां येण्यासारखें होतें. मग अशी अनायासें आलेली सोन्यासारखी संधी गंगाबाईसारख्या खुनशी मनुष्याच्या हातून का फुकट जाणार आहे ! फक्त अडचण कायती एवढीच होती, कीं, आपली दुष्ट मनोवांच्छा कोणत्या मार्गानें पूर्ण करून घ्यावी. कांहीं केल्या गंगाबाईला हें बराच वेळपावेतों सुचेना. आणि ह्मणूनच अगदीं अस्थिर होऊन निखालस वेड्यासारख्या त्या सगळ्या घरभर नाचत होत्या. नाचतांनाचतां जवळच असलेल्या धान्याच्या कोठाराकडे त्यांची सहज दृष्टि गेली. मग काय विचारतां ! ती राक्षसीण मोठ्या आनंदानें खदखदा हसूं लागली. त्या गंभीर निस्तब्ध रात्रीच्या वेळीं गंगाबाईचें तें विकट हास्य कितीतरी भयानक होतें !

मनांत काय आलें कोण जाणे, गंगाबाई धावतधावत घरांत गेल्या आणि किंचित्कालानें एक पेटलेला मोठा कांकडा हातांत घेऊन बाहेर आल्या. या डाकिणीचा काय विचार असावा बरें ? आणि हें काय ! त्या कोठाराकडे पाहून ही चांडाळीण पुनः खदखदा हंसत कां आहे ? कांकड्याच्या उजेडांत मनुष्याचें तोंड काय इतकें भीषण दिसतें ? आणि या कांकड्याबरोबरच गंगाबाईचे डोळेहि काय ह्मणून प्रज्वलित होऊं लागले ? कितीतरी भयंकर–कितीतरी भीषण मूर्ति ही ! हा कांकडा विझून जाईल तरी बरें. या स्त्रीवेषधारी डाकिणीचें हें भयानक तोंडतरी पुनः दृष्टीस पडणार नाहीं. वा अंधकारा ! तूंतरी अगदीं काळाकुट्ट होऊन या पिशाचीचें तोंड दडवून टाक.

निश्वास टाकीत सुशीला ह्मणाली "पतीचं घर सोडून पतिव्रता स्त्री आपल्या माहेरीं येऊन राहिली, तर पतीचं अमंगल होतं ह्मणून ह्मणतात, तें खरंच का ताई ?"

लक्ष्मीबाईनीं कष्टी अंतःकरणानें विचारिलें "मग कशाला बाई तूं इकडे आलीस ?"

" तसं नाहीं ग ताई. पण ह्मटलं, मनुष्यानं फक्त आपल्याच सुखावर व कल्याणावर का नजर द्यावी ?"

"तेंहि खरंच. बरं, पण मग तूं अशी रात्रंदिवस अश्रु कां गाळीत असतेस ?"

या वेळीं सुशीलेचें अंतःकरण भरून आलें. नेत्रावाटे अधिकाधिकच अश्रुधारा वाहूं लागल्या. ती ह्मणाली "ताई, आपल्या डोळ्यांतून अश्रु गळल्याशिवाय का दुसऱ्याला सुखी करतां येणार आहे ?"

लक्ष्मीबाईनीं मोठ्या ममतेनें सुशीलेला जवळ घेतली. तिचे अश्रु पुसून काढिले आणि प्रेमानें तिच्या पाठीवरून हात फिरवीत त्या ह्मणाल्या "आतांपर्यंत तूं थोडे का अश्रु गाळलेस ? माझं ऐक, नि आपली आतां तिकडे जा कशी."

"छे छे ! ताई, ही गोष्ट मुळींच व्हायची नाहीं. जोंवर भाओजींनां माझाच संशय येत आहे, जोंवर खरं कायतें बाहेर पडणार नाहीं, तोंवर माझ्या डोळ्यांतलं पाणी बिलकूल खळायचं नाहीं, नि मी तिकडे हें तोंड दाखवायचीहि नाहीं. बरं तें जाऊं दे. पण ताई ! आज इतके दिवस मी देवाची करुणा भाकीत आहें. पण अजून त्याला माझी दया मुळींच कशी ग येत नाहीं ?"

"बाई ग, आपल्या अदृष्टाचा भोग हा आपल्याला भोगलाच पाहिजे. पूर्वजन्मीं आपल्या हातून जसं बरंवाईट कर्म घडलं असेल, त्याप्रमाणं या जन्मीं आपल्याला बरीवाईट स्थिति अनुभविलीच पाहिजे. आपण कितीहि धडपड केली तरी ती कांहीं टळायची नाहीं. भोग सरला ह्मणजे मग देवाला दया येते व सर्व गोष्टी सुरळीत होतात, समजलीस."

"ताई, तूंतर सगळा दिवस पूजा, अर्चा, ध्यान, जप यांतच घालविस्तेस. सगळ्या दिवसांत पोटांत पळीभर पाणीसुद्धां घेत नाहींस. रात्रीं मात्र कायतें देवाचं तीर्थ घेऊन थोडा फराळ करित्येस. सगळे लोक असं समजतात, कीं, या व्रतांनीं आणि या उपोषणांनीं देव तुला प्रसन्न झाला आहे. तेव्हां तूंतरी सांग पाहूं, आणखी किती दिवस मला पतिसेवा घडणार नाहीं तें ?"

सुशीलेचें हें भोळेपणाचें भाषण ऐकतांच लक्ष्मीबाईनां हंसूं लोटलें. त्या जरा थट्टेनेंच ह्मणाल्या "चल, तुला कांहीं वेडबीडतर लागलं नाहींना ? मी काय

ज्योतिषीण कीं मोठी तपस्वीण आहें वाटतं ! बरं हेंच खरं, तर जा मी तुला आशीर्वाद देत्यें, कीं, देव तुझी मनोवांच्छा लवकरच पूर्ण करील !"

"मग सगळीं ह्मणतात तें उगीच वाटतं, कीं, देव तुजवर प्रसन्न झाला आहे ह्मणून ! बरं, असं जर नाहीं, तर मग ताई, तूं इतकीं व्रतं नि उपोषणं करित्येस, देहाला इतके कष्ट देत्येस, तरीसुद्धां तुझं शरीर असं तेजःपुंज कसं ?"

"तूं उगीच असं वेड्यावेड्यासारखं करूं नकोस बाई ! मजसारख्या पापिणीला का कुठं देव पावत असतो ? परंतु एक दिवस किनई, मला स्वप्नांत वैकुंठ दिसलं. आणखी असं दिसलं, कीं, त्या वैकुंठांत माझे वैकुंठेश्वर विराजमान झाले आहेत ! सुशीले, तेव्हांपासून प्रत्येक दिवशीं मी माझ्या हृदयराज्यांत कल्पनेनं तेंच वैकुंठ निर्माण करित्यें आणि माझ्या जीवितेश्वराच्या हातीं शंख, चक्र, गदा, पद्म देऊन त्यांनांच त्या वैकुंठांत वैकुंठेश्वर करून त्यांचं सदैव ध्यान करित्यें; आणि एकदां त्या मूर्तीचं ध्यान करूं लागल्यें, कीं, माझी तहानभूक सर्व लयास जाते."

सुशीला चकित होऊन ह्मणाली "काय ? काय ह्मणत्येस ताई ! यानं तुझी तहानभूकदिखील नाहींशी होते ?"

"अग वेडे ! हृदय एकदां प्रसन्न झालं, ह्मणजे मग भूक कसली नि तहान कसली ?"

"ताई ! तूं कांहीं ह्मण, पण माझातर असा समज झाला आहे, कीं, तूं कुणी तरी शापभ्रष्ट देवताच आहेस ! धन्य तूं आणि धन्य तुझी पतिभक्ति ! नाहींतर आह्मी चांगल्या संसारांत आहों, पण काय उपयोग ? पतीचं ध्यान किंवा चिंतन करून आमचं हृदय प्रसन्न होण्याचं दूरच राहिलं—उलट व्याकुळ मात्र होऊन जातं आणि आह्मांला रडूंच कोसळतं ! आमची कसली ही पतिभक्ति ! तरीदिखील ताई, तुला कांहीं पतीची भेट होण्याची मुळींच आशा नाहीं, आणि आह्मांला देवाच्या दयेनं तेवढी आशातरी आहे."

हें ऐकतांच लक्ष्मीबाई मोठ्या आवेशानं ह्मणाल्या "काय?काय ह्मणत्येस सुशीले ! मला तिकडची भेट होण्याची आशा नाहीं ? ज्या आशेच्या आधारावर मीं आजवर प्राण धरून राहिल्यें आहें, तो आधारच तूं नाहींसा करूं पहात्येस काय ? सुशीले, आमचीहि पुनः भेट होईल; मात्र ती या जगांत नाहीं, तर त्या वैकुंठांत. अग खुळे, तुमच्या या इथल्या भेटींत विघ्न येण्याचा, पुनःपुनः ताटातूट होण्याचा संभव आहे; परंतु तिथं आमचा जो संयोग होईल तो चिरकाळचाच, समजलीस ?"

सुशीला तटस्थ होऊन लक्ष्मीबाईच्या मुखाकडे पहात राहिली. या वेळीं लक्ष्मीबाईच्या वदनमंडलावर कांहीं अप्रतिम तेज विराजमान झालें होतें. त्या तेजा-

पुढें तेथें जळत असलेल्या दिव्याचा प्रकाशदेखील फिका दिसूं लागला. सुशीलेनें घाबरून लक्ष्मीबाईच्या पायांवर मस्तक ठेविलें आणि सद्गदित होऊन ह्मणाली "ताई, मी अगदींच मूढ आहें. माझ्या बोलण्याचा तुला राग का आला? मला क्षमा कर?"

लक्ष्मीबाईनीं सुशीलेला जवळ घेऊन पोटाशीं धरिलें आणि मोठ्या प्रेमानें तिचें चुंबन घेऊन त्या ह्मणाल्या "सुशीले! अग तूं आज अशी अगदींच वेडी कशी झालीस बाई? मी किनई, कुणी देवता नाहीं नि तुझ्यावर मुळीं रागवल्यें नाहीं, पूस पाहूं डोळे."

इतक्यांत एक मोलकरीण धावतधावत तेथें आली आणि आमच्या सुशीलेला उद्देशून ह्मणाली "अवो ताईसाव! बसलांव काय? तुमच्या सासरची समदी मंडली ह्मोरच्या दारीं आलीय चला. त्या बगा तुमच्या सासूबाय नि जावबाय इकडच येत्यात—"

मोलकरणीचे हे शब्द कानीं पडतांच सुशीलेचें म्लान वदन एकदम प्रफुल्लित झालें. ती चटकन् उठून धावतच पुढील दारीं जाऊं लागली. इतक्यांत राधाबाई आणि पार्वतीबाई माजघरांत आल्या. आमच्या धाकट्या सूनबाईनीं आदरपूर्वक उभयतांनांहि नमस्कार केला. त्यांचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले. लक्ष्मीबाईहि राधाबाईनां मोठ्या आदरानें नमस्कार करून त्यांचें कुशलवृत्त विचारूं लागल्या. राधाबाई आपल्या धाकट्या सुनेला ममतेनें पोटाशीं धरून ह्मणाल्या "मुली, शेवटीं देवानं खरं काय तें बाहेर आणलंच बरं! त्या काळतोंड्या चांडाळणीचंच तें काम, अशी आह्मां सर्वांची अगदीं खात्री होऊन गेली."

ह्मातारीनें नंतर गंगाबाईसंबंधीं साद्यंत हकीगत निवेदन केली. आमच्या धाकट्या सूनबाई सासूजवळून दूर होतांच पार्वतीबाईनीं त्यांचा हात धरिला आणि ह्मणाल्या "लक्षुंबाई! मीं तुमचे अनंत अपराध केले आहेत; नाहींनाहीं तें तुह्मांला टाकून बोलल्यें आहें; परंतु तें सगळं पोटांत घालून तुह्मी आतां त्याबद्दल कांहींएक मनांत आणूं नका बरं! जरी तुह्मी वयानं लहान आहां तरीहि आह्मी सर्व तुमची क्षमा मागण्याकरितां आज मुद्दाम इथवर आलों आहों. इतके दिवस तुह्माला आह्मीं बरोबर ओळखलं नव्हतं; परंतु आतां तुमची खरी योग्यता आह्मांला पूर्णपणें कळून आली. झालं गेलं आपण सारं विसरून जाऊंया."

पार्वतीबाईच्या डोळ्यांतून टपटप अश्रु गळूं लागले. जाऊबाईच्या उद्गारांनीं धाकट्या सूनबाईचें मुखकमल प्रफुल्ल झालें. त्यांच्याहि डोळ्यांत आनंदाश्रु चमकूं

लागले. प्रभातसमयीं प्रफुल्ल होणाऱ्या कमलपुष्पावर पडलेल्या दवाच्या मौक्तिकाकार बिंदूंनीं कमळ जसें अधिकच सुशोभित दिसतें, तद्वत्च धाकट्या सूनबाईंच्या प्रफुल्ल मुखकमलाला या वेळचे ते आनंदाश्रु अधिकच शोभा देऊं लागले. काळ्याकुट्ट प्रचंड ढगांनीं क्षणैक झांकून गेलेला पौर्णिमेचा चंद्रमा, ते ढग वितळून जातांच जसा पुनः आपल्या पूर्णतेजानें नभोमंडळांत देदीप्यमान होतो, तद्वत्च हा निष्कारण आलेला आळ दूर होतांच आमच्या धाकट्या सूनबाईंचा मुखचंद्र आपल्या अपूर्व तेजानें विलसूं लागला.

त्या प्रफुल्ल मनानें ह्मणाल्या "जाऊबाई, त्या गोष्टी माझ्या मनांतदिखील राहिल्या नाहींत; त्यांपासून मला मुळींच कधीं वाईट वाटलं नाहीं. परंतु तुह्मी जर मला आपल्या धाकट्या बहिणीप्रमाणं मानून मजवर खरोखरच संतुष्ट झालां असाल, तर एकदां माझ्या जगूला नि दामूला तुह्मी आपल्या हातांनीं माझ्या मांडीवर बसवा, ह्मणजे मग माझे सगळे कष्ट दूर होतील."

इतक्यांत मनोरमा एका हातांत जगूला आणि एका हातांत दामूला धरून हंसतहंसत तेथें आली. आमच्या धाकट्या सूनबाईंची इच्छा पूर्ण करण्याला पार्वतीबाई मोठ्या आनंदानें तयार झाल्या; इतकेंच नव्हे, तर त्यांनां त्याबद्दल मोठें कौतुकहि वाटलें. परंतु जाऊबाईंच्या हातून हें काम पार पडेपर्यंतदेखील धाकट्या सूनबाईंनां धीर धरवला नाहीं. मुलें दृष्टीस पडतांच त्यांनीं स्वतःच धावत जाऊन त्यांनां उचलून कडेवर घेतलें आणि मोठ्या प्रेमानें त्यांच्या निर्दोष मुखांचें त्या पुनःपुनः एकसारखें चुंबन घेऊं लागल्या. लबाड दामू तर कांहीं केल्या आपल्या काकीच्या कडेवरून खालींच उतरेना.

मनोरमेनें आमच्या धाकट्या सूनबाईंच्या पायांला घट्ट मिठीच मारिली. तिचा आनंदतर आज त्रिभुवनांत मावेनासा झाला होता. धाकट्या सूनबाईंनीं मोठ्या ममतेनें तिला वर उचलून पोटाशीं धरिलें आणि त्या हळूच तिच्या कानांत विनोदानें ह्मणाल्या "कसं काय, आतांतरी माझ्या ह्मणण्याचा प्रत्यय आला कीं नाहीं ? आले कीं नाहीं यजमान आपण होऊनच तुला हुडकीत ?"

मनोरमा सलज्ज मधुरस्मित करीत ह्मणाली "माझ्या ताईचं ह्मणण कां कधीं खोटं व्हायचं आहे ?"

अहाहा ! असें मधुर हास्य, मनोरमेच्या मुखावर यापूर्वी कधींहि दिसलें नव्हतें ! तिचें तें मनोहर मधुरस्मित पाहून आमचा धाकट्या सूनबाईंचा आनंद द्विगुणित झाला. हंसतहंसत त्या ह्मणाल्या "यमुताई ! आतां मात्र तुझ्या या

सर्वस्वधनाला नीट जप बरं ! अग, यत्न केला तर रानांतलीं पांखरंदिखील वश होतील, मग पुरुषांची गोष्ट कशाला हवी ?"

मनोरमा पुनः लाजली. खालीं मान घालून ती हळूच ह्मणाली "ताई, पण तें कसं जपायचं हें तूंच मला शिकवलं पाहिजे."

धाकट्या सूनबाईनीं मोठ्या प्रेमानें आपला हात मनोरमेच्या हनुवटीखालीं घालून तिचें तोंड वर उचलून ह्मटलं "कां, अझून तुला शिकवायला हवंच वाटतं ? वेडी कुठली !"

या ममतेच्या भाषणानें मनोरमेला झालेला महादानंद वर्णन करून सांगणें अशक्य आहे. आमच्या प्रिय वाचकभगिनींनीं त्याची आपल्या मनाशीं कल्पनाच केली पाहिजे. मनोरमेनें कांहींएक न बोलतां लाजून पुनः आपलें मुख खालीं केलें. परंतु आमच्या धाकट्या सूनबाईनीं लज्जेनें खालीं गेलेलें तें मुखकमळ वर उचलून त्याचें प्रेमभरानें चुंबन घेतलें !

---

# उपसंहार.

## प्रकरण शेवटलें.

### उपसंहार.

नानासाहेब देशमुखांचा आनंद आज काय वर्णावा! सुशीलेसारख्या एकुलत्या एक सद्गुणी कन्येवर आलेला भयंकर आळ, आज त्या परम कृपाळू जगन्नियंत्याच्या कृपेनें टळला, सासरच्या एकंदर मंडळीला ती पूर्वीपेक्षांहि अधिक प्रिय होऊन राहिली, नाइलाजास्तव सासरच्या घराचा जन्माचा निरोप घेऊन आलेल्या मुलीला, आज तिचा एकटा पतिच नव्हे, तर सासरची संपूर्ण मंडळी मोठ्या सन्मानानें पुनः नेण्याकरितां आली, हें पाहून नानासाहेबांनां आनंदाचें भरतें आलें. सत्याचा वाली परमेश्वर आहे, याची त्यांनां आज प्रत्यक्ष साक्ष पटून भक्तिरसानें त्यांचें पवित्र अंतःकरण उचंबळूं लागलें. त्यांनीं मोठ्या आदरानें एकंदर मंडळीचें स्वागत केलें.

वाटेच्या श्रमामुळें थकलेली मंडळी भोजनोत्तर लवकरच निजावयास गेली. नानासाहेबांनां मात्र झोंप मुळींच आली नाहीं. आनंदातिशयानें त्यांचें हृदय आज अगदीं परिपूर्ण भरून गेलें होतें. ज्या मंगलमय प्रभूनें आज हा सुदिन दाखविला, त्याच्या चरणीं लीन होऊन त्याची स्तुति करण्यांत आणि त्याचे धन्यवाद गाण्यांत त्यांची ती रात्र केव्हांच निघून गेली. जांवईमंडळीला आज मोठ्या थाटानें मेजवानी करावयाची, असा त्यांचा बेत ठरला असल्यामुळें प्रभात होतांच नित्यनियमाप्रमाणें प्रातर्विधि यथासांग उरकून गांवांतील आप्तस्वकीयांनां व स्नेही मंडळीला भोजनाचें आमंत्रण देण्याकरितां नानासाहेब स्वतः मोठ्या उल्हासानें बाहेर निघाले. घरांत बायकांची स्वयंपाकाची एकच गडबड उडून गेली.

माधवरावांनीं ही संधी साधून आपल्या भावजयीची गांठ घेतली आणि त्यांनां आजवरची सविस्तर हकीकत निवेदन करून अगदीं नम्रतेनें ते ह्मणाले "वहिनी! मी तुह्मांला नेण्याकरितां आलों आहें. माझ्या संसाराचा भार सर्वस्वीं आतां तुह्मांलाच घेतला पाहिजे."

ही प्रस्तावना ऐकून लक्ष्मीबाई ह्मणाल्या "तुमच्या इथं मी आतां आल्यानं तुमचा काय बरं फायदा होणार आहे? तुह्मी आपले सुखासमाधानानं संसार करा ह्मणजे मलाहि त्यांत सुखसमाधान आहे. हवा तर माझा मुलगा मी तुमच्या हवालीं करितें—बाकी मीं देण्यापूर्वीच मनोरमेनें त्याला केव्हांच आपलासा करून ठेविला आहे—त्याला तुह्मी घेऊन जा. आतां आणखी तें तुह्मांला काय द्यायचं! आणि मी तिथं आल्यानं याहून अधिक तें काय व्हायचं आहे?"

लक्ष्मीबाईच्या या भाषणानें माधवरावांनां गहिंवर आला. त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले. पूर्वीच्या गोष्टी एकामागून एक त्यांच्या मनांत येऊं लागल्या. त्यांच्या भावजयीचें पूर्वी जें त्यांच्यावर भावासारखें अकृत्रिम प्रेम होतें, तें प्रेम, तो लोभ त्यांच्या वडील बंधूच्या मृत्यूनंतर कमी झाला कीं काय? माधवरावांच्या मनांत प्रथम हीच कल्पना आली. परंतु पुढें आजवर आपण तिच्याशीं कोणत्या रीतीनें वागलों, ही गोष्ट मनांत येतांच आपले डोळे पुसून काढून ते ह्मणाले "वहिनी, मला क्षमा करा. मी महान् पातकी, धर्मभ्रष्ट आहें. आजवर मीं ईश्वरालादेखील जुमानिलें नाहीं, ईश्वरावरदेखील जी भक्ति मीं आजवर कधीं ठेविली नाहीं ती, किंबहुना त्याहूनहि अधिक भक्ति, इतक्या दिवसांनीं आज तुमच्याविषयीं माझ्या मनांत उत्पन्न झाली आहे. संसारसंबंधीं काडीभरदेखील काम तुह्मांला करण्याची गरज नाहीं. मी तुह्मांला घरीं नेऊन माझ्या नास्तिकाच्या घरांत देवतेची स्थापना करणार."

माधवरावांची ती करुणास्पद स्थिति आणि त्यांचे ते अश्रुपूर्ण नेत्र पाहून लक्ष्मीबाईनींहि मग आढेवेढे घेतले नाहींत. त्यांच्याहि डोळ्यांतून घळघळ अश्रु वहात होते. शेवटीं मोठ्या कष्टानें ते अश्रु पुसून त्या ह्मणाल्या "तुमचं मन दुखविण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. मी तिथं आल्यानंच जर तुह्मांला सुख वाटत असेल, तर मी अवश्य तिथं येऊन राहीन. स्त्रियांनां माहेरीं रहाणंबरं का वाटत असतं?"

माधवरावांचा आनंद काय विचारावा? हें अत्यानंदाचें वर्तमान मनोरमेला कळविण्याकरितां ते त्वरेनें निघून गेले.

भोजनसमारंभ मोठ्या थाटानें पार पडला. नानासाहेबांच्या आमंत्रणाला मान देऊन जामातांच्या पंक्तीला बरीच मंडळी जमली होती. सर्वांनां हा समारंभ मोठा अपूर्व वाटला. नानातऱ्हेच्या गप्पागोष्टी सांगत भोजनोत्तर एकंदर मंडळी दिवाणखान्यांत बसली होती. अंतर्गृहांत आमच्या धाकट्या सूनबाईची आई आणि लक्ष्मीबाई फार दिवसांनीं आलेल्या विहिणीची मोठ्या आदरानें उठबस करींत होत्या. जगू आणि दामू आपल्या काकीला सारखे भंडावून सोडीत होते. लक्ष्मीबाईचा मुलगा मनोरमेचीच पाठ धरून बसला होता. ती आल्यापासून लबाडानें आईचें नांवदेखील काढलें नाहीं. असो.

अशा रीतीनें एकंदर मंडळी आनंदांत गर्क झाली असतां सदाशिवरावांच्या घरचा गडी अकस्मात् तेथें येऊन दाखल झाला. त्यानें घाबऱ्याघाबऱ्या धान्याचें

कोठार आणि घर जळल्याची, व त्याचप्रमाणें गंगाबाईचीहि भयंकर हकीगत निवेदन केली. त्यानें आणखी असेंहि सांगितलें, कीं "गंगाबाईनीं आपल्या हातानेंच कोठाराला आग लाविली. सखू मोलकरणीनें प्रत्यक्ष ही गोष्ट पाहिली होती. परंतु गंगाबाईची ती भयानक मूर्ति पहातांच ती अगदीं गांगरून गेली. कोणाला हांक मारण्याचेंदेखील तिला भान राहिलें नाहीं. अगदीं वेड्यासारखी ती टकमक पहात राहिली. इतक्यांत गंगाबाई ज्या बाजूच्या खोलींत होत्या ती घराची बाजू पेटली. गंगाबाई खोलीला घट्ट कडी लावून आंत बसल्या आणि शेवटीं आपल्या हातानें पेटविलेल्या त्या आगींत जळून खाक झाल्या. तावडतोब गांवांतील लोक गोळा होऊन सर्वांनीं आग विझविण्याचा प्रयत्न केला. कोठाराचें छप्पर जळून आंतील धान्य नुकतेंच कुठें पेटूं लागलें होतें, परंतु तें मोठ्या प्रयासानें विझविलें. घराचीहि तीच स्थिति झाली."

गंगाबाईचा अशा भयंकर रीतीनें झालेला शेवट ऐकून सगळी मंडळी विस्मित झाली. घोर पातकांचीं फळें येथल्यायेथेंच भोगावीं लागतात, याचें हें प्रत्यक्ष उदाहरण पाहून पातकाबद्दल सर्वांच्या मनांत अत्यंत तिटकारा उत्पन्न झाला. गंगाबाईबद्दल कोणालाहि विशेषसें वाईट वाटलें नाहीं. परंतु तिची ही शेवटची हृदयद्रावक स्थिति ऐकून आमच्या धाकट्या सूनबाई आणि मनोरमा यांच्या मात्र डोळ्यांतून घळकन् पाणी आलें. मेघ वर्षाव करतांना स्थानास्थानाचा ज्याप्रमाणें विचार करीत नाहींत, त्याचप्रमाणें दुष्ट, चांडाळ, अधम गंगाबाईसाठींदेखील आमच्या धाकट्या सूनबाई आणि मनोरमा यांनीं बरेंच अश्रु गाळिले !

ही हकीगत समजल्यावर मात्र मग कोणीहि तेथें राहिलें नाहीं. लक्ष्मीबाई, मनोरमा वगैरे मंडळीला बरोबर घेऊन माधवराव तावडतोब आपल्या गांवीं निघून गेले. आणि लक्ष्मीबाईच्या सल्ल्याप्रमानें नवीन संसार थाटून मनोरमेसहित मोठ्या आनंदानें कालक्रमणा करूं लागले.

सदाशिवराव आणि विनायकरावहि एकंदर मंडळीसह आपल्या घरीं आले. आमच्या धाकट्या सूनबाईच्या वडिलांनीं जामातांना घर वगैरे पुनः दुरुस्त करण्याच्या कामीं चांगलीच मदत केली. कोणत्याहि गोष्टीची अडचण म्हणून पडूं दिली नाहीं. कोठारांतील धान्य वरवरचेंच कायतें जळून गेलें होतें. यामुळें म्हणण्यासारखें कांहीं फारसें नुकसान झालें नव्हतें. एकंदर मंडळी मोठ्या सुख-समाधानानें राहूं लागली. संसाराचा आणि त्याचप्रमाणें इतर व्यवहाराचा भार

मात्र आतां सर्वस्वीं आमच्या धाकट्या सूनबाईंच्याच गळ्यांत पडला. त्यांचें मत घेतल्याविना सदाशिवराव आतां कोणत्याहि कामाला हात घालीत नसत.

आपल्या आवडत्या वहिनींबरोबर बाळकृष्णाची स्वारीहि अर्थात् येऊन स्वस्थानापन्न झाली होती, हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

पार्वतीबाईहि आतां आपल्या धाकट्या जावेला खरोखरच आपल्या धाकट्या बहिणीप्रमाणें वागवीत. दोघींमध्यें वैमनस्य ह्मणून आलेलें कोणीं पाहिलें नाहीं. पार्वतीबाईची आणि राधाबाईची मात्र पूर्वीपेक्षांहि अधिक खडाजंगी उडे. आणि मोठ्या आश्चर्याची गोष्ट, कीं, सासूसुनांच्या या कलहांत हल्लीं आमच्या धाकट्या सूनबाई नेहमीं आपल्या वडील जावेचाच पक्ष घेत. आणि मग मात्र बिचाऱ्या ह्मातारीला हार खावी लागे ! परंतु हा कलह ह्मणजे एक प्रकारचा प्रेमकलहच असे. आणि याला कारण काय, तर सुनांनां काम करतांना पाहून राधाबाईच्यानें स्वस्थ बसवत नसे. त्याहि कांहींतरी करूं लागत. परंतु सुनांनीं अगदीं ठाम निश्चय केला होता, कीं, सासूबाईंनां आतां काम ह्मणून करूं द्यावयाचें नाहीं. त्यामुळें अर्थात् हे कलहाचे प्रसंग वारंवार येत आणि त्यांत नेहमीं ह्मातारीचाच पराजय होई. शेवटीं ती आपली आपल्या नातवांचें कोडकौतुक करण्याकडे व देवधर्म वगैरे करण्याकडेच आपला सारा वेळ घालवूं लागली. संसाराच्या गोष्टींकडे पहाण्याचें तिनें अगदीं सोडून दिलें.

मनोरमेला आपल्या आवडत्या ताईला भेटल्यावांचून व प्रत्येक गोष्टींत तिचा हितप्रद उपदेश घेतल्यावांचून कोठचें चैन पडायला ! ती आपली वारंवार धाकट्या सूनबाईंनां भेटावयाला येत असे. माधवरावांनींहि कधींहि या कामांत तिला अडथळा आणिला नाहीं. उलट ते स्वतःच कधींकधीं तिला घेऊन येत.

हांहां ह्मणतां दीक्षितांच्या घराण्याची पुनः भरभराट होऊं लागली. धन, मान, गौरव यांची पुनः वृद्धि होऊं लागली. एका वेळीं मोठ्या नांवालौकिकास चढलेलें हें दीक्षितांचें घराणें, मध्यंतरीं आलेल्या विपत्तीच्या ग्रहणांतून सुटून त्या मंगलकारक प्रभूच्या अमोघ कृपेनें पुनः पूर्वस्थितीला येऊन पोहोंचलें.

सदाशिवराव आणि त्यांची आई मात्र या सगळ्याचें श्रेय आमच्या धाकट्या सूनबाईलाच देत आहेत.

ॐ तत्सत्.

# मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनें

## प्रसिद्ध केलेलीं कांहीं पुस्तकें.

---

### कादंबऱ्या.

| | | |
|---|---|---|
| १ | रमामाधव. | ०–४–० |
| २ | मुरारराव. | ०–४–० |
| ३ | भयंकर सूड. | ०–४–० |
| ४ | संसारांतील गोष्टी. | ०–६–० |
| ५ | अमृतपुलिन. | ०–६–० |
| ६ | भयंकर ग्रहदशा. | ०–६–० |
| ७ | प्रेमविजय. | ०–६–० |
| ८ | धाकट्या सूनबाई. | ०–८–० |
| ९ | प्रियंवदा. | ०–८+० |
| १० | मृणालिनी. | ०–८–० |
| ११ | परिणामीं हेंच ! | ०–८–० |
| १२ | भोळा बाळू. | ०–८–० |
| १३ | मूर्तिमंत देशाभिमान. | ०–८–० |
| १४ | सरस्वती. | ०–१०··० |
| १५ | सुशिक्षित स्त्री. | ०–१०–० |
| १६ | नवयुग. | ०–१२–० |
| १७ | जीवनसंध्या. | ०–१२- ० |
| १८ | लीला. | ०–१२–० |
| १९ | बकुलमाला. | ०–१२–० |
| २० | राजा तोडरमल. | ०–१२–० |
| २१ | सुधा. | १–०–० |
| २२ | ही रामाची अयोध्या ! | १–०–० |
| २३ | माणिकबाग. | १–४–० |
| २४ | दुःखा अंतीं सुख. | १–४–० |
| २५ | नशिबाची परीक्षा. | १–४–० |

## नाटकें व प्रहसनें.

| | | |
|---|---|---|
| १ | वेड्यांचें इस्पितळ. | ०-३-० |
| २ | नीलांबरी. | ०-३-० |
| ३ | पन्हाळगडचा किल्लेदार. | ०-४-० |
| ४ | रावबहादुर पर्वत्या. | ०-६-० |
| ५ | चतुरगडच्या विनोदी स्त्रिया. | ०-६-० |
| ६ | द्रोणसंकोप. | ०-६-० |
| ७ | भ्रमनिरसन. | ०-६-० |
| ८ | मुद्राराक्षस. | ०-८-० |
| ९ | मालतीमाधव. | ०-८-० |
| १० | संग्रामसिंह. | ०-८-० |
| ११ | गौप्यगोपन. | ०-८-० |
| १२ | सुंदरमाधव | १-१०-० |

| | | |
|---|---|---|
| १ | हंसदूत. | ०-२-० |
| २ | मोहनतारा. | ०-२-० |
| ३ | कुसुमगुच्छ. | ०-४-० |
| ४ | उपदेशपाठ. | ०-४-० |
| ५ | काव्यकुञ्ज. | ०-४-० |

## चरित्रें वगैरे.

| | | |
|---|---|---|
| १ | रा. ब. वारद. | ०-४-० |
| २ | ऐतिहासिक स्त्रिया. | ०-८-० |

## धार्मिक आणि उपदेशपर.

| | | |
|---|---|---|
| १ | विवेकानंदांचीं पत्रें. | ०-४-० |
| २ | स्वामी रामतीर्थ. | १-४-० |
| ३ | रानडे यांचीं व्याख्यानें. | १-८-० |
| ४ | आमच्या आठवणी | १-४-० |

## विनोदपर.

| | | |
|---|---|---|
| १ | भद्रंभद्र. | ०-१०-० |
| २ | सुदाम्याचे पोहे. | ०-१२-० |